श्रीसयाजी साहित्य-माला, पुष्प २९८ वें

# मुसलमानपूर्व महाराष्ट्र

## खंड १ ला

### राजकीय इतिहास

(इ. स. पूर्व २०० वर्षे ते इ. स. १३१८.)

लेखक :
वासुदेव कृष्ण भावे, बी. ए., पुणे.

मार्गशीर्ष
शके १८६८

नोव्हेंबर
सन १९४६

किंमत ३॥ रुपये

॥ श्री ॥

# विज्ञापना

आपल्या देशी भाषांतील साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें विद्याभिलाषी कै. श्रीमंत सरकार महाराज साहेब सर सयाजीराव गायकवाड (तिसरे) सेनाखासखेल समशेरबहाद्दूर जी. सी. एस. आय., जी. सी. आय. ई., एल्. एल्. डी., यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची जी रकम निराळी ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्री सयाजी साहित्यमाले"त विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यात येतात.

तदनुसार "मुसलमानपूर्व महाराष्ट्र" या नांवाचा ग्रंथ रा. वासुदेव कृष्ण भावे, बी. ए. पुणें, यांजकडून तयार करविला, तो उक्त मालेंतून ३१८ वें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| **भाषांतर-शाखा** | **यो. ज. त्रिपाठी** | **ज्यो. मा. मेहेता** |
| प्राच्य-विद्या-मंदीर | भाषांतर मदतनीस | विद्याधिकारी, |
| बडोदें | | राज्य बडोदें |

ता. ११-११-४६

# प्रास्ताविक दोन शब्द

महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास इतर प्रांतांच्या इतिहासाप्रमाणें बहुतांशीं अज्ञात आहे. परंतु एकादी वस्तु जितकी अज्ञात तितकीच तिचें ज्ञान मिळविण्याची उत्सुकताहि मनुष्यांत प्रबळ असते. महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाची स्थिति जवळ जवळ तशीच आहे. त्या इतिहासाचीं साधनें अत्यल्प असतांहि कै. डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं 'अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन' हा मूल्यवान ग्रंथ लिहून त्या कालावर प्रकाश पाडला. त्यांचा तो ग्रंथ इ. स. १८९६त इंग्रजींत प्रसिद्ध झाला. त्यास आतांपर्यंत ५० वर्षें लोटलीं आहेत. त्यानंतर कै. चिंतामण विनायक वैद्य यांनीं इ. स. १९२० सालीं 'मध्ययुगीन भारत' प्रकाशित केलें. तो ग्रंथ एकट्या महाराष्ट्राकरितां नसून अखिल भारतासाठीं असल्यामुळें त्यांत महाराष्ट्रास गौणस्थान मिळालें व त्या मानानेंच त्याचा त्यांनीं परामर्श घ्यावा यांत नवल नाहीं. चिंतामणरावजींमागून अलीकडे डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर या अत्यंत उद्योगी व विद्वान् ग्रंथकारानें 'प्राचीन महाराष्ट्र' हा ऐतिहासिक ग्रंथ लिहिण्याचें कार्य अंगिकारून त्याचा एक खंडहि वाचकांच्या हातीं दिला. त्यासाठीं त्यांनीं जो प्रचंड आराखडा आंखला होता त्याप्रमाणें तो ग्रंथ पूर्ण झाला असता तर महाराष्ट्राच्या इतिहासांत एका अपूर्व ग्रंथाची निःसंशय भर पडली असती. परंतु त्यांच्या अकालिक निधनानें तें कार्य अपूर्ण राहिलें हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय.

वरील प्रयत्नांशिवाय अखिल महाराष्ट्राच्या सर्व घराण्यांचा मिळून इतिहास लिहिण्याऐवजीं राजघराण्यांचे इतिहास अलीकडे इंग्रजींत लिहिण्यांत आले आहेत. त्यांपैकीं बनारस युनिव्हर्सिटींतील प्राध्यापक डॉ. अनंत सदाशिव आळतेकर यांनीं 'राष्ट्रकूट घराण्याचा इतिहास' लिहिला, त्यास प्रमुखस्थान द्यावयास पाहिजे. तो केवळ एका घराण्याचा इतिहास असला तरी त्यांत इतर विषयांचें केलेलें विवेचन महाराष्ट्राच्या दीर्घकालीन इतिहासास फारच उपकारक झालें आहे. त्याशिवाय त्यांनीं शिलाहार घराण्याचाहि इतिहास

लिहून कोंकणपट्टीचा इतिहास उजेडांत आणला आहे. डॉ. मोरेस यांनीं कदंब कुलावर ग्रंथ रचून गोंवेंप्रांताचा मध्ययुगीन इतिहास वाचकांस उपलब्ध करून दिला आहे.

भांडारकरादिकांनीं लिहिलेले अखिल महाराष्ट्रासंबंधाचे इतिहास, नवीन माहितीच्या आधारावर प्राचीन महाराष्ट्राचा नवा इतिहास लिहिण्यास जसे उपयुक्त आहेत, तसेच वरील फुटकळ घराण्यांचेहि इतिहास उपयुक्त आहेत. डॉ. भांडारकर व वैद्य यांनीं इतिहास लिहिल्यावर एपिग्राफिया इंडिका, इंडियन अँटिक्वेरी इत्यादि विविध मार्गांनीं विपुल ताम्रपट व शिलालेख प्रतिवर्षी प्रसिद्ध झाले आहेत. त्या सर्वांचा व इतर साधनांचा परामर्श घेऊन महाराष्ट्राचा यादवअखेरपर्यंतच्या सुमारें दीडसहस्र वर्षांचा इतिहास लिहिण्याची कल्पना मला सुचली व त्याप्रमाणें बरींच वर्षे व्यासंग करून प्रस्तुत ग्रंथ मीं प्रसिद्ध करीत आहें. यांत बाँबे गॅझीटियरमुद्धां सर्व अद्ययावत् ऐतिहासिक साधनें मीं उपयोगांत आणिलीं आहेत. हेतु हा कीं महाराष्ट्राचा अखंड इतिहास मराठी वाचकांना उपलब्ध व्हावा. शिक्षणसंस्था व सामान्य वाचक यांना अशा ग्रंथाची उणीव फार भासत होती, ती या ग्रंथानें बऱ्याच अंशांनीं दूर झाली तर माझा आनंद द्विगुणित होईल हें सांगावयास नकोच.

मी या विषयाचा अभ्यास करतांना नुसत्या राजकीय अंगावर भिस्त न ठेवतां, धर्म-पंथ, समाज, नीति, कला, कौशल्य, वाङ्मय यांचाहि अभ्यास केला असून त्यांपैकीं राजकीय अंगाचा तेवढाच इतिहास या खंडांत घेतला आहे व बाकीच्या अंगांना वेगळा खंड वाहिला असून तो या खंडामागून लवकरच प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे.

प्रस्तुत ग्रंथरचना करण्याचें काम मला तरी इतकें बिकट गेलें कीं त्यांत अनेक महाराष्ट्रीय संशोधकांचें जर मला सहाय्य मिळालें नसतें तर माझ्या हातून हें कार्य पार पडणें अशक्यप्राय झालें असतें. अशा सहाय्यकांत बनारस हिंदु युनिव्हर्सिटींतील विद्वान् प्राध्यापक डॉ. अनंतराव आळतेकर यांचा प्रामुख्यानें उल्लेख करण्यास मला आनंद वाटतो. त्यांनीं माझ्या हस्तलिखिताचा बराच भाग तपासून दिलाच, पण त्याशिवाय वेळोवेळीं बहु-

मोल सूचनाहि केल्या त्याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत. माझे नागपूरचे तरुण मित्र डॉ. विष्णु रामचंद्र देवरस एम्. ए., पीएच्. डी. यांनीं मराठ्यांच्या इतिहासांतील इ. स. १००० वर्षापर्यंतच्या काळावर लिहिलेल्या प्रबंधाचा त्यांनीं मला उपयोग करूं दिला याबद्दल त्यांचाहि मी आभारी आहें. तसेंच येथील भा. इ. सं. मंडळांतील काष्टाळू संशोधक रा. गणेश हरी खरे यांनीं चर्चेपासून साधनें पुरविण्यापर्यंत जें सहाय्य केलें त्यासाठीं त्यांचेहि आभार मानणें माझें कर्तव्य होय.

मी अत्यंत काळजी वाहिली असत हि पुस्तकांत कांहीं अशुद्धें राहिलीं; त्यासाठीं शेवटीं शुद्धिपत्र जोडलें आहे तें वाचकांनीं अवश्य वाचावें. तरी-सुद्धा कांहीं दोष राहून गेले आहेत, त्यांची जाणीव मला आहे. त्याबद्दल त्यांनीं मला क्षमा करावी अशी त्यांस विनंति आहे.

सरतेशेवटीं ज्यांच्या उदार आश्रयामुळें हा ग्रंथ लिहिण्याचें व प्रसिद्ध करण्याचें काम माझ्या हातून पार पडलें त्या श्रीमंत गायकवाड सरकारांचा मी अत्यंत ऋणी आहें हें नमूद करणें अत्यावश्यक आहे. हा ग्रंथ लिहिण्याचें व तो प्रसिद्ध झालेला पाहाण्याचें भाग्य मला ज्या जगन्नियंत्या परमेश्वराच्या कृपेनें लाभलें त्यास अत्यंत नम्रतापूर्वक अभिवादन करण्याशिवाय मी अधिक काय करूं शकणार ?

रविवार, मार्गशीर्ष शु॥ १
शके १८६८

वासुदेव कृष्ण भावे

# अनुक्रमणिका




**शातवाहन व पश्चिम क्षत्रप यांचें राज्य**

**(इ.स. १५० चा सुमार)**

# मुसलमानपूर्व महाराष्ट्र

## प्रकरण १ लें

### महाराष्ट्राचें प्राचीनत्व

सांप्रत आपण ज्या प्रदेशाला महाराष्ट्र म्हणतों त्याचीं प्राचीन नांवें दण्डकारण्य व दक्षिणापथ अशीं आहेत. श्रीरामचंद्र वनवासांत असतां दण्डकारण्यांत आला, तो महाराष्ट्राचा अतिप्राचीन वसाहतकाल. हिंदूंतील दशावतारांच्या समजुतीप्रमाणें रामावतार आधींचा व कृष्णावतार नंतरचा. कृष्णावतारींच प्रसिद्ध भारतीय युद्ध झालें. त्याचा काळ ३२०० वर्षांपूर्वीचा धरला जातो ( डॉ. आळतेकर, अध्यक्ष, आरकाईल अँड कल्चरल् हिस्टरी विभाग, हिस्टरी कॉंग्रेस, कलकत्ता, सन १९३९ ). त्यापूर्वी राम एक सहस्र वर्षे होऊन गेला असें मानल्यास, रामावतार सुमारें ४२०० वर्षांइतका जुना समजावा लागतो. त्याकाळीं राम दण्डकारण्यांत गोदावरीच्या कांठीं पंचवटींत आगस्त्यऋषीच्या आश्रमापासून दोन योजनें अंतरावर राहात होता. वायु, मत्स्य व मार्कंडेय या पुराणांत पुढील माहिती आढळते—' सह्याद्रीच्या उत्तर-भागांत जेथें गोदावरी आहे व गोवर्धननामक नगर आहे, तेथें सर्व पृथ्वी-तलावर अत्यंत सुंदर असा एक प्रदेश आहे. त्या ठिकाणीं दिव्य वनस्पतींनीं युक्त असें एक सुंदर उद्यान राम व सीता यांजकरितां भारद्वाजऋषीनें निर्माण केलें.' ह्यावरून सध्यांच्या नाशिकाच्या आसपास राम राहात होता हें स्पष्ट आहे. महाराष्ट्रांतील ब्राह्मणलोक रोजच्या संकल्पांत ' दण्डकारण्ये देशे ' असा उच्चार करतात, तोहि लक्षांत घेतां आर्यलोक महाराष्ट्रांत वसाहतीस आले तेव्हां तेथें दण्डकारण्य असल्याचें सिद्ध होतें. त्यावेळीं ऋषींची वस्ती तुरळक व तुटक अशी निरनिराळ्या नद्यांच्या आश्रयानें झाली असावी.

राम ज्या दण्डकारण्यांत आला, त्याचा विस्तार व क्षेत्रफळ काय होतें असा प्रश्न येथें उद्भवतो. कै. चिं. वि. वैद्य यांच्या मतें चित्रकूट पर्वतापासून, म्हणजे हल्लींच्या रेवा संस्थानापासून, मलयाचलापर्यंत– अर्थात् म्हैसुरापर्यंत-- दण्डकारण्य लागून राहिलें होतें. महाभारतांतील वर्णनाप्रमाणें मध्यहिंदुस्थान आणि तापी व पयोष्णी या नद्या, इतका प्रदेश दण्डकारण्यांत मोडत होता. पण या वर्णनांत वैगुण्य असें कीं, त्यांत खानदेशापासून पश्चिम व दक्षिण या दिशांकडील प्रदेश येत नाहीं. यादवांचा मंत्री हेमाद्रि यानें व्रतखंडाच्या प्रारंभीं ‘देवगिरी सेऊण देशांत आहे व सेऊण देश दण्डकारण्याच्या सीमेवर आहे’ असें म्हटलें आहे. ही सीमा बहुधा दक्षिणेकडील असावी. प्रसिद्ध इतिहासकार पार्जिटर म्हणतो त्यावरून बुंदेलखंडापासून कृष्णानदी-पर्यंतचा प्रदेश दण्डकारण्यांत धरावा लागतो. रा. वैद्य व पार्जिटर यांचीं मतें बहुतांशीं परस्परांशीं जुळतीं आहेत. रामायणाच्या उत्तरकाण्डांत दण्डकारण्य हें मूळचें विस्तृत राष्ट्र असून पुढें त्याचें अरण्य बनलें अशी कथा आहे. जगाचीं वारंवार होणारीं स्थित्यंतरें लक्षांत घेतां जें रामावतारीं दण्डकारण्य होतें तें त्यापूर्वीं मनुष्यवस्तीनें गजबजलेलें राष्ट्रहि असेल.

दण्डकारण्याशिवाय महाराष्ट्राचें दुसरें नांव दक्षिणापथ. याचा उल्लेख बौद्धायन स्मृतींत, कौटिलीय अर्थशास्त्रांत, महाभारतांत, रामायणांत, पतञ्जलीच्या महाभाष्यांत, समुद्रगुप्ताच्या अलाहाबादेंतील स्तंभावर, नाणेघाटांतील शिलालेखांत व क्षत्रप रुद्रदामन याच्या गिरिनारावरील शिलालेखांत आढळतो. महाभारत व रामायण या दोन ग्रंथांत जरी दक्षिणापथ व दण्डकारण्य हे दोन्ही शब्द आले असले, तरी त्यावरून भारतीययुद्धकाळीं व रामावतारीं दण्डकारण्याच्या बरोबरीनें दक्षिणापथ हा शब्द वापरीत असतीलच असें निश्चयपूर्वक म्हणवत नाहीं. ज्याअर्थी शातवाहनांच्या काळापर्यंत दक्षिणापथ हें नांव वापरण्यांत येत होतें त्याअर्थी सदर नांव दण्डकारण्याहून अर्वाचीन असावें असें वाटतें.

दक्षिणापथाची उत्तरेकडील मर्यादा सामान्यत: विन्ध्यपर्वत समजण्यांत येते. पण बौद्ध लेखकांनीं अवंतीच्या, म्हणजे उज्जयिनीच्या, भोंवतालचा प्रदेश याचीहि गणना दक्षिणापथांतच केली आहे. जातकांतहि अवन्ती हा दक्षिणा-

पथाचा भाग सांगितला आहे. म्हणजे, बौद्ध लेखकांच्या मतें दक्षिणापथाची उत्तरेकडील मर्यादा विन्ध्याद्रीपलीकडे जाते. दहाव्या शतकांतील लेखक अभिनवगुप्त हा विन्ध्य व दक्षिणसमुद्र यांजमधील प्रदेशाला दाक्षिणात्य देश म्हणतो. याचा अर्थ विन्ध्याद्रीपासून रामेश्वरापर्यंतचें जें दक्षिण-हिंदुस्थान तोच दक्षिणापथ. पण कित्येक ब्राह्मण लेखकांनीं दक्षिणापथाची उत्तर-मर्यादा विन्ध्यपर्वत ही न धरतां नर्मदा नदी ही धरली आहे. त्याचप्रमाणें, दहाव्या शतकांतील प्रसिद्ध लेखक राजशेखर हा आर्यावर्त व दक्षिणापथ यांची सीमा नर्मदाच मानतो. वात्स्यायनहि आपल्या कामसूत्रांत ' नर्मदायाः दक्षिणेन देशो दक्षिणापथः ' असेंच लिहितो. भरतानें आपल्या नाट्यशास्त्र या ग्रंथात दक्षिणापथाच्या सीमा पुढीलप्रमाणें दिल्या आहेत.

महेन्द्रो मलयः सह्यो मेकलः पलपिंजरः ।
एतेषु ये श्रिता देशाः स ज्ञेयो दक्षिणापथः ॥

असें दक्षिणापथाचें त्यानें वर्णन केलें आहे.

साराश, स्थूलमानानें विन्ध्यपर्वतापासून, किंवा त्यात उगम पावलेल्या नर्मदेपासून, तों थेट कन्याकुमारीपर्यंत जो उत्तर-दक्षिण व पूर्व-पश्चिम अफाट प्रदेश पसरला आहे तो दक्षिणापथ, असें समजण्यास हरकत नाहीं. यावरून दण्डकारण्य व दक्षिणापथ यांची एकमेकांत सरमिसळ झाली असली तरी त्यांच्या मर्यादा समान नाहींत हें स्पष्ट दिसतें.

दण्डकारण्य व दक्षिणापथ या नांवांनीं संबोधल्या जाणाऱ्या अफाट मुलुखाचा महाराष्ट्र हा एक लहानसा भाग होय. भरताचें नाट्यशास्त्र हा ग्रंथ महामहोपाध्याय हरप्रसादशास्त्री यांच्या मतें खि. पू. दुसऱ्या शतकांत झाला. पण कीथ, जाकोबी व विंटरनीझ यांच्या मताप्रमाणें तो ग्रंथ इ. स. च्या तिसऱ्या शतकांतील आहे. महाराष्ट्राचा उल्लेख करणारा तोच पहिला ग्रंथकार. त्यानें त्यांत कोसल, तोसल, कलिंग, आन्ध्र व वनवासी येथील लोकांबरोबरच महाराष्ट्रांचें, म्हणजे महाराष्ट्रीय लोकांचें, नांव घेतलें आहे. रामायण व महाभारत यांना महाराष्ट्र माहीत नाहीं. पण वायु, ब्रह्म व मार्कण्डेय या पुराणांत महाराष्ट्राचा निर्देश अभीर, शबर व कलिंग यांजबरोबर केलेला आहे. वात्स्यायन आपल्या कामसूत्रांत ( इ. स. ४०० चा सुमार ) ' नर्मदा-

कर्णाटविषयोर्मध्ये महाराष्ट्रविषयः' अशी महाराष्ट्राची उल्लेखपूर्वक मर्यादा आंखतो. तसेंच तो

कर्णाटविषयाद्दक्षिणेन द्रविडविषयः।
कोकणविषयात्पूर्वेण वानवासविषयः॥

असेंही म्हणतो.

महावंश हा बौद्धसांप्रदायिक ग्रंथ इ. स. ४५९ ते ४७४ च्या सुमारास लिहिण्यांत आला. त्यांत अशोकाच्या राज्याच्या १७ व्या वर्षी काश्मीर, वनवासी व महाराष्ट्र यांत बौद्ध प्रचारक पाठविल्याचा वृत्तान्त आहे. वराहमिहिर हा शक ४२७ त (इ. स. ५०५) होता. त्यानें बृहत्संहितेच्या १० व्या अध्यायांत 'भाग्ये रसविक्रयिणः पण्यस्त्रीकन्यका महाराष्ट्राः' असें म्हटलें आहे. त्यावरून वराहमिहिरास महाराष्ट्र माहीत असल्याचें स्पष्ट होतें. प्रसिद्ध संस्कृत ग्रंथकार दण्डी हा सहाव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. त्यानें महाराष्ट्रांतील प्राकृत भाषेची स्तुति करून तींतील सेतुबंध काव्य प्रशंसिलें आहे. ह्यूएनत्संग हा चिनी प्रवासी इ. स. ६२९ ते ६४९ पर्यंत हिंदुस्थानांत हिंडून गेला. त्याला महाराष्ट्र देश ज्ञात असून त्याचा विस्तार एक सहस्र मैल (सहा सहस्र ली) असलेला तो नमूद करतो. त्यानें महाराष्ट्र शब्दाचा उच्चार मोहालश्शो (Mo-ha-la-cho) असा केला आहे. कुवलयकथा या ग्रंथाचा कर्ता इ. स. ७७७ त होऊन गेला. तो महाराष्ट्रीयांविषयीं लिहितो, 'महाराष्ट्रीय लोक ठेंगणे, मजबूत, सहनशील व किंचित् काळे आहेत. ते गर्विष्ठ व भांडखोर असून मोठ्यानें बोलतात.' आठव्या शतकांतील मुरारि यानें आपल्या अनर्घराघव या ग्रंथांत महाराष्ट्र देशाचें कुंडिननगर हें अद्वितीय भूषण म्हटलें आहे. दहाव्या शतकांतील नाटककार राजशेखर यानें विदर्भ व महाराष्ट्र हे एक असल्याचें सांगून विदर्भ हें ज्ञानाचें माहेर आहे अशी त्याची वाखाणणी केली आहे.

अलबेरुणी हा आरब फिरस्ता हिंदुस्थानांत इ. स. १००० त येऊन गेला. 'धारेकडून दक्षिणेकडे जात असतां वाटेंत मरहट्ट देश, कोकणप्रांत व त्याची राजधानी ठाणें लागते' असें त्यानें लिहिलें आहे. हीं प्रमाणें इ. स. च्या तिसऱ्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत महाराष्ट्र किंवा मरहट्ट

हीं दोन नांवें अबाधितपणें रूढ असलेलीं सिद्ध करण्यास पुरेशीं आहेत. त्यावरून महाराष्ट्र देश, महाराष्ट्राची भाषा व महाराष्ट्रीय लोक यांजसंबंधीं तत्कालीन लेखकांचें मतहि आपणास समजतें. तसेंच महाराष्ट्राचे कोकण, विशेषतः विदर्भ तथा वऱ्हाड हे पोटविभाग असल्याचेंहि दिसून येतें. किंबहुना महाराष्ट्राचा प्रधान भूभाग विदर्भ हाच असून तो विद्येंत विशेष भरभराटलेला होता. महाराष्ट्र या देशवाचक शब्दाविषयीं पाहातां तो शब्द महाराष्ट्रास पांचव्या शतकापासून लावण्यांत येत असल्याचें आतांपर्यंतच्या विवेचनानें स्पष्ट झालें आहे.

बदामी येथील चालुक्यांच्या काळांत ऐहोळी येथील जैन मंदिरांत एक शिलालेख जैन कवि रविकीर्ति यानें शक ५५६ त लिहिला आहे. विविध वृत्तांत रचलेलें तें एक लहानसें काव्यच आहे. सदर काव्यांतील दोन श्लोक प्रकृतस्थळीं लागू आहेत. वर्णन चालुक्य राजा दुसरा पुलकेशी याच्या दिग्विजयाचें असून त्यांत कोकणाचा उल्लेख येणेंप्रमाणें आहे.

कोकणेषु यदादिष्टचंडदण्डांबुवीचिभिः ।
उदस्तास्तरसा मौर्यपल्वलांबुसमृद्धयः ॥

‘कोंकण प्रांतांत, त्याच्या आदेशांत वागणाऱ्या सैन्यरूपी पर्वतप्राय लाटांनीं एखाद्या डबक्यांतील तरंगाप्रमाणें हालणाऱ्या मौर्य सैन्याच्या समृद्धीला खालीं बसविलें.’ यावेळीं कोकणावर मौर्यांचा अंमल असून त्यांचा पुलकेशीनें पराभव केला.

आतां दुसरा श्लोक—

विधिवदुपचिताभिश्शक्तिभिश्शक्रकल्पः ।
तिसृभिरपिगुणौघैः स्वैश्चमाहाकुलाद्यैः ॥
अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणाम् ।
नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणाम् ॥

‘ज्यानें तिन्ही शक्ती विधियुक्त रीतीनें वाढविल्या आहेत, आणि त्यामुळें जो इंद्रतुल्य दिसत आहे, त्याच्या उच्च घराण्यांतील जन्मामुळें त्यानें ९९ हजार खेडीं असलेल्या तिन्ही महाराष्ट्रकांचें आधिपत्य मिळविलें.’

यांपासून दोन तत्वें समजलीं. एक, कवीनें कोकणाचा उल्लेख स्वतंत्रपणें केला, व दुसरें, त्यानें तीन महाराष्ट्रकें म्हटलें. येथें महाराष्ट्र हा शब्द नसून 'महाराष्ट्रक' असा शब्द आहे. ज्यांत ९९ हजार गांवें आहेत असा हा तीन महाराष्ट्रकांचा समुदाय आहे. रा. काणे यांनीं तीन महाराष्ट्रक हे महाराष्ट्राचे तीन विभाग धरून विदर्भ, मुख्य महाराष्ट्र (खानदेश ते सातारा) व कुंतल, असे एकच भाषा बोलणारे तीन विभाग दर्शविले आहेत. परंतु पुलकेशी हा एकट्या मराठी भाषा (प्राकृत) बोलणारांचा अधिपति नसून त्याच्या ताब्यांत मराठीप्रमाणें कानडी व आन्ध्र भाषा बोलणारे प्रदेशहि होते हें लक्षांत ठेवल्यास तीन महाराष्ट्रक म्हणजे महाराष्ट्र, कर्नाटक व आन्ध्र हीं तीन महाराष्ट्रें होत असें मानावें लागतें. त्याशिवाय महाराष्ट्रक याचा आणखी एक अर्थ संभवतो. तो म्हणजे तीन महाराष्ट्रांत राहाणारे लोक. ते अर्थातच महाराष्ट्रीय, कन्नड व आन्ध्र लोक होत. अशा या तीन लोकांचें आधिपत्य पुलकेशीकडे होतें असें रविकीर्तीनें म्हणावें यांत गैर कांहींच नाहीं. या तीन महाराष्ट्रांपैकीं एक महाराष्ट्र म्हणजे सध्यांचा महाराष्ट्र स्पष्टच आहे. उरले कर्नाटक व आन्ध्र; त्यांस महाराष्ट्र हें नांव त्यास महाराष्ट्राच्या जोडीस बसविण्याकरितां रविकीर्तीनें गौरवार्थ लावावें यांत नवल नाहीं.

महाराष्ट्र हें नांव आपल्या प्रांतास कां पडलें ह्याविषयीं वेगवेगळे तर्क चालविण्यांत येतात. शातवाहन कालांत महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं रथी व महारथी हे मोठे अधिकारी किंवा संस्थानिक या नात्यानें वावरत असल्यामुळें या प्रांतास महाराष्ट्र संज्ञा प्राप्त झाली, असें डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचें मत आहे. नाणे-घांटांतील पुतळ्याजवळच्या शिलालेखांत ' महारठी गनकाथिरो ' म्हणजे ' महाराष्ट्री किंवा महारथी गणकवीरः ' असे शब्द आहेत. त्याप्रमाणें कार्लें, कान्हेरी इत्यादि लेण्यांत महारथींचा उल्लेख आहे. त्यांचा आधार वरील मतास देण्यांत आला आहे. परंतु रथी व महारथी हे केवळ महाराष्ट्रांतच नव्हे, तर कर्नाटकांतहि असल्यानें प्रस्तुत मत सयुक्तिक ठरत नाहीं.

महाराष्ट्राविषयीं आणखी एक अनुमान संभवतें. महाराष्ट्र या नांवावरून त्याच्या पोटांत अनेक राष्ट्रें, अर्थात् लहान देश, समाविष्ट असल्याचा बोध

होतो. हल्लींचा महाराष्ट्र गोव्यापासून सुरतेपर्यंत दक्षिणोत्तर, व सुरतेपासून नागपुरापर्यंत पश्चिमपूर्व, पसरला आहे. इतक्या विस्तीर्ण भूभागास महाराष्ट्र म्हणतात, हें ज्ञान महाराष्ट्रांतील सर्व आबालवृद्धांना आज आहे. याचीं कारणें सार्वत्रिक शिक्षणप्रसार व शीघ्रगामी प्रवाससाधनें अशीं सांगतां येतील. महाराष्ट्र म्हटला कीं त्याच्या वर सांगितलेल्या मर्यादा नकाशाच्या सहाय्यानें सर्वांच्या डोळ्यांसमोर एकदम उभ्या राहातात. या ज्ञानांत वर्तमान-पत्रांनींहि भर घातली आहे. हीं साधनें ज्या काळांत उपलब्ध नव्हतीं त्या काळांत इतक्या विस्तीर्ण भूभागाची एकजिनसी कल्पना सामान्य मनुष्यास शक्य नव्हती. त्या काळांत महाराष्ट्र शब्द जर कोणाच्या ऐकण्यांत व बोलण्यांत प्रामुख्यानें असेल तर तो फक्त विद्वानांच्याच. इतरांना आपल्या सभोंवारच्या पन्नास कोसांचीच फक्त माहिती असे. म्हणूनच जुन्या काळांत इतक्या लहान विस्ताराचीं राष्ट्रें किंवा देश बनत. या दृष्टीनें महाराष्ट्रांत विदर्भ, अश्मक, अपरान्त, मूलक, सेऊण, कुंतल इत्यादि लहान देश वा राष्ट्रें निरनिराळ्या काळीं निर्माण झालीं असून त्या त्या राष्ट्रांतील लोक आपआपल्या टापूस त्या त्या नांवानें ओळखत असत. त्या सर्वांचा समावेश करणारें महाराष्ट्र त्यांच्या डोळ्यांपुढें नसे.

समान भाषा, समान आचारविचार, व समान धर्म या त्रिविध साधनांनीं राष्ट्राला मूर्तस्वरूप येत असलें, तरी हिंदुस्थानासारख्या समान धर्माच्या विस्तीर्ण देशांत राष्ट्रें बनण्यास भाषा हेंच प्रभावी कारण झालेलें आढळतें. मराठी ही एक भाषा असतांहि तिच्यांतहि प्रांतपरत्वें सूक्ष्म भेद आहेतच. ते भेद विसरून व स्थूल साम्यावर नजर देऊनच मराठीची व्याप्ति ठरविण्यांत आली आहे. गोमांतकी, कोकणी, खानदेशी, वऱ्हाडी या भिन्न बोलींना मराठी भाषा असें याच कारणानें म्हणतात. मराठीचा जन्म महाराष्ट्री या प्राकृत भाषेपासून झाला आहे. महाराष्ट्री ही शातवाहन कालापासून किंवा त्यापूर्वीपासून महाराष्ट्रांत रूढ आहे. ती बोलणारीं अनेक राष्ट्रें महाराष्ट्रांत असल्यानें त्या सर्व राष्ट्रांना समावेशक असें महाराष्ट्र हें नांव देण्यांत आलें. आतां, महाराष्ट्रीवरून महाराष्ट्र हें नांव उद्भवलें कीं महाराष्ट्रावरून महाराष्ट्री हें नांव भाषेला मिळालें, असा बिकट प्रश्न उत्पन्न होतो. त्याकडे तारतम्यानें

पाहिल्यास महाराष्ट्री या भाषावाचक नांवावरून महाराष्ट्र हें देशवाचक नांव निर्माण झालें असावें, असें मानणेंच सयुक्तिक दिसतें. म्हणजे, महाराष्ट्री आधींची व महाराष्ट्र नंतरचें.

---

# प्रकरण २ रें

## शातवाहन घराणें

शातवाहन हे मूळ आन्ध्र देशाचे राजे, असा पुराणांचा समज आहे. परंतु प्रत्यक्ष पुराव्यानें तो खरा दिसत नाहीं. शातवाहनांबरोबरच स्थापन झालेलें दुसरें राजघराणें खारवेलांचें. खारवेल हे कलिंग देशावर राज्य करीत होते. खारवेलांचा पहिला राजा क्षेमराज, दुसरा वृद्धराज, व तिसरा भिक्षुराज. भिक्षुराज खारवेलाचा हत्तिगुंफा लेण्यांतील शिलालेख खि. पू. १५७ च्या सुमाराचा आहे. भिक्षुराज हा शातकर्णी शातवाहनाचा समकालीन असून खि.पू. १७० च्या सुमारास राजा झाला. त्या दृष्टीनें विचार करतां शातकर्णी त्या काळीं हयात असला पाहिजे. भिक्षुराजानें आपल्या कारकिर्दीच्या दुसऱ्या वर्षी शातकर्णीस न जुमानतां आपलें सैन्य, हत्ती, घोडे, रथ व पायदळ पश्चिमेस पाठविलें. हें सैन्य कन्हवेन्नापर्यंत पोंचलें व मुसिकास या नगरांत त्यानें गडबड उडवून दिली, असें वरील शिलालेखांत म्हटलें आहे. यावरून कलिंग देशाच्या पश्चिमेस छत्तिसगड व नागपूर या प्रांतांत शातकर्णीचें राज्य होतें, आन्ध्र देशांत नव्हतें, असें अनुमान निघतें. कारण, आन्ध्र देशांत शातवाहनांचें राज्य व राजधानी असती तर खारवेलांची स्वारी आन्ध्रावर झाली

असतां, नागपूर प्रांतांत झाली नसती. शातवाहनांची प्रसिद्ध राजधानी पैठण महाराष्ट्रांत आहे, व त्यांचे अत्यंत प्राचीन शिलालेख व नाणीं पश्चिम महाराष्ट्रांतच सांपडलीं आहेत. तीं लक्षांत घेतां शातवाहनांच्या राज्याला प्रारंभ महाराष्ट्रांतच होऊन तें पसरत पसरत पूर्वेस आन्ध्रापर्यंत गेलें, असें दिसतें. मत्स्य, वायु, ब्रह्मांड, विष्णु व भागवत हीं पुराणें लिहिलीं त्यापूर्वीं कांहीं काल शातवाहनांची महाराष्ट्रावरील सत्ता नाहींशी होऊन अखेरीस आन्ध्रांत शिल्लक राहिली असेल, व त्यांची तेव्हांची राजधानीहि तिकडेच असेल, म्हणून पुराणांनीं त्यांना आन्ध्र म्हटलें असावें.

शातवाहनांची पहिली राजधानी वर लिहिल्याप्रमाणें महाराष्ट्रांत पैठणास होती, व नंतरची राजधानी आन्ध्रदेशांत झाली. ती कृष्णेच्या दक्षिण किनाऱ्यावर गंतूर जिल्ह्यांत धन्यकाकट येथें होती. याच धन्यकाकटाजवळ सांप्रत अमरावती नामक गांव आहे. सह्याद्रीमधील लेण्यांप्रमाणें अमरावतीसही शातवाहनांनीं उदार मनानें लेणीं खोदलीं असून तेथील स्तूप आजहि निख्यात आहे ( Bulletin of the Madras Government Museum, reviewed in the Journal of Indian History, April 1943.).

शातवाहनांची वंशावळ मत्स्य, वायु, ब्रह्माण्ड, विष्णु व भागवत या पुराणांत दिली आहे. परंतु त्यांतील राजांचा परस्परांशीं मेळ पूर्णपणें बसत नाहीं. मत्स्यपुराणांत एकंदर तीस राजांचीं नांवें असून त्या सर्वांचा मिळून पांचशें वर्षांचा काळ समजला जातो. मत्स्यपुराणांत पहिल्या आन्ध्र राजाचें नांव शिशुक आहे, पण इतर चार पुराणांत सांगितलेलीं नावें त्याहून वेगळीं आहेत.

## शिमूक

शिशुक हाच शिमूक. त्यानें तेवीस वर्षें राज्य केलें. त्याच्या कारकिर्दींत शातवाहन साम्राज्यांत कोंकण, पश्चिम महाराष्ट्र, व कर्नाटकाचा कांहीं भाग हे मोडत होते. शिमूक हा खि. पू. २३२ च्या सुमारास राजा असावा. मौर्यांच्या सत्तेस उतरती कळा लागलेली पाहून त्यानें आपलें साम्राज्य वाढविलें. नाणेघाटांतील लेण्यांत एका पुतळ्याखालीं 'राया शिमूक शातवाहनो श्रीमतो' म्हणजे 'प्रसिद्ध राजा शिमूक शातवाहन' असे शब्द

आहेत. त्यावरून पहिला शातवाहन राजा शिमूक याचा इतर कोणत्याही प्रांतापेक्षां महाराष्ट्राशीं निकट संबंध असल्याचें दिसून येतें.

शिमूकानंतरचा राजा कृष्ण. हा शिमूकाचा धाकटा भाऊ होता. नाशिकच्या त्रिरश्मिपर्वतावरील शिलालेखांत कृष्णास कन्ह म्हटलें आहे. त्याचा नाशिकचा (नाशिकवासी) महामात्य श्रमण यानें कृष्णाच्या कारकिर्दीत एकोणिसावें लेणें खोदलें ही गोष्ट कृष्णाचा नाशिकाशीं संबंध असल्याची निदर्शक आहे. समन (श्रमण) हा नाशिक प्रांताचा, म्हणजे गोवर्धन प्रांताचा, अधिकारी दिसतो. कारण, राजाच्या मंत्रिमंडळांतील मंत्री हे मांडलिक संस्थानिकांसारखे असत असा पुरावा प्राचीन भारतीय राज्य-व्यवस्थेंत सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो. महामात्य म्हणजे मुख्य मंत्री. तोच गोदातीरावर नाशिकांत राहात असल्यामुळें कृष्णाची राजधानी त्याच गोदातीरीं खालीं ५०-६० कोसांवर पैठणास असावी हें स्वाभाविक होय.

शातवाहनांची नंतरची राजधानी आन्ध्र देशांत कृष्णा जिल्ह्यामध्यें धेनुकाकट येथें होती. धेनुकाकट येथील रहिवाशांनीं महाराष्ट्रांत कान्हेरी, कार्लें इत्यादि ठिकाणच्या लेण्यांना देणग्या दिल्या आहेत. त्यावरून आन्ध्र देश व महाराष्ट्र यांचा त्या काळांत परस्परांशीं कसा निकट संबंध होता हें समजतें. व त्याजप्रमाणें धेनुकाकट, म्हणजे हल्लींचें धरणीकोट, ही शातवाहनांची एक वेळ राजधानी होती या समजुतीसहि बळकटी येते.

## शातकर्णी

कृष्णानें १८ वर्षें राज्य केलें. कृष्णामागून त्याचा पुतण्या शातकर्णी याला राज्य मिळालें. शातकर्णी हा शिमूकाचा पुत्र. शातकर्णी व त्याची राणी नागनिका यांचे पुतळे नाणेघाटांत आहेत. हा शातकर्णी भिक्षुराज खारवेल याचा समकालीन. भिक्षुराजानें शातकर्णीस न जुमानतां आपलें सैन्य त्याच्या मुलुखांत पाठविलें. हत्ती, घोडे, रथ, पायदळ असें हें चतुरंग सैन्य कन्हवेन्ना नदीपर्यंत पोंचलें, व मुसिकास या नगरांत त्यानें गडबड उडविली (एपिग्राफिया इंडिया, भाग २० वा). कन्हवेन्ना ही नदी कन्हन व वैनगंगा या दोन नद्यांचा संगम भंडाऱ्यापाशीं होऊन बनली असून, पुढें ती वर्धेला मिळाली आहे. भिक्षुराज खारवेल याची ही स्वारी खि. पू. १६८ च्या

सुमारास झाली. खारवेलाच्या वरील स्वारीवरून शातकर्णीचें राज्य कोंकण, नाशिक, खानदेश, वऱ्हाड, नागपूर, भंडारा येथपर्यंत पसरलें असल्याचें स्पष्ट दिसतें. शातकर्णीनें दोन अश्वमेध, पौंडरिक, अग्न्याधेय, अन्वरंभणीय, दाशरात्र, इत्यादि सोळा यज्ञ केल्याचें नागनिका राणीनें नाणेघाटांतील आपल्या शिलालेखांत म्हटलें आहे. यांपैकीं पौंडरिक यज्ञांत एक सहस्र घोडे दान करण्यांत येतात. अग्न्याधेय ही एक इष्टि आहे. गार्हपत्य इत्यादि अग्नि उत्पन्न करण्याकरितां निखारे ठेवणें म्हणजे अग्न्याधेय. या इष्टीनें मनुष्यास आहिताग्नीचा दर्जा प्राप्त होतो. शातकर्णीनें अग्न्याधेय यज्ञांत १२ गाई व १ घोडा दिला. अन्वरंभणीय यज्ञांत ८ गाई दिल्या, १७ रुप्याचीं भांडीं दिलीं, एक चांगलें गांव दिलें, सहा सहस्र कार्षापण विद्वान् ब्राह्मणांना दिले, एक धान्यानें भरलेली गाडी, एक घोडयाचा रथ व १०० बैल दिले, १७ सवत्स धेनु व १७ शेळ्या दिल्या. शातकर्णीला राणी दक्षिणापथाचा राजा म्हणते ( बॅांबे गॅझीटियर, पुणें जिल्हा ).

पहिल्या शातकर्णीमागून पूर्णोत्संग व पूर्णोत्संगामागून स्कंधस्तंभी गादीवर बसला. स्कंधस्तंभीनें १८ वर्षें राज्य केलें. स्कंधस्तंभीनंतरचा राजा शातकर्णी दुसरा, यानें राज्याचा दीर्घ काल म्हणजे ५६ वर्षें उपभोग घेतला. दुसऱ्या शातकर्णीचा पुत्र लंबोदर यानें १८ वर्षें राज्य केल्याचें पुराणांत सांगितलें आहे. लंबोदराचा पुत्र अपिलक १२ वर्षें राजा होता. अपिलकाचें एक नाणें छत्तिसगड प्रांतांत बाळपूर येथें सांपडलें आहे. अपिलकामागून मेघास्वति यानें १८ वर्षें व मेघास्वतीमागून स्वाती यानें १८ वर्षें राज्य केलें. स्वातीच्या वेळीं उत्तर व दक्षिण या भारताच्या दोन्ही भागांत शातवाहनींचें राज्य विस्तारलें. कलिंग व मगध हे दोन्ही देश त्यांच्या ताब्यांत आले. स्वातीमागून स्कंदस्वातीचा काळ सात वर्षांचा, कुंतल स्वातिकर्णीचा आठ वर्षांचा, व स्वातिकर्णीचा एक वर्षाचा. स्वातिकर्णीचा वारस पुलोमावी व पुलोमावीचा अरिष्टकर्णी. पुलोमावीच्या कारकिर्दीत मगध देश शातवाहनांच्या हातून गेला. त्यानें ३६ वर्षें व अरिष्टकर्णीनें २५ वर्षें राज्य केलें. अरिष्टकर्णीमागून हल राजा झाला. प्राकृत भाषेतील सप्तशतीग्रंथ त्यानें लिहिला असें म्हणतात. त्याच्या काळांत निजमराज्य व आन्ध्रदेश शात-

वाहनांच्या ताब्यांत होता. प्रतिष्ठानचा अधिपति व कुंतल देशाचा धनी अशी त्याची प्रसिद्धि आहे. हलामागून मंतलकानें पांच वर्षे राज्य केलें. मंतलकास वायुपुराणांत पट्टलक म्हटलें आहे. मंतलक बलाढ्य राजा होता. मंतलकानंतरचा सुंदर शातकर्णी व सुंदर शातकर्णीनंतरचा चकोर शातकर्णी. चकोरामागून शिवस्वातीनें २८ वर्षे राज्य केलें.

## गौतमीपुत्र शातकर्णी

शिवस्वातीमागून आलेला गौतमीपुत्र शातकर्णी हा फार विख्यात सम्राट झाला. गौतमीपुत्र शातकर्णी हा इ. स. १२४ च्या सुमारास होऊन गेला असावा. त्यास नाशिक येथील त्रिरश्मिवरील शिलालेखांत वेनाकटक स्वामी म्हटलें आहे. वेनाकटक म्हणजे वेणा किंवा वाइनगंगा नदीच्या तीरावरील प्रदेश. त्याजवर गौतमीपुत्र शातकर्णी याचा अंमल होता. वेनाकटकाचा उल्लेख बालाघाट जिल्ह्यांत तिरोडी येथें सांपडलेल्या वाकाटकांच्या ताम्रपटांतहि आहे. त्याअर्थी वाइनगंगा नदीच्या तीरावरील प्रदेशाचें वेनाकटक हें नांव बहुत वर्षे रूढ असल्याचें दिसून येतें. त्याचे शिलालेख आन्ध्र देशांत कृष्णानदीपाशीं शिन्ना येथें, महाराष्ट्रांत नाशिकापाशीं त्रिरश्मीवर, व ठाणें जिल्ह्यांत कान्हेरीस मिळाले आहेत. त्याचीं नाणींहि आन्ध्र देशांत, नागपुराकडे चांदा जिल्ह्यांत, व ठाणें जिल्ह्यांत सोपारें येथें सांपडलीं आहेत. या पुराव्याच्या आधारें त्याचें राज्य दक्षिणेंत पश्चिमसमुद्रापासून पूर्वसमुद्रापर्यंत पसरलें होतें हें स्पष्ट आहे.

त्रिरश्मीवर गौतमीपुत्र शातकर्णी याचा पुत्र वासिष्ठीपुत्र पुलुमावी यानें एका शिलालेखांत शातकर्णीची प्रशस्ती लिहिली आहे. ती वाचली असतां शातकर्णीचें वैभव, राज्यविस्तार, धर्मभावना व अनेक सद्गुण यांची कल्पना येते. ‘ तो असिक, सुशक, मुलक, सुराष्ट्र, कुक्कुर, अपरान्त, अनुप, विदर्भ, आकर, व अवन्ती यांचा राजा होता. तो विन्ध्य, ऋक्षवत , पारियात्र, सह्य, कृष्णगिरि, मंच, श्रीस्थान, मलय, महेन्द्र, षड्गिरि व चकोर या पर्वतांचा पति होता. त्याची आज्ञा सर्व मांडलिक मानीत. त्यानें शक, यवन व पल्हव यांचा नाश केला.

‘ तो क्षत्रियांचा दर्प व मान यांचें मर्दन करणारा होता. तो प्रियदर्शन असून शत्रू चुकला तरी त्याचे प्राण हरण करीत नव्हता. त्यानें ब्राह्मण व इतर

कुटुंबें भरभराटीस आणिलीं. त्यानें क्षहरात वंश निर्मूल केला, शातवाहनकुलाचें यश व प्रतिष्ठापन केलें, व चातुर्वर्ण्यसंकर थांबविला. त्याच्या राजधानीवर चालून येण्याची शत्रूची प्राज्ञा झाली नाहीं. त्याच्या कुळांत पूर्वी अनेक राजे झाले. तो शास्त्रांचा संग्रह होता ( आगमानां निलयः ). तो एकांकुशधर, एकधनुर्धर, एकशूर व एकब्राह्मण होता. तो रामकृष्ण, अर्जुन व भीमसेन यांच्यासारखा पराक्रमी होता. तो उत्तरायण व दक्षिणायन या उत्सवांस समाजास बोलावीत असे. तो नहुष, जनमेजय, सगर, ययाति, राम, अंबरिष यांजप्रमाणें तेजस्वी होता. अशा या शातकर्णीची माता महादेवी गौतमी बलश्री, ही सत्यवचनी, दान, क्षमा, अहिंसा यांत निरत, तप, दम, नियम व उपवास यांत तत्पर आहे. ती त्रिरश्मिपर्वत-शिखरावरील लयनं हें भद्रायणी यांच्या भिक्षुसंघाला देत आहे. ती महादेवी, महाराजमाता , व महाराजपितामही आहे. ती राजर्षिवधू या पदवीला साजेशी आहे. या लयनांत चित्रण करण्याकरितां दक्षिणापथेश्वर हा आपल्या आजीसाठीं ( महादेव्या आर्यकायाः ) धर्मसेतूस ( एक भिक्षु ) पिशाची पद्रक हा त्रिरश्मिपर्वताच्या नैऋत्येचा गांव देत आहे. '

वरील वर्णनांतील आसिक म्हणजे अश्मक. महाराष्ट्रांतील गोदावरी नदीकांठच्या प्रदेशास अश्मक म्हणत. हा प्रदेश विदर्भास लागून असून ह्यांत देवगिरी, पैठण इत्यादि नगरें येत. अश्मक, सुशक व मूलक हे प्रदेश एकमेकांशेजारीं असावे. मूल या नांवाचें गांव मध्यप्रांतांतील चांदा जिल्ह्यांत आहे. त्याच्या सभोंवतीं प्राचीन अवशेष पुष्कळ आहेत. कदाचित् ती मूलक प्रांताची राजधानी असावी. विदर्भ म्हणजे वऱ्हाड, सुराष्ट्र म्हणजे काठेवाड, अपरान्त म्हणजे कोंकण. सुराष्ट्र व अपरान्त यांजमधील प्रदेश तो कुक्कुर. अनूप हा नर्मदाकांठचा प्रदेश नेमाड व त्याची राजधानी माहिष्मति. आकर म्हणजे पूर्व माळवा. त्याची राजधानी विदिशा ( भिलसा ). अवन्ती म्हणजे पश्चिम माळवा. त्याची राजधानी उज्जयिनी. हें वर्णन खरें मानल्यास कोंकण, महाराष्ट्र, गुजराथ, माळवा, नेमाड, वऱ्हाड व नागपूर हा सगळा सलग प्रदेश, गौतमीपुत्र शातकर्णी याच्या राज्यांत होता. त्यानें आपल्या राज्याचें परिगणन पर्वतांवरूनहि केलें. त्यांपैकीं विन्ध्यपर्वत सर्वांस माहीतच आहे. ऋक्षवत

म्हणजे सातपुडा. पारियात्र म्हणजे विन्ध्याद्रीचा पश्चिमभाग. सह्याद्री. कृष्णगिरी म्हणजे कान्हेरी. मंच म्हणजे नाशिकाजवळचा पर्वत. श्रीस्थान म्हणजे श्रीशैल हा पर्वत कृष्णाकांठीं कर्नूल जिल्ह्यांत आहे. महेन्द्रपर्वत महानदी व गोदावरी यांच्या मध्यभागीं आहे. या वर्णनानें आन्ध्र व निजामराज्याचा पूर्वभाग यांचाहि समावेश गौतमीपुत्राच्या राज्यांत होतो.

गौतमीपुत्र शातकर्णी यानें शातवाहन कुलाचें यश प्रस्थापित केलें व वाढविलें असें म्हटलें आहे, त्याअर्थी तो शातवाहन कुलांतील असून शातकर्णी व शातवाहन एकच याविषयीं शंका राहात नाहीं. त्याच्या कुळांत पूर्वी अनेक राजे झाले होते. यावरून त्याच्या आधीं शातवाहनांचें राज्य कित्येक पिढ्या चालू असल्याचें स्पष्ट दिसतें. चातुर्वर्ण्यसंकर थांबविल्याची त्यानें ग्वाही दिली आहे. बौद्धमतप्रसारामुळें चातुर्वर्ण्यसंस्थेस आलेली शिथिलता घालविण्याचा त्याजकडून प्रयत्न झाला याचा हा पुरावा आहे. एकब्राह्मण या पदाचा अर्थ ब्राह्मणावर निष्ठा ठेवणारा, म्हणजे वैदिक धर्माचा अभिमानी, असाच करावयास पाहिजे. ' आगमानां निलयः ' हें विशेषण, धर्म व शास्त्र जाणणारे जे शास्त्री व पंडित यांचा पोशिंदा असें दर्शवितें.

गौतमीपुत्रानें क्षहरातवंश निर्मूल केल्याचें वरील लेखांत सांगण्यात आलें आहे. हे क्षहरात म्हणजे क्षत्रप होत. ज्या क्षहरातांचें निर्मूलन झालें तो नहपान क्षत्रप. क्षत्रप शककाल वापरीत असत. नहपानाचा निर्देश शक ४६ मध्यें आढळतो. नहपानास गौतमीपुत्रानें आपल्या कारकिर्दीच्या १८ व्या वर्षी जिंकलें. म्हणजे गौतमीपुत्र इ. स. १२४ त होता. क्षहरात अर्थात् क्षत्रप, हे गौतमीपुत्राच्या पूर्वीपासून शातवाहनाचे प्रतिस्पर्धी होऊन राहिले असून त्यांनीं शातवाहनांचा बराच मुलुख घेतला होता. तो मुलुख गौतमीपुत्रानें नहपानास जिंकून परत मिळविला.

## वासिष्ठीपुत्र पुलुमावी

गौतमीपुत्र शातकर्णी याच्या आईचें नांव राज्ञी गौतमी बलश्री व पुत्राचें नांव वासिष्ठीपुत्र श्रीपुलुमावी. तोच शातकर्णीच्या मागून राज्यावर बसला. हें वृत्त इ. स. १३१च्या सुमारास घडलें. त्यानें किमान २४ वर्षें राज्य केलें. टॉलेमीच्या भूवर्णनाप्रमाणें त्याची राजधानी पैठण होती. पुलुमावी आपणांस

नवनरस्वामी, दक्षिणापथेश्वर व दक्षिणापथस्वामी म्हणवितो. मग नवनर म्हणजे पैठण कीं काय असा प्रश्न पडतो. त्याच्या ताब्यांतून पूर्व व पश्चिम माळवा, काठेवाड व पूर्व राजपुताना हा प्रदेश पश्चिमक्षत्रपांपैकीं चष्टन यानें घेतला. त्याचे लेख व नाणीं कान्हेरी, नाशिक व कार्ले येथील लेण्यांत, वऱ्हाडांत मंगळुरास, नागपुराकडे चांद्यास, आन्ध्र देशांत अमरावतीस, तसेंच अनंतपूर व कडाप्पा जिल्ह्यांत सांपडलीं आहेत. ज्यावर नौकेचें चिन्ह आहे, अशीं नाणीं मद्रास व कडलोर यांच्या दरम्यानच्या समुद्रकिनाऱ्यावर मिळालीं आहेत. यावरून त्याचें राज्य दक्षिणेस पांदेचेरीपर्यंत पसरलें होतें. अर्थात् यांत महाराष्ट्र, वऱ्हाड, नागपूर, कोंकण, आन्ध्र हा भाग आलाच.

वासिष्ठीपुत्र पुलुमावी याचा क्षहरात रुद्रदामन यानें दोनदां पराभव केला. पण रुद्रदामनानें आपली कन्या त्यास दिली असल्यामुळे त्याचा नाश केला नाहीं. याच्या कारकीर्दींत नाशिक, कार्ले, व कान्हेरी येथील कांहीं लेणीं खोदण्यांत आलीं.

वासिष्ठीपुत्र श्रीशातकर्णीनंतरच्या कांहीं शातवाहन राजांची माहिती असावी तितकी स्पष्ट नाहीं. पुराणांत शिवश्री शातकर्णी व शिवस्कंद शातकर्णी यांचीं नांवें आहेत. त्यांपैकीं प्रत्येकानें सात वर्षें राज्य केलें. वासिष्ठीपुत्र शिवश्री शातकर्णी याचीं नाणीं कृष्णा व गोदावरी जिल्ह्यांत सांपडलीं आहेत. अमरावती शिलालेखांत 'शिरी शिवमक सड' असें एक नांव आहे ( डॉ. देवरस ). हें बहुधा शिवखंड असावें. तसें मानल्यास पुराणांतील शिवस्कंद शातकर्णी व श्रीशिवखड हे एकच ठरतील.

## गौतमीपुत्र श्रीयज्ञ शातकर्णी

शिवस्कंद शातकर्णीनंतर गौतमीपुत्र श्रीयज्ञ शातकर्णी राजा झाला. पुराणावरून पाहतां त्यानें २९ वर्षें राज्य केलें. त्याचा काळ इ. स. १६९ च्या सुमारास येतो. त्याचे शिलालेख आन्ध्र देशांत कृष्णा नदीच्या मुखापाशीं चिन्ना येथें, महाराष्ट्रांत नाशिकापाशीं त्रिरश्मि पर्वतावर, व ठाणें जिल्ह्यांत कान्हेरीस आढळले आहेत. कान्हेरीस दोन शिलालेख असून त्यांपैकीं एक त्याच्या कारकिर्दीच्या सोळाव्या वर्षी लिहिलेला आहे. त्याचीं रौप्य नाणीं ठाणें जिल्ह्यांत सोपारें येथें व काठेवाडांत अमरेळीस सांपडलीं आहेत. माळव्यांत विसनगर

येथील उत्खननांत यज्ञश्रीचा शिक्काहि मिळाला आहे. माळव्यापर्यंत यज्ञश्रीची सत्ता पसरली असल्याचें हें गमक आहे. शिन्ना येथील शिलालेख यज्ञश्रीच्या कारकिर्दीचें २७ वें वर्ष दर्शवितो. त्यांत भगवान् वासुदेवाचें स्तवन आहे. यज्ञश्रीचा महत्तारक ( Chamberlain ) व महादंडनायक यांनीं केलेल्या धर्मकृत्यांची नोंद या शिलालेखांत आहे. नाशिक येथील २४ व्या लेण्यांतील शिलालेख यज्ञश्रीच्या कारकिर्दीच्या सातव्या वर्षी लिहिलेला आहे. यज्ञश्रीचा महासेनापति भवगोप याची पत्नी वसू हिनें बौद्धसंघास एक देणगी ( चैत्य ) दिल्याचा उल्लेख वरील लेखांत आहे. त्याच्या कारकिर्दीत नाशिकचें त्रिरश्मीवरील विसावें लेणें व कान्हेरीचें तिसरें लेणें पुरें झालें. या तिसऱ्या लेण्यावरील लेखांत कल्याण, सोपारें व पैठण यांचीं नावें असून पैठणच्या वाटेवरील टाक्यास दिलेल्या देणग्या नमूद आहेत. ही वाट नाणेघाटांतून जुन्नरावरून पैठणाकडे जाते. हीं सर्व प्रमाणें गौतमीपुत्राच्यावेळीं शातवाहनांची राजधानी पैठण असल्याचें दर्शवितात. एकंदरीत यज्ञश्रीचें साम्राज्य माळवा, काठेवाड, गुजराथ, कोंकण, महाराष्ट्र, नागपूर, आन्ध्र देश यांवर होतें. गौतमीपुत्र यज्ञश्री शातकर्णीनंतर पुराणांत विजय, चंडश्री शातकर्णी व पुलोम ( पुलुमावी ) या तीन राजांचीं नांवें आहेत. पुराणांतील माहितीप्रमाणें विजयानें सहा वर्षें राज्य केलें. त्याचीं नाणीं व शिलालेख उपलब्ध नाहींत. विजयामागून त्याचा पुत्र चंडश्री शातकर्णी याची कारकीर्द दहा वर्षें झाली. त्याचा एक शिलालेख पिठापुरंजवळ कोडवली येथें सांपडला आहे. याची तारीख रावबहादुर कृष्णशास्त्री यांच्या माहितीप्रमाणें डिसेंबर इ. स. २१० ही आहे. तें चंडश्रीच्या कारकिर्दीचें दुसरें वर्ष. 'रनो वासिष्टी, पुतस, सिरी चड सतीस' हे शब्द असलेलीं नाणीं आन्ध्र देशांत सांपडलीं आहेत.

चंडश्रीमागून पुराणांप्रमाणें पुलुमावी ( पुलोम ) राजा झाला. त्यानें सात वर्षें राज्य केलें.

यज्ञश्री शातकर्णी हा शातवाहन घराण्यांतील शेवटचा मोठा सम्राट् होय. त्याच्या मृत्यूनंतर शातवाहनांचे साम्राज्याचीं शकलें पडण्यास सुरुवात झाली. माळवा, गुजराथ व काठेवाड हा प्रदेश त्यांजपासून अभीर व क्षत्रप यांनीं

जिंकून घेतला. बाकीच्या साम्राज्याचे आन्ध्र देश, महाराष्ट्र व कर्नाटक असे तीन भाग पडले. पुढें आन्ध्रावरील शातवाहनांची सत्ता नाहींशी होऊन इक्ष्वाकूंचें राज्य झालें. हे इक्ष्वाकू आपणांस अयोध्येच्या इक्ष्वाकूंपैकीं म्हणवीत. नाशिकच्या त्रिरश्मि लेण्यांत अभीर राजा ईश्वरसेन याचा लेख आहे. त्यावरून महाराष्ट्राच्या कांहीं भागांत अभीर राजे झाले असावे. कोंकण व कानडा या भागांवर शातवाहन घराण्यांपैकीं चुटु कुलाचें राज्य असून त्याची राजधानी वैजयन्ती तथा वनवासी ही होती. त्यांचें नातें महारथी व महाभोज यांजबरोबर होतें. त्यांची सत्ता कर्नाटकांवरहि असावी. पुढें चुटूंना कदंबांनीं जिंकलें. हेंच वनवासीचें प्रसिद्ध कदंब राजघराणें.

## शातवाहनांचीं नाणीं

शातवाहन ऊर्फ आन्ध्र यांचीं वा त्यांच्या मांडलिकांचीं नाणीं बऱ्याच ठिकाणीं सांपडलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें— आन्ध्र देशांतील कृष्णा व गोदावरी या जिल्ह्यांत, मध्यप्रांतांतील चांदा जिल्ह्यांत, वऱ्हाडांतील मंगळूर तालुक्यांत, महाराष्ट्र व कोंकण यांतील कोल्हापूर, नाशिक व ठाणें या भागांत, कर्नाटकांतील अनंतपूर व कडाप्पा जिल्ह्यांत, मद्रास व कडलोर यांच्या दरम्यान, म्हैसूर संस्थानांतील चितळदुर्ग जिल्ह्यांत, कारवारांत व माळव्यांत, आणि निजाम राज्यांतील कोंडापुरांत. ज्या आन्ध्र राजाचीं नाणीं मिळालीं ते ( १ ) वासिष्ठीपुत्र श्री पुळुमावी ( २ ) वासिष्ठीपुत्र शिवश्री शातकर्णी ( ३ ) वासिष्ठीपुत्र चन्द्रशान्ति ( ४ ) गौतमीपुत्र श्रीयज्ञशातकर्णी ( ५ ) ( श्रीरुद्र ) शातकर्णी ( ६ ) शातकर्णी पुळुमावी ( ७ ) शिवश्री पुळुमावी ( ८ ) यज्ञ शातकर्णी ( ९ ) कर्ण शातकर्णी ( १० ) कुंभ शातकर्णी व ( ११ ) शक शातकर्णी.

महाराष्ट्रांतील सर्वांत पहिला संग्रह नागपूर प्रांतीं चांदा जिल्ह्याच्या ब्रह्मपुरी तहसिलींत सन १८८८ सालीं मिळाला. त्या संग्रहांत १९३ नाणीं असून तीं डॉ. होर्नेल यानीं शातकर्णी पुळुमावी, यज्ञश्री शातकर्णी व कणु शातकर्णी यांचीं ठरविलीं (प्रो. मिराशी). ह्यानंतरचा दुसरा संग्रह नाशिक जिल्ह्यांत जोगलठेंबी येथें सन १९०६ मध्यें हस्तगत झाला. त्यांत एकंदर तेरा हजार रुप्याचीं नाणीं

असून त्यांपैकीं चार हजार नाणीं एकट्या नहपानाचीं व बाकीचीं नऊ सहस्त्र नहपानाचींच पण त्यावर गौतमीपुत्र शातकर्णी याचा पुनः शिक्का मारलेलीं अशीं आहेत. अलीकडे तिसरा संचय थोड्या वर्षांपूर्वीं वऱ्हाडांत अकोलें जिल्ह्यांतील मंगरूळ या तालुक्याच्या गांवीं एका शेतांत उघडकीस आला. तीं सर्व दीड सहस्त्र नाणीं तांबें, कथील व शिसें यांच्या मिश्रणापासून बनविलेल्या पोटीन नामक धातूचीं व शातवाहनांचीं आहेत. त्यावर पुढील बाजूस सोंड वर केलेला हत्ती, सभोंवतीं तत्कालीन राजाचें प्राकृत भाषेतील नांव व मागील बाजूस आडव्या उभ्या ठेवलेल्या डंबेलसारख्या आकृति आहेत. त्यावर शातकर्णी पुलुमावी, शिवश्री पुलुमावी, यज्ञ शातकर्णी, कर्ण शातकर्णी, कुम्भ शातकर्णी व शक शातकर्णी यांचीं नांवें आहेत. सन १९४१ सालीं निजामशाहींतील आन्ध्र प्रांतात हैदराबादेपासून सुमारें ५० मैल अंतरावर कोंडापुरास शातवाहनांचीं नाणीं सांपडलीं असून तीं पोटीन व शिसें या धातूंचीं आहेत.

"शातवाहनाच्या नाण्यांवर बहुधा चैत्य (स्तूप) व लेख असतो. त्याशिवाय कठडा व त्याच्या आड वृक्ष किंवा वर सोंड केलेला हत्तीहि दाखवितात. नाण्यावरील भाषा प्राकृत असून संस्कृत राज्ञः या रूपाऐवजीं रञो, श्रीच्या ऐवजीं शिरी, यज्ञच्या ऐवजीं यञ, कृष्णाच्या ऐवजीं कन्ह अशीं रूपें लिहिलेलीं आहेत. आन्ध्र व क्षत्रप यांच्या नाण्यांवरून पाहातां इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या पहिल्या अर्धांत पश्चिम हिंदुस्थानांत प्राकृत व संस्कृत या दोन्ही भाषा बरोबरीनें वापरल्या जात होत्या. क्षत्रप नहपान याच्या त्रिरश्मीवरील एका लेखाचा मुख्य भाग संस्कृत आहे. त्यास जोडलेल्या दोन पुरवण्यांची भाषा संस्कृत—प्राकृत मिश्रित आहे. गौतमीपुत्र शातकर्णीच्या त्रिरश्मीवरील लेखांची भाषा प्राकृत आहे. नहपानाचे जुन्नर व कार्लें येथील लेख प्राकृत आहेत. पहिल्या रुद्रदामनाचा जुनागड येथील लेख ( इ.स. १५० ) संस्कृत आहे. आन्ध्र ( शातवाहन ) राजांचे सर्व लेख प्राकृत आहेत व लिपी ब्राह्मी आहे. फक्त कान्हेरी येथील पुलुमावीच्या राणीचा संस्कृत लेख आहे. त्रैकूटकांच्या नाण्यावरील भाषा शुद्ध संस्कृत आहे." ( Catalogue of the coins of the Andhra Dynasty, The Western Ksatrapas, The

Traikutaka Dynasty & the Bodhi Dynasty, by Edward James Rapson, M. A. ).

## शातवाहनांचीं नांवें

शातवाहनांची स्वतःचा नामोच्चार करण्याची पद्धति विचित्र आहे. ते आपला उल्लेख वासिष्ठीपुत्र, गौतमीपुत्र असा करतात. हीच रीत आन्ध्र देशांतील इक्ष्वाकू वंशांतील राजांची होती. त्याच्यांतहि माढरीपुत्र व वासिष्ठीपुत्र असे स्वतःस म्हणविणारे राजे होऊन गेले. त्यांच्या एका सेनापतीनेंहि आपणास वासिष्ठीपुत्र म्हटलें आहे. नाशिकच्या त्रिरश्मि लेण्यांतील शिलालेखात अभीर राजा ईश्वरसेन हाहि माढरीपुत्र आहे. तेव्हां या पद्धतीचा उलगडा करावयास पाहिजे. यासाठीं येथें एक उदाहरण घेऊं.—— शातवाहनांपैकीं गौतमीपुत्र शातकर्णी याच्या आईचें नांव राज्ञी गौतमी बलश्री व पुत्राचें नांव वासिष्ठीपुत्र पुलमावी. या सर्वांचीं मूळ नांवें शातकर्णी, बलश्री व पुलमावी अशीं आहेत. गौतमीपुत्र शातकर्णीची आई बलश्री ही आपणास गौतमी बलश्री म्हणविते. तसेंच गौतमीपुत्र शातकर्णीचा जो पुत्र तो वासिष्ठीपुत्र पुलुमावी. सबब शातकर्णीची आई बलश्री ही गौतम गोत्रीय कुलांतून शातवाहन कुलांत दिलेली दिसते. राजाच्या पुरोहिताचें जें गोत्र तेंच राजाचें गोत्र या पद्धतीप्रमाणें स्त्रीबरोबर सासरच्या घराण्यांत ह्या नांवाचा प्रवेश होई व तेंच नांव पुढें तिच्या पुत्रालाहि लावण्यांत येई. ही एक आडनांवांचीच विचित्र तऱ्हा दिसते.

## क्षत्रप ऊर्फ क्षत्रपालन

शातवाहनाच्या इतिहासाशीं क्षत्रपांचा निकट संबंध येतो. शातवाहनांपैकीं गौतमीपुत्र श्री शातकर्णी याचें क्षत्रपाशीं युद्ध होऊन त्यांत श्री शातकर्णी यानें त्याचा पराभव केला. तसेंच वासिष्ठीपुत्र पुलुमावी यास क्षहरात रुद्रदामनानें दोनदां जिंकलें असून वासिष्ठीपुत्र हा रुद्रदामनाचा जांवई होता. क्षत्रपांपैकीं नहपान याचा जांवई व सेनापती ऋषभदत्त ( उषवदात्त ) याचें राजकीय वर्चस्व दक्षिण गुजराथ, उत्तर कोंकण, नाशिक व पुणें जिल्हा यांवर असल्यानें महाराष्ट्राशींहि राज्यकर्ते या नात्यानें त्यांचा संबंध

पोंचतोच. यासाठीं क्षत्रप हे कोण व त्यांचें कार्य कोणतें याचा विचार येथें थोडा विस्तारानें करावयास पाहिजे.

क्षत्रप ही पदवी पार्थियन वा सीथियन राज्याची द्योतक आहे. मूळ फार्सी शब्द क्षत्रपावन म्हणजे भूपाल ( Protector of Land ). सध्याच्या इंग्रजी भाषेंत बोलावयाचें तर क्षत्रप म्हणजे व्हाइसरॉय. हिंदुकुश पर्वताच्या उत्तरेस बॅक्ट्रियाचें राज्य व बॅक्ट्रियाच्या पश्चिमेस पार्थियनाचें राज्य होतें. अशोकाच्या मृत्यूनंतर, म्हणजे खि. पू. २३१ पासून मौर्यांच्या हिंदुस्थानातील अमलास उतरती कळा लागली तेव्हां, बॅक्ट्रियांतील शकांनीं व पार्थियनांनीं हिंदुस्थानाचा कांहीं भाग जिंकून त्यावर आपले व्हाइसरॉय नेमले, तेच हे क्षत्रप होत. क्षत्रप हा राजकीय हुद्दा असून तो धारण करणारे पुरुष क्षहरात व चष्टन या दोन्ही घराण्यातील असत. क्षत्रपांचे पश्चिम क्षत्रप व उत्तर क्षत्रप असे दोन वर्ग पाडतां येतात. पश्चिम क्षत्रपांचें राज्य सुराष्ट्र, माळवा, कोंकण व महाराष्ट्राचा कांहीं भाग यांत, व उत्तर क्षत्रपांचें मथुरेंत होतें.

क्षहरात घराण्यांतील पहिला माहीत असलेला पुरुष भूमक. त्याचीं नाणीं अजमीर, गुजराथ, काठेवाड, माळवा यांत सांपडलीं असून त्यांत तो आपणांस क्षहरात व क्षत्रप म्हणवितो. क्षहरात घराण्यांतील दुसरा प्रसिद्ध राजा नहपान. त्यानें राजा ही पदवी धारण केली होती. त्याचीं चांदीचीं व तांब्याचीं नाणीं उपलब्ध आहेत. तीं शक ४१ ते ४६ पर्यंतचीं, म्हणजे इ. स. ११९ ते १२४ पर्यंतचीं सांपडतात. त्याच्या ताब्यांत माळवा, गुजराथ, राजपुतान्याचा कांहीं भाग, काठेवाड, उत्तर कोंकण, पुणें, नासिक व अहमदनगर जिल्हा हे होते. एकंदरींत त्याचें साम्राज्य फार विस्तीर्ण असून त्यानें ५० वर्षें राज्य केलें. त्याचा जांवई ऋषभदत्त व कन्या दक्षमित्रा. दक्षमित्रेनें नासिकच्या त्रिरश्मी डोंगरावर भिक्षूंकरितां एक लयन बनविलें. नहपानाचा मुख्य मंत्री अयम ( आर्यमन् ) हा वत्सगोत्री ब्राह्मण होता. त्यानें जुन्नर येथील लेण्यांत एक हौद व मंडप बांधला. नहपानाचा जांवई व दिनिकाचा पुत्र असा ऋषभदत्त यानें कार्ले येथील लेण्यांत चातुर्मासांत येऊन राहाणाऱ्या भिक्षुसंघाला करंजक हा गांव दिला. हा ऋषभदत्त

अजमीराजवळच्या पुष्करतीर्थावर स्नानासाठीं गेला होता. तेथें त्यानें आठ ब्राह्मणांचीं धर्मार्थ लग्नें केलीं. तसेंच नाशिक येथील त्रिरश्मीवरील लेण्यांत लिहिल्याप्रमाणें त्यानें तेथील भिक्षूंना कापड व कुशाण यांच्या खर्चासाठीं तीन हजार कार्षापण अक्षय निधीस दिले. ऋषभदत्त हा दानशूर व धर्मनिष्ठहि होता. तो नहपानाचा महाराष्ट्राच्या कांहीं भागावर सुभेदार असल्यामुळें त्यानें महाराष्ट्रांत इतका दानधर्म केला. गौतमीपुत्र शातकर्णी यानें नहपानाचा अगदीं निःपात केला.

क्षत्रप व महाक्षत्रप हे हुद्दे मंडलेश्वर व महामंडलेश्वर या संस्कृत हुद्याचे समानार्थक होत. क्षत्रपापेक्षां महाक्षत्रप श्रेष्ठ आणि त्याला अधिकार व स्वातंत्र्यही अधिक. क्षत्रपांपैकीं क्षहरातांची हकीकत वर दिली आहे. आतां चष्टनासंबंधीं थोडेंसें लिहितों.

चष्टन यानें आपलें राजघराणें इ. स. १२५ च्या सुमारास स्थापलें तें इ. स. ३०४ पर्यंत अव्याहत चालू होतें. त्याची राजधानी माळव्यांत उज्जयिनींत होती. चष्टनाचा पुत्र जयदामन इ. स. १२४ ते १५० पर्यंत राज्य करीत होता. चष्टन हा महाक्षत्रपाच्या हुद्यापर्यंत चढला; पण जयदामन क्षत्रपच राहिला. त्याचा पुत्र रुद्रदामन महाक्षत्रप झाला. त्याच्या गिरिनारवरील लेखावरून रुद्रदामनाच्या ताब्यांत पूर्व व पश्चिम माळवा, खंबायत, काठेवाड, उत्तर गुजराथ, मारवाडचा कांहीं भाग, कच्छ, सिंध व उत्तर कोंकण हा प्रदेश असल्याचें दिसून येतें. रुद्रदामन यानें शातवाहन राजा वासिष्ठीपुत्र पुलुमावी याचा दोनदां पराभव केला.

## शककाल व शालीवाहन शक

वरील क्षत्रप आपली कालगणना शककालावरून करीत. त्या कालगणनेचा आरंभ इ. स. ७८ पासून होतो. शककाल याचा अर्थ ज्या शकांचे ते मांडलिक होते त्यांचा काल. म्हणजे मांडलिक या नात्यानें त्यांनीं ती कालगणना चालविली. गौतमीपुत्र शातकर्णी यानें क्षत्रपांचा तसा शकांचाहि नाश केला. यावरून शककालगणना ही शातवाहनांनीं म्हणजे शालीवाहन सम्राटानें शकांवर जय मिळविल्याची द्योतक समजण्यांत येते. पण या समजुतीस ऐतिहासिक आधार दिसत नाहीं. शालीवाहन शक हा शब्दप्रयोग

अगदीं अलीकडचा आहे. यादवराजाच्या अखेरीपर्यंत या कालगणनेस शकनृप काळ अशीच संज्ञा होती. ऐहोळी येथील शक ५५६ मधील शिलालेखांत ' षट्सु पंचशतासु च समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ' असें म्हटलें आहे. बदामीचा चालुक्य राजा मंगलीश यानें तेथील विष्णूच्या लेण्यास एक गांव दान केला. त्यासंबंधाच्या शिलालेखांत आपल्या वाढत्या राज्याच्या बाराव्या वर्षी व शकनृपतीच्या राज्याभिषेकाला पांचशें वर्षे झालीं असता लेण्यांत विष्णूचें अद्भुत गृह रचिलें व विष्णु-प्रतिमेची प्रतिष्ठापना केली असें म्हटलें आहे. प्रसिद्ध ज्योतिर्विद भास्कराचार्य आपल्या सिद्धान्त–शिरो मणि ग्रंथांत ' रसगुणपूर्ण मही १०३६ समशक नृपसमये भवन्ममोत्पत्तिः ' असेंच लिहितात. या साधनाच्या आधारें, शककाल हा शक व शालीवाहन यांचा युद्धकाल नसून विशिष्ट शक राजाचा राज्याभिषेककाल दिसतो. चौदाव्या शतकांत विजयनगर राज्याचा संस्थापक बुकराय याच्या इ. स. १३५४ च्या लेखांत शालीवाहनाचा शक-संस्थापक म्हणून उल्लेख आढळतो. ( डॉ. आळतेकर यांचा, सह्याद्रि मासिक फेब्रुवारी १९४४ मधील ' शालि वाहन शक ' यावरील लेख ) ऐतिहासिक असा हा उल्लेख पहिलाच दिसतो. त्या सुमारास शकनृपति कालाऐवजीं शालिवाहन शक दक्षिणेंत रूढ आला असावा.

# प्रकरण तिसरें

## महाराष्ट्रांतील समाजस्थिति

### शातवाहन काल

महाराष्ट्राचे इतिहासाला ज्ञात असे सम्राट् शातवाहन होत. त्यांच्या काळांत महाराष्ट्रांतील समाज सुधारणेच्या मार्गावर किती मजल चालून आला होता हें पाहावयाचें आहे. वैदिक लोकांनीं भारतीयांची जी समाजरचना केली तिचें स्वरूप मनुस्मृति व याज्ञवल्क्यस्मृति यांजवरून आपणांस यथार्थत्वानें समजतें. या दोन स्मृतींपैकीं मनुस्मृतीचा काल महाभारताइतका जुना म्हणजे, इ. स. पूर्व २५० वर्षांचा मानला गेला आहे. मनुस्मृतीहून याज्ञवल्क्यस्मृति बरीच अर्वाचीन असून तिचा अंदाजी काल इ. स. १५० वर्षें हा आहे. या स्मृतिग्रंथांतून जी समाजरचना वर्णिलेली आहे, तिच्याहून भारतीय समाजरचना खास जुनी असली पाहिजे. मनुस्मृति ही एका लेखकाची कृति नव्हे. ती मनूनें फार प्राचीनकाळीं लिहिली व तिच्या मागाहून त्या त्या काळांतील लेखकानीं सभोंवतालच्या देशस्थितीकडे पाहून तिच्यांत फेरबदल केले, त्यांपैं शेवटचें स्वरूप बावीसशें वर्षांपूर्वीचें. तें स्वरूप इतकें परिणत व जुनें वाटतें कीं त्यास पोचण्यापूर्वी भारतीय समाजानें दोन हजार वर्षें सहज पाहिलीं असतील. कारण, मनुस्मृति व याज्ञवल्क्यस्मृति यांत सुमारें दोन हजार वर्षांपूर्वी रेखाटलेलें समाजचित्र आजहि हिंदुस्थानांत जर फार थोड्या फरकानें आढळतें तर त्यावरून येथील समाजांत किती मंद गतीनें फरक होत गेला आहे याचें आकलन आपणास होतें. हाच न्याय मनुस्मृतिकालीन समाजास लावला तर तो समाज त्यावेळीं दोनतीन हजार वर्षांहून कमी प्राचीन नसावा असें अनुमानतां येतें. या दृष्टीनें महाराष्ट्रीय समाज चार-पांच हजार वर्षांचा जुना असलेला पुढील विवेचनावरून समजेल. बनारस येथील हिंदु युनिव्हर्सिटींतील विद्वान प्राध्यापक डॉ. आळतेकर यांनीं कलकत्त्यास १९३९ सालच्या डिसेंबर महिन्यांत भरलेल्या अखिल भारतीय

इतिहास–परिषदेंत हेंच मत प्रतिपादिलें होतें. ते म्हणाले, ' वैदिक व पौराणिक पुराव्याच्या आधारें खिस्तपूर्व दोन हजार वर्षे अयोध्या, बिहार, मध्य भारत व दक्षिणेचा उत्तर भाग यांत आर्यांनीं वसाहत केली होती. '

शातवाहन राजे ज्यास हल्लीं आपण महाराष्ट्र म्हणतों त्यावर खिस्तपूर्व २३२ च्या सुमारास सत्ता स्थापन करते झाले. महाराष्ट्रांतील बरींचशीं बौद्ध लेणीं त्या काळाच्या सुमाराचीं आहेत. त्यांतील लेण्यांच्या आधारें महाराष्ट्रांत त्याकाळीं भारतीय समाजाचीं राजकीय, सामाजिक, धार्मिक व औद्योगिक सुधारणेचीं सर्व अंगें पूर्णपणें विकसलेलीं दिसतात. हिंदुस्थानांत ज्या असंख्य जाती सांप्रत विद्यमान आहेत, त्यांपैकीं बहुतेक जाती मनुस्मृतिकालीं उत्पन्न झाल्या होत्या. मनुस्मृतींत वर्णिलेल्या जाती हिंदुस्थानाच्या इतर भागांप्रमाणें महाराष्ट्रांतहि होत्या, त्याअर्थीं दोन हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्र देश हा भरतखंडांतील इतर प्रांतांशीं समान संस्कृतीचा बनला असल्याचें ओघानेंच कबूल करावें लागतें. विदर्भ देश महाराष्ट्राचाच सांप्रत विभाग असून त्याचें प्राचीनत्व सर्वमान्य आहे. परंतु ज्याचें प्राचीनत्व तितकें मान्य नाहीं असा महाराष्ट्राचा पश्चिम भाग होय. त्यांत ठाणें, कुलाबा, नाशिक, पुणें, सातारा हे जिल्हे मोडतात. तेथील लेणीं हा महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाचा ठेवा आहे. त्या लेण्यांचें बारकाईनें निरीक्षण केल्यास महाराष्ट्राच्या सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीच्या स्थितीवर प्रकाश पडतो.

त्यावेळीं महाराष्ट्रांत ब्राह्मण, क्षत्रिय, सोनार, लोहार, तांबट, कोष्टी, तेली, धनगर, गवंडी, सुतार, माळी, शेतकरी, रंगारी, कुरूड, व्यापारी, उदमी, दुकानदार, गंधी, वैद्य इत्यादि जातींचे व पेशांचे लोक राहात असून त्यांनीं आपापल्या भागांतील लेण्यांना लहानमोठ्या देणग्या दिल्या आहेत. या जाती महाराष्ट्राच्या पश्चिम भागांत चालणाऱ्या उद्योगधंद्यांच्या निदर्शक होत. त्यांतील ब्राह्मण सर्व जातींचें पौरोहित्य करीत, धर्मशास्त्रांचें ज्ञान देत, विद्या शिकवून मनुष्याच्या मानसिक व आध्यात्मिक उन्नतीस सहाय्यभूत होत, मंत्रिपदावर आरूढ होऊन राजांना राज्यकारभारांत सल्लामसलत सांगत आणि प्रसंगविशेषीं सेनापतित्वही स्वीकारीत. क्षत्रिय राज्य

चालवीत; सोनार स्त्री-पुरुष व मुली-मुलगे यांजकरितां सोन्या-रुप्याचे व रत्नांचे नानाविध अलंकार घडवीत. लोहार कुदळ, खोरीं व नांगरांचे फाळ बनवीत; तांबट भांडीं ठोकीत; कोष्टी लुगडीं, धोतरें व पासोड्या विणीत; तेली तीळ, जवस व करंज यांचें तेल गाळीत; धनगर मेंढ्या बाळगीत, लोंकर कांतीत व घोंगड्या उत्पादीत; गवंडी घरें बांधीत, सुतार लांकूड तासून त्याच्या तुळया, खांब, लगी पाडीत. माळी भाजीपाला, फळफळावळ व पुष्पवटिका लावीत; शेतकरी पिकें काढीत; रंगारी सूत व कापड—कपडे रंगवीत; बुरूड सुपें-टोपल्या विणीत; व्यापारी व उदमी मालाची देवघेव ने-आण करीत व पेढ्या चालवीत; गंधी औषधें व अत्तरें काढीत; आणि वैद्य औषधोपचार करून जनपदाचें आरोग्य संभाळीत.

या जातींचे उल्लेख येणेंप्रमाणें आढळतात. ' विष्णुदत्ता हिनें प्राणिमात्राच्या सुखासाठीं व हितासाठीं त्रिरश्मि पर्वत-विहारांत राहणाऱ्या व चार दिशांकडून आलेल्या भिक्षुसंघाच्या औषधाकरितां अक्षय निधि दिला. त्यांतील एक हजार कार्षापण कोष्ट्यांच्या श्रेणीपाशीं, दोन हजार कार्षापण ओडयंत्रिक ( गवंडी ) श्रेणीपाशीं व पांचशें कार्षापण तेल्यांच्या श्रेणीपाशीं ठेवले. ' ( त्रिरश्मि पर्वत, लेख १५ वा ). ' सारस्वत नांवाच्या रंगाऱ्यानें ५० नांगरांवरील कराची देणगी दिली. दुसरी देणगी दोन निवर्तनांची सोनारांच्या श्रेणीनें दिली.' ( भिमाशंकर लेणीं, जुन्नर, १४ वा लेख ) ' एक जमीन बुरुडाच्या श्रेणीनें व दुसरी तांबटांच्या श्रेणीनें दिली. ' ( भिमाशंकर लेणीं जुन्नर, १३ वा लेख ). 'धेनुकाकट येथील गंधी सिंहदत्त याची देणगी' ( कार्ले, लेख ४ था ). ' वैद्य सोमदेव यानें सातवें लेणें दिलें ' ( कुडे ). ' करहाकड ( कऱ्हाड ) येथील लोहार महिका यानें १४ वें लेणें दिलें ' ( कुडे ). ' माळीवेधक याचा पुत्र शिवप्रीति याचें लेणें ' ( कुडे ). 'धेनुकाकट येथील रहिवासी वेणुवास सुतार याचा पुत्र शामिका यानें लेण्याला चौकट बसवून दिली. ' ( कार्लें लेणें, लेख ५ वा व ६ वा ). ' व्यापारी व गृहपति नाग यानें दिलेलें लेणें ' ( कुडे लेणें १६ वें ). ' उदमी पुसनाक याची आई शिवदत्ता हिनें दिलेलें लेणें ( कुडे २२ वें लेणें ).

ब्राम्हणपुत्र अश्वीभूति यांचें नासिकच्या सीमेवरील शेत ऋषभदत्तानें त्याजपासून चार सहस्र कार्षापणांस खरेदी करून भिक्षूंना अन्नदान करण्यासाठीं दिलें. कौशिक कुलोत्पन्न महासेनापति भवगोप याची पत्नी वासु हिनें बहुत वर्षे अर्धवट राहिलेलें २० वें लेणें ( त्रिरश्मीवरील ) पुरें केलें. क्षत्रप राजा नहपान यानें पाऊण लक्ष कार्षापण देवब्राह्मणांना दान केलें. त्रिरश्मी वरील एका लेण्यास गोवर्धनाचा अमात्य सामक यानें राणीच्या आज्ञेनें देणगी दिली."

त्यावेळीं शातवाहन हे महाराष्ट्राचे सम्राट् असून कुलाबा जिल्ह्यांत माणगांव प्रांतीं महाभोज व अभीर ईश्वरसेन हे त्यांचे मांडलिक होते. नहपान व त्याचा जांवई ऋषभदत्त हे शक म्हणजे परदेशीय असूनहि त्यांनीं सनातन धर्म स्वीकारला होता. क्षत्रियांना उचित अशीं धर्मकृत्येंहि त्यांनीं केलीं. ऋषभदत्तानें गोवर्धन व शूर्पारक येथें धर्मशाळा बांधल्या, अन्न छत्रें घातलीं, आश्रम तयार केले, उदपान ( विहिरी ) खोदले, नद्यांवर धर्मार्थ नावा ठेवल्या, नद्यांना घाट बांधले आणि गोवर्धन व शूर्पारक येथील रामतीर्थ या स्थळीं चरक-सांप्रदायिक ब्राह्मणांना बत्तीस सहस्र नारळी दिल्या ( त्रिरश्मी लेणें १० वें व लेख १० वा ). सनातन धर्माला राजाश्रय असल्याचें हें जसें द्योतक आहे तसेंच नाणे घाटांतील शिलालेखांत दक्षिणापथाच्या राजानें अश्वमेध, अग्न्याधेय, ६० सहस्र गोदान व ब्राह्मणांना दान केल्याचा उल्लेख आहे, तोहि सनातन धर्माची भरभराट दर्शविणारा आहे यांत शंका नाहीं.

येथपर्यंतच्या विवेचनानें इतकें स्पष्ट झालें कीं महाराष्ट्रीय समाज सर्वोत परिपूर्ण उन्नत व जातिनिबद्ध होता. हा समाज खेड्यांत राहाणारा असल्यामुळें ग्रामव्यवस्था जातीवरच उभारली होती. ब्राह्मण, सोनार, लोहार, तांबट, कोष्टी, तेली, धनगर, गवंडी, सुतार, माळी, रंगारी, बुरुड, या प्रमुख जातींचा निर्देश वर आलाच आहे. या शिवाय इतर जातींचा निर्देश त्यांचें प्रयोजन नव्हतें म्हणून आला नाहीं इतकेंच. बाकी त्यावरून सदर जातींचें अस्तित्व नव्हतें असें कोणीहि समजणार नाहीं. समाजांतील फार मोठा, किंबहुना बहुसंख्याक वर्ग शेतकऱ्यांचा. त्यास प्रतिष्ठित नांव

कुटुंबिक; याचेंच अपभ्रष्ट रूप कुणबी. नाशिकच्या त्रिरश्मीवरील तेविसाव्या लेण्यांत कुटुंबिक धमण यानें हें लेणें निर्मिलें आणि पुणें जिल्ह्यांतील भाजें येथील एका लेण्यात तें लेणें शेतकऱ्याची पत्नी बाधा हिनें दिलें असें लिहिलें आहे. त्यावरून महाराष्ट्रांतील शेतकरी वर्ग इतर जातींच्या मागें नव्हता, सुधारलेला होता, असें समजून येतें. याशिवाय चौल, शूर्पारक, कल्याण, इत्यादि ठिकाणच्या व्यापाऱ्यांचीं व दुकानदारांचीं कितीतरी नावें लेण्यांनी प्रकटविलीं आहेत. या सर्वांत खेड्यांतील व्यवसायांची वांटणी जातिपरत्वें होऊन लोकांचें जीवन स्थैर्य पावलें होतें.

महाराष्ट्रांतील खेड्यांत स्थानिक लोकांशिवाय परकीय लोकहि स्थायिक होऊन ते त्यांच्या जातींच्या नांवानें ओळखले जात होते, व त्यावरून त्यांच्या जातीचें पृथक्त्वहि सिद्ध होतें. जुन्नराजवळच्या शिवनेरी लेण्यांत यवनांचीं व नाशिकच्या त्रिरश्मी लेण्यात शकांचीं नांवें आढळतात. शिवनेरीस यवन इरिल यानें एक देणगी दिली ( लेख २५ वा ), व यवन चितगतनाम यानें एक छत्र बांधलें ( लेख २८ वा ). नाशिकच्या त्रिरश्मीवर २४ व्या लेण्यांतील टाकें एका शकानें बांधलें. अशाच एका शकाचा उल्लेख याच लेण्यात असून उभयतांचा धंदा लेखक हा लावला आहे. म्हणजे हे दोन्ही शक इकडील समाजांत इतके एकरूप झाले होते कीं त्यांनीं स्थानिक प्राकृत भाषा आपलीशी केली असून ती त्याना लिहितां-वाचतां येऊं लागली होती. अर्थात् या सुमारास त्यांच्या अनेक पिढ्या या देशांत झाल्या, पण त्यांची जात मात्र वेगळी राहिली. जुन्नरच्या भिमाशंकर लेण्यांतील एक शक खेड्यांत शेती करूनहि होता. त्यानें वडलिक गांवीं करंजाच्या झाडाजवळची २० निवर्तन जमीन व तशीच कटपुटक गांवीं वडाच्या झाडाजवळची २ निवर्तन जमीन लेण्यांना लावून दिली. हा शक स्वतः नांगर धरणारा नसून पांढरपेशा शेतकरी असावा. कदाचित् त्यानें लेखकाचा किंवा सावकारी धंदा करून कांहीं जमिनी वेगळाल्या गांवीं संपादिल्या असाव्या. कार्लें येथील लेण्यांतील माहितीवरून धेनुकाकट हा गांव बराच पुढारलेला व मोठा वाटतो. हा गांव बहुधा कार्ल्याच्या जवळपास असावा. कारण तेथील रहिवाशांनीं कार्ल्याच्या लेण्यांना विविधप्रकारें

सहाय्य केलें आहे. त्या सहाय्यकांत गंधी, सुतार व यवनहि आहेत. तेथील यवनाचें नांव धम्म ( धर्म ) आहे. धेनुकाकट येथील उषभदत्त याचा पुत्र मितदेवनाक यानें लेण्याला एक खांब दिला, असें २१ व्या लेखांत म्हटलें असून १३ व्या लेखांत राजा क्षहराट क्षत्रप नहपान याचा जांवई ऋषभदत्त यानें करजक हा गांव भिक्षुसंघाना दिल्याचें लिहिलें आहे. हे दोन्ही ऋषभदत्त एकच दिसतात. यावरून शक लोक पुण्याच्या आसपास मावळांत स्थायिक झाले होते, व त्यांजपैकीं एक उषभदत्त ( ऋषभदत्त ) हा गांव इनाम देण्याइतका मोठा जहागीरदार अगर संस्थानिक असल्याचें उघड होतें. धेनुकाकट येथील रहिवाश्यांचा दानौघ कान्हेरीच्या लेण्याकडेहि वळला. धेनुकाकटचा रामनाक याच्या कन्येनें एक लेणें व टाकें दिलें आणि भिक्षूंना वस्त्रें देण्याचीहि व्यवस्था केली.

महाराष्ट्रांत व्यापार व उद्योगधंदे करणारे लोक आपल्या श्रेणी म्हणजे समूह करून राहात होते. जुन्नरजवळच्या भिमाशंकरावरील लेण्यांत अशा निरनिराळ्या श्रेणी आढळतात. धनगर नामक खेड्यांतील सोनारांच्या श्रेणीनें दोन निवर्तन जमीन २१ व्या लेण्याला दिली. अशा देणग्या बुरुडांच्या व तांबटांच्या श्रेणींनींही दिल्या आहेत ( मानमोड्या डोंगर, लेख १३ वा ). धान्याच्या व्यापारी श्रेणीनें सात खोल्या दिल्या ( तुळजा लेणीं, जुन्नराजवळ, लेख २८ वा ). गोवर्धन गावीं कोष्टयांची श्रेणी होती ( त्रिरश्मि लेणें १० वें, लेख १२ वा ). त्यांशिवाय गवंड्यांची श्रेणी व तेल्यांची श्रेणी यांचा निर्देश मागें आलाच आहे. याबाबतींत याज्ञवल्क्य स्मृतींतील खालील श्लोक महत्त्वाचा आहे.

> कुलानि जातिः श्रेणिश्च गणान्जानपदानपि ।
> स्वधर्माच्चलितान् राजा विनीय स्थापयेत्पथि ॥

या श्लोकांतील ' कुल ' शब्दानें कुटुंबाचा बोध होतो. श्रेणी हा एकच व्यवसाय करणाऱ्या कुटुंबांचा समूह. आणि गण म्हणजे एकच काम करणारे अनेक जातींचे लोक. समाजाचे हे सर्व घटक महाराष्ट्रांत त्या काळीं उपलब्ध होते. श्लोकांतील कुळें व जाती यांपैकीं कुळांविषयीं बोलावयासच नको. जातींचीं अनेक नांवें मागील विवेचनांत सांगितलींच आहेत. श्रेणी वर

आल्याच असून त्या आपला धंदा एकजुटीनें करीत असत. हल्लींप्रमाणें त्यांत व्यक्तिस्वातंत्र्य बोकाळलें नव्हतें. सोनार, तांबट, बुरूड, कोष्टी, गवंडी धान्याचे व इतर व्यापारी या सर्वांच्या श्रेणी होत्या. याचें कारण उघड आहे. ते खेड्यांत राहणारे असल्यामुळें त्यांना लागणारा कच्चा माल बाहेरून आणावयाचा व त्यांनीं बनविलेला माल बाहेर पाठवावयाचा, यास एकजुटीची फार आवश्यकता असे. सोनाराला सोनें, चांदी, तांबटाला तांब्याचे पत्रे भांडीं, कोष्टयांना सूत, तेल्यांना गळिताचें धान्य आणण्यास, आणि कोष्टयानें विणलेलें कापड किंवा तेल्यानें गाळलेलें तेल बाजारपेठेस रवाना करण्यास भांडवल बरेंच लागे व नेण्या-आणण्याकरितां बैल, घोडीं इत्यादि वाहनें लमाणामार्फत मिळविणें भाग पडे. ही सोय वैयक्तिक प्रयत्नापेक्षां सामुदायिक प्रयत्नानेंच सुकर आहे. हाच न्याय पैशाच्या देवघेवीला लागू आहे. त्या वेळचा व्यवहार हुंडीच्या रूपानें चालत असला पाहिजे. एखाद्या धनिक व्यापाऱ्यास अगर सावकारास व्यक्तिशः हुंडीचें दुकान चालवितां येतें. परंतु तुटपुंज्या धंदेवाईकांना तें शक्य नसल्यामुळें एका श्रेणीमार्फत तेव्हां हुंड्या पाठवीत किंवा पटवून घेत. हीं हुंडीचीं दुकानें पिढ्यान् पिढ्या चालत असल्याचें लेण्यांतील लेखांवरून सिद्ध होतें. कारण, त्यांजपाशीं लेण्यांत राहणाऱ्या भिक्षूंच्या गरजा भागविण्याकरितां अक्षय निधि ठेवण्यांत येत. या पद्धतीप्रमाणें उषभदत्तानें भिक्षूंना कापड व कुशान पुरविण्याकरितां दोन हजार कार्षापण गोवर्धनाम राहणाऱ्या कोष्टयांच्या श्रेणीपाशीं व्याजानें ठेवले ( त्रिरश्मि लेणें १० वें ). उपासिका विष्णुदत्ता ही शकजातीची असून तिनें भिक्षुसंघाच्या औषधप्रीत्यर्थ अक्षयनिधि ( निधि ) दिला. त्यांतील एक हजार कार्षापण कोष्टयाच्या श्रेणीपाशीं, दोन हजार कार्षापण गवंड्यांच्या श्रेणीपाशीं व पांचशें कार्षापण तेल्यांच्या श्रेणीपाशीं ठेवले. या अक्षयनिधीचें भांडवल श्रेणींना आयतेंच वापरण्यास सांपडून त्याच्या धंद्यास त्याचा चांगलाच उपयोग होत असे. आपल्या एकंदर प्राप्तींतून श्रेणी धर्मादायही करीत. श्रेणींची ही प्राप्ति वेगळी व त्यांतील व्यक्तींची प्राप्ति वेगळी. भिमाशंकरच्या ( जुन्नर ) लेण्यांना बुरुडाच्या व तांबटांच्या श्रेणींनीं जमिनी दिल्या ( लेख १३ वा ). सोनारांच्या श्रेणीनें दोन निवर्तन जमीन दिली ( लेख ८ वा ).

खेड्यांतील लोकांपाशीं आजही नाण्यांची टंचाई असते. त्यांना नाण्याऐवजीं धान्य देणेंच परवडतें. तीच स्थिति त्याही काळास लागू होती. म्हणून श्रेणींनें सावकारींत ज्या जमिनी मिळविल्या त्यांपैकीं एखादा तुकडा लेण्यांना देण्यास त्यांना जड वाटत नसे.

राधामाधवविलास-चंपूच्या प्रस्तावनेंत रा. वि. का. राजवाडे लिहितात : 'शकोत्तर चारशें पर्यंत महाराष्ट्रिकांत गणराज्य संस्था, एक-नायकी किंवा बहु-नायकी, प्रचलित होती. लहानशीं गणराज्यें चालविण्याचीच ऐपत या लोकांत असल्यामुळें यांच्याहून वरिष्ठ दर्जाच्या राज्यपद्धति ज्यांच्या होत्या अशा उत्तरेकडील व पूर्वेकडील सुधारलेल्या लोकांच्या अमलाखालीं शक पूर्व १०० पासून शकोत्तर १५५१ पर्यंत—म्हणजे सोळाशें वर्षे— महाराष्ट्रिकांना रखडावें लागलें !' रा. राजवाडे हे महाराष्ट्रांतील महाराष्ट्रिकांचा एक स्वतंत्र वंश समजून त्यांजवर राज्य करणारे शातवाहन, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव यांना परकीय मानतात, आणि, स्वराज्य—संस्थापक शिवछत्रपति यांनाच तेवढे महाराष्ट्रिक म्हणजे महाराष्ट्राचे कायम रहिवासी गणतात. परंतु तत्कालीन भरतखंडांत हल्लींसारखें प्रांतवैशिष्ट्य नव्हतें, व राजवाडे समजतात इतका शतकानुशतकें टिकणारा तुटकपणाहि नव्हता. सर्व प्रांतांत सारखी सरमिसळ सुरू असल्यानें राज्यव्यवस्थेंत महाराष्ट्रिक म्हणजे महाराष्ट्रीय तेवढे मागें पडले होते, व त्यांजवरील शातवाहनादिक राजे परकीय होते असें मानणें अन्यायमूलक ठरेल. गण ही समाजव्यवस्था एकट्या क्षत्रियांपुरतीच नसून वैश्यादिकांतहि असलेली वर दाखविलीच आहे. नाणेघाटांतील पुतळ्यानजीकच्या शिलालेखांत 'महरठी गनकयिरो' म्हणजे 'महाराष्ट्री किंवा महारथी गणकवीर' असे शब्द आहेत. या महारर्थींचा उल्लेख कार्ले, कान्हेरी इत्यादि लेण्यांतहि आहे. आणि रथी किंवा महारथी हे केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर कर्नाटकांतहि होते ('राष्ट्रकुटाज् अँड देअर टाइम्स' आळतेकर). तेव्हां महाराष्ट्रीय तेवढेच मागासलेले होते हें राजवाड्यांचें विधान निरर्थक आहे. इतकेंच नव्हे, तर रथी व महारथी एखाद्या प्रदेशांत असणें हें मागासलेल्या स्थितीचेंहि लक्षण नव्हे. महारथींचेहि गण होते याचा अर्थ इतकाच कीं वैश्यांप्रमाणें क्षत्रियांनाही आपले गण

आत्मरक्षणार्थ व परचक्रप्रतिकारार्थ बनवावे लागत. महारथींचे गण म्हणजे गणराज्यें नसून महारथींनीं आपली स्वतःची बनविलेली जूट होय. खुद्द महारथी हे सरदार किंवा सुभेदार अथवा अमात्य यांसारखे अधिकारी होते.

लेण्यांतील शिलालेखांत नायनिका व अग्निमितनाक असे शब्द आहेत. त्यांतील नाक हा प्रत्यय नागाचा सूचक आहे असें कल्पून डॉ. आळतेकर रथी व महारथी यांना नागपूजक मानतात. परंतु येथें 'नाके' याचा अर्थ 'नाग' न धरतां नायक धरणेंच सयुक्तिक होय हें वरील विवेचनावरून वाचकांचे लक्षांत येईल.

लेण्यांतील लेखांत इतरत्र गण शब्द आढळत नाहीं. पण नाक हा प्रत्यय सर्वत्र आढळतो. व तोही बहुधा व्यापाऱ्यांच्या नांवाला लावलेला असतो. त्यांचीं नावें गृहपति महादेव नाक (कार्लें, लेख ५ व ६ वा), दुकानदार पुसनाक (कुडें, लेणें २२ वें) व व्यापारी मसूलनाक (कुडें, लेणें १६ वें). महाराष्ट्रांत सांप्रत नाईक ही पदवी बहुमानाची समजून सराफ व सावकार यांना लावतात. गण व त्याचा नायक याना राजाकडूनही मान्यता मिळत असल्याचें याज्ञवल्क्य स्मृतींत म्हटलें आहे. गणाच्या स्वामित्वाचें जें द्रव्य तें गणद्रव्य व त्याची व्यवस्था पाहणारा तो गणनायक. गणनायक या द्रव्याची अफरातफर करील तर त्यास देशांतून हद्दपार होण्याची शिक्षा राजा देई. एरवीं आपली कामगिरी गणनायक योग्य रीतीनें पार पाडीत असतां तो राजाकडे कामकाजाकरितां गेल्यास त्याला राजानें सन्मानपूर्वक वागवावें व त्याला पारितोषिकानें संतुष्ट करून त्याचें काम ताबडतोब संपवावें असें याज्ञवल्क्य सांगतो. याज्ञवल्क्यानें वर्णिलेला जो गणनायक तोच लेण्यातील नायक होय. गणांचा संबंधही व्यापार व उद्योगधंदे यांच्याशीं असल्यामुळें व समायिक द्रव्याचा व्यवहार त्याच्या हातून होत असल्यानें तो लेण्यांत नमूद केल्याप्रमाणें व्यापारी असावा हें स्वाभाविक वाटतें. पण त्याजपाशीं श्रेणी जवळ ठेवीत तसे अक्षयनिधि ठेवीत नसावे म्हणून गणांचा निर्देश लेण्यांतून नाहीं.

महाराष्ट्रावर यावेळीं साम्राज्य शातवाहनांचें होतें. त्यांतील गौतमीपुत्र शातकर्णी यास नाशिकच्या तिसऱ्या लेण्यांत दक्षिणापथेश्वर अशी पदवी

दिली आहे. नाणे घाटांतील लेखांतहि दक्षिणापथाचा राजा याच अर्थाचे शब्द आहेत. या शातवाहनांचे कुलाबा जिल्ह्यांत महाभोज राजे मांडलिक असल्यामुळें महाराष्ट्र हा राजकीयदृष्ट्या तत्कालीन जगाच्या संसारांत पूर्णपणें उन्नत झाला होता. याचा अर्थ असा कीं कुल, जाती, श्रेणी, गण, जनपद, सामंत व सम्राट् यांनीं युक्त असा महाराष्ट्र-समाज दोन हजार वर्षांपूर्वीं नांदत होता.

लेण्यांतील शिलालेखांत गृहपति ही पदवी बऱ्याच स्थळीं आली आहे. उदाहरणें—गृहपति सयिती याचा पुत्र गृहपति शिवदास ( भिमाशंकर लेणीं, लेख १६ वा ); गृहपति महादेव नाक याची आई भायिला ( कार्ले लेख ५ वा व ६ वा ); गृहपति नाक ( कुडें लेणें १६ वें ). गृहपति म्हणजे मराठींतील घरधनी. ही पदवी वैश्यांना लावीत असत ( एपिग्राफिया इंडिका, भाग ७ वा ). हल्लीं जमिनीची मोजणी बिघा, एकर या रीतीनें होते. त्या काळीं ही गणती निवर्तन या मापानें होत असे. उदाहरणें—' शक अदूथम यानें वडलीक गांवीं करंजाच्या झाडाजवळ २० निवर्तन जमीन दिली '; ' कटकपुटक गांवीं वडाच्या झाडाजवळ दोन निवर्तन जमीन दिली ' ( भिमाशंकर लेणीं, लेख ८ वा ). गांवांत नांगरामागें कर घेत त्याला हल म्हणत. मीठ जमिनींत खाणी खणून काढीत. उदाहरण—' सारस्वत नांवाच्या रंगाऱ्यानें ५० नांगरांवरील कराची देणगी लेण्याला दिली ( भिमाशंकर लेणें २१ वें ). शाल्मली पद्रं हा गांव धर्मसेतू यानें वहिवाटावा व त्याचें उत्पन्न लेण्यांत येणाऱ्या भिक्षूंच्या योगक्षेमाकडे खर्च करावें. या गांवास ' हल ' माफ आहे. यांतील जमिनींत कोणी येऊं नये व मीठ काढूं नये, अशी राजा शातकर्णीची आज्ञा झाली ( त्रिरश्मी तिसरें लेणें ). नाण्यांत कार्षापण, प्रतिक, सुवर्ण हे प्रकार होते. पस्तीस कार्षापण म्हणजे एक सुवर्ण. कार्षापण हें भारतीय नाणें तांब्याचें व रुप्याचें असे. ' दोन हजार कार्षापण गोवर्धनास राहाणाऱ्या कोष्ट्यांच्या श्रेणीपाशीं व्याजानें ठेवावे ' ( त्रिरश्मी लेणें १० वें, लेखांक १० वा ). भिक्षूंना कपडे, कार्षापण व दरमहा एक प्रतिक देण्याकरितां देणगी ( कान्हेरे लेणें १२–१३ ).

शेतीच्या बाबतींत कोठें कोठें जमिनीचे मालक वेगळे व कुळें वेगळीं अशी स्थिती होती. मालक आपल्या जमिनी त्या प्रत्यक्ष कसणाराकडे लावीत. असे जे हल हांकणारे नांगऱ्ये, त्यांना हली म्हणत असून त्यांचा वर्ग निराळा होता. हली हीं उपरीं कुळें, पण जे जमिनीचे मालक व जमिनी कसणारे त्यांना कुटुंबी–कुणबी अशी संज्ञा होती. कालगणनेंत महिना व वार यांचा समावेश झाला नव्हता. निश्चित शक नव्हता. जो सम्राट् हयात असेल त्याच्या कारकीर्दीचें वर्ष लावीत. वर्षाचे ऋतु हल्लींप्रमाणें सहा असून प्रत्येक ऋतूचे ४ पक्ष पाडीत, व त्या पक्षांतील, म्हणजे पंधरवड्यांतील, दिवसांचें परिगणन प्रतिपदा, द्वितीया या पद्धतीनें करीत. उदाहरणार्थ, ‘ वर्षाणां चतुर्थे पक्षे, पंचमे दिवसे ’ ‘ संवत्सरे २४ ग्रैष्माणां पक्षे २ दिवसे १० (त्रिरश्मी लेणें ३ रें).

व्यक्तींचीं नांवें शिवभूति ( तुळजा लेणीं लेख ३५ वा ); शिवदास गृहपति ( भिमाशंकर लेणीं, लेख १७ वा ); गृहपति महादेव नाक ( कार्लें लेख ५ वा व ६ वा ); नाशिकच्या आनंद शेठीचा पुत्र पुष्यनाक ( बेडसें लेख १ ला ); रामदत्तानें लेणें व चैत्यगृह दिलें ( कुडें लेणें १५ वें ); ‘ वैद्य सोमदेव ’, ‘ वैद्य सोमदेवाचा बाप वैद्य मामकाविजय. सोमदेवाचे पुत्र नाग, ईशरक्षित, ईशपालित, शिवघोष ( कुडें लेणें ७ वें ); विष्णुदत्ता ( त्रिरश्मी लेणें १० वे लेख १५ वा ); ‘ महाक्षत्रप स्वामी नहपान याचा मुख्य मंत्री वत्सगोत्रज अयम यानें मंडप व टाकें दिलें ’ ( भिमाशंकर लेणें ५ वें ) अपदेव ( बेडसें लेख २ रा ); व्यापारी ऋषिपाल ( कान्हेरी ३० ते ३४ वीं लेणीं ); रामनाक ( कान्हेरी लेणीं ६७ ते ७६ ). या नांवांपासून पुढील अनुमानें निघतात—महाराष्ट्रांत शिवोपासना जोरांत होती. महाराष्ट्रांतील प्राचीन देवस्थानें त्र्यंबकेश्वर, भिमाशंकर, शंभूमहादेव, परळी–वैजनाथ, औंढ्यानागनाथ हीं महादेवाचीं आहेत त्याचें कारण तरी हेंच असावें. त्याच्या खालोखाल विष्णु व राम यांचीं नांवें आहेत. तीं विष्णुभक्तीचीं

द्योतक होत. अपदेव म्हणजे इंद्र किंवा वरूण; हें नांव ठेवण्याचा प्रघात तेव्हां होता पण हल्लीं नाहीं. ब्राम्हण उपनांव लावूं लागले नसून गोत्र लावीत असत. नागाची उपासना प्रचलित होती. ब्राम्हणांच्या नांवांत महाराष्ट्रीयांत तरी ऋषिपाल यासारखें नांव सांप्रत आढळणार नाहीं. महाराष्ट्रीयांत वैश्य वर्ण असला तर अगदींच अल्प आहे. पण त्यावेळीं हल्लींहून तो मोठा व संघटित होता. शेटी ही पदवी हल्लीं वैश्यांना लावतात. ती त्याकाळींहि लावीत असत. श्रेणीचा मुख्य तो श्रेष्ठी अर्थात् शेटी. दास, पाल हे प्रत्यय खास महाराष्ट्रीय वैश्यांच्या नांवांत तेव्हां आढळत; हल्लीं आढळत नाहींत. यावरून तत्कालीन महाराष्ट्रीय वैश्यांचीं नांवें हल्लींच्या परप्रांतीय गुजराथी वगैरे वैश्यांसारखीं असल्याचें स्पष्ट होतें.

वासिष्ठीपुत्राच्या राणीचें नातें क्षत्रपाशीं होतें (कान्हेरी लेणीं). गौतमीपुत्र शातकर्णी या शातवाहनाचा पुत्र वासिष्ठीपुत्र, हा महाक्षत्रप रुद्रदमन याचा जांवई होता. म्हणजे शक हे परकीय असूनहि त्यांजबरोबर शातवाहनांचा शरीरसंबंध जडला होता. नहपानानें आपला सेनापति ऋषभदत्त यास आपली कन्या दक्षमित्रा ही दिली होती. तिनेंहि ऋषभदत्ताप्रमाणें नाशीक व कार्लें येथील लेण्यांना बऱ्याच देणग्या दिल्या होत्या. गोवर्धन भागांतील दोनशें निवर्तन शेत गौतमीपुत्र शातकर्णी याच्या मालकीचें, ऋषभदत्ताच्या वहिवाटीस होतें. तें शातकर्णीनें त्रिरश्मीवरील लेण्यांना दिलें. याचा अर्थ असा कीं ऋषभदत्ताची वस्ती नाशिक व पुणें या दोनहि जिल्ह्यांत वर्षांतून कांहीं दिवस होत असावी. सारांश, शातवाहन, नहपान व ऋषभदत्त हे परस्परांचे आप्त असून शातवाहनांचा नहपान हा मांडलिक झाला होता.

गोवर्धन ही शातवाहनांची प्रांतिक राजधानी असावी. तेथील अमात्य शिवस्कंदिल, अमात्य विष्णु पालित, अमात्य सामक यांच्या नांवांचा निर्देश त्रिरश्मी लेण्यांत सांपडतो. ऋषभदत्तानें गोवर्धनास धर्मशाळा बांधली व सदर अमात्यांकरवीं शेत, गांव इत्यादि दानें लेण्यांना देवविलीं. त्रिरश्मी

( पांडु लेणीं ) कार्लें व कान्हेरी हीं लेणीं अनुक्रमें नाशीक, पुणें, व ठाणें या लगतच्या जिल्ह्यांत असून त्यांत संवत्सरहि वेगवेगळ्या शातवाहन राजांचा घातला आहे. तो शातवाहनांचें त्या तीन जिल्ह्यांवरील प्रभुत्व दाखवितो.

गौतमीपुत्र शातकर्णी याची माता जीवसुता हिच्या वचनावरून गोवर्धनचा अमात्य सामक यानें त्या नगराच्या सीमेवरील एक सरकारी शेत ( राजकं क्षेत्रम् ) त्रिरश्मीवरील प्रव्रजित भिक्षूंना दिलें. यापासून गोवर्धन प्रांतावरील शातवाहनांची सत्ता शाबीद होते. महाभोज सुधाकर शुद्धमानस, महाभोज मांडव अशीं नांवें कुडें येथील लेण्यांतून लिहिलेलीं आहेत. हे महाभोज कुलाबा जिल्ह्यातील माणगांव तालुक्याचे राजे होते. महाभोज हे शातवाहनांचे मोठे अधिकारी असतील. डॉ. देवदत्त भांडारकर लिहितात ( इंडियन ॲंटिक्वेरी ), ' महारथी, महाभोज व महासेनापति हे मोठे अधिकारी होते. महाभोज ठाणे व कुलाबा जिल्ह्यांत आणि महारथी हे पुणें व त्याच्या आसपास राहात. या अधिकाऱ्यांखालचे राजामात्य किंवा अमात्य, महामात्र व भाण्डागारिक या तिघांपैकीं पहिले दोघे सुभा किंवा कलेक्टर यांच्या हुद्याचे व तिसरा खजिनदार दिसतो.

खेड्यांचीं नांवें—' शाल्मली पद्रक, पिशाची पद्रक, करवडी, चिखलप्रद, दशपुर ' ( त्रिरश्मी लेणीं ). 'वानड ( जुन्नरापासून दोन कोसांवर असलेली वानवडी ), धनगर ( जुन्नरापासून अडीच कोसांवरील धनगरवाडी ), ओलण ( जुन्नरापासून साडेतीन कोसांवरील वकणगांव ), वडलिक, सेवरक ( सावरगांव ) ( जुन्नर लेणीं )'. ' धेनुकाकट, करजक, मरकुड, भोगवती ' (कार्लें व बेडसें लेणीं). ' मंगलठाण (मंगलस्थान) ' (कान्हेरी लेणीं) यांतील कांहीं खेडीं आजहि टिकून आहेत. खेड्यांशिवाय नगरेंहि होतीं. त्यांचीं नांवें करहाटक (कऱ्हाड), नासिक, गोवर्धन, चेमूल, कल्याण, सोपारें हीं होत. यांपैकीं चेमूल, कल्याण व सोपारें हीं बंदरें होतीं. ' गुजराथेंतील भडोच हें महाराष्ट्रास शेजारचें मोठें बंदर. त्याजबरोबर पैठणचा व्यापार चालत होता.

पैठणाहून भडोचला साधें सुती कापड व मलमल जात असे. मिसर देशाचा ( इजिप्तचा ) व्यापार पूर्व आफ्रिका व हिंदुस्थान यांच्याशीं चालत असून त्याचें हिंदुस्थानांतील बंदर भडोच. भडोचहून कल्याण, सोपारें, चेऊल या बंदरांना समुद्रांतून मालाची ने-आण होत असे ' ( डेक्कन ऑफ दी शातवाहन, डॉ. दे. रा. भांडारकर ). शिवाय नाशिक, ठाणें, कार्लें व जुन्नर येथील लेणीं हीं बौद्धांचीं मोठालीं केंद्रें असल्यामुळें त्यांजमार्फत महाराष्ट्राचा संबंध हिंदुस्थानांतील दुसऱ्या प्रांतांशीं स्वाभाविकच येत असे. गुजराथ, काठेवाड, सिंध, येथील बौद्धाभिमान्यांनीं इकडील लेण्यांना देणग्या दिल्या. इतकेंच नव्हे, तर अशा अभिमान्यांत इराणी आखातांतील अबुलामाचा रहिवासीही होता ( कार्लें, लेख २० वा ). उलटपक्षीं कऱ्हाड व नाशिक येथील अभिमान्यांनीं जबलपूर व अलाहाबाद यांजमधील भराऊत स्तूपास देणग्या दिल्या. महाराष्ट्राचा इतर प्रांतांशीं जर इतका व्यवहार चालत होता तर महाराष्ट्राचे देश व कोंकण हे जे दोन भाग त्यांचा परस्परांशीं किती दाट संबंध असेल हें सांगणें नलगे. राजकीय विभागांपैकीं आहार हा एकच विभाग या काळांत उल्लेखलेला आहे. मामल म्हणजे मावळ हा आहार होता.

---

# प्रकरण चवथें

## वाकाटक घराणें.

### विन्ध्यशक्ति

शातवाहन सत्तेचा शेवट व वाकाटक सत्तेचा उदय हीं बहुधा समकालीन दिसतात. वाकाट गांवचे रहिवासी म्हणून त्यांचें उपनांव वाकाटक. अमरावतीस सांपडलेल्या शिलालेखात वाकाटक हें एका कौटुंबिकाचें नांव आढळतें. डॉ. जयस्वाल यांच्या मतें वाकाट गांव खि. पू. दुसऱ्या शतकांतील असावें. वाकाटक प्रथम किलकिल नदीच्या आसमंतात् उदयास आलें. ही नदी पन्ना गांवाजवळ आहे. पुराणांतील वर्णनावरून पाहातां वाकाटकांचा पहिला प्रसिद्ध राजा विन्ध्यशक्ति, यानें आपलें राज्य माळव्यांत विदिशा नगराच्या आसपास स्थापलें. त्याचें राज्य वाढत वाढत साम्राज्याच्या दर्जाला पोंचलें. विन्ध्यशक्तीचा उल्लेख वऱ्हाडांत वाशीम गांवीं सांपडलेल्या ताम्रपटांत व अजंठा लेण्यांत आहे. वाशीमच्या ताम्रपटांत विन्ध्यशक्तीला हारितीपुत्र म्हटलें आहे. त्याचें गोत्र विष्णुवृद्ध. हें गोत्र फक्त ब्राम्हणच लावीत असल्यामुळें विन्ध्यशक्ति ब्राह्मण असावा असें वाटतें. त्यानें आप्तोर्याम, बृहस्पतिसव, ज्योतिष्टोम, वाजपेयादि यज्ञ व चार अश्वमेधहि केले होते. अजंठ्याच्या लेण्यांतील लेखांत तो शूर वीर असून त्यानें मोठाल्या लढाया केल्या, व दानें दिलीं असें त्याचें वर्णन आहे. इन्द्र व विष्णु यांची त्यानें पराक्रमांत बरोबरी केली असेंहि म्हटलें आहे. यातील अतिशयोक्तीचा भाग वगळल्यास विन्ध्यशक्ति हा एक प्रबळ राजा होता इतकें तरी निश्चित आहे. त्याचा ध्वज इन्द्र व विष्णु यांनीं आंकित होता. वाशीम ताम्रपटांत ३७ वें वर्ष लिहिलें आहे. तें विन्ध्यशक्तीच्या कारकिर्दीचें वर्ष असावें. त्यांत हेमन्त ऋतु, प्रथम पक्ष व त्या पक्षाचा चौथा दिवस दिला आहे. शातवाहनांच्या शिलालेखांतील कालगणनेची हीच पद्धत आहे.

विन्ध्यशक्तीच्या राज्यारोहणाचा नक्की काल कोठें उपलब्ध नाहीं, परंतु डॉ. जयस्वाल यांच्या मतें तो इ. स. २४८ असावा.

### प्रवरसेन पहिला

विन्ध्यशक्तीमागून त्याचा पुत्र प्रवरसेन पहिला, सिंहासनावर बसला. पुराणांत त्याला प्रवीर म्हटलें आहे. त्याच्या कारकीर्दीस प्रारंभ झाला तेव्हां त्याचें वय वीस वर्षांहून अधिक नसावें. त्यानें एकंदर साठ वर्षें राज्योपभोग घेतला. त्याच्या आमदानींत वाकाटक साम्राज्य फारच भरभराटलें. त्यानें वाजपेय यज्ञ करून ब्राह्मणांना दानें दिलीं असे पुराणांत सांगितलें आहे. ताम्रपटांतही या विधानास पुष्टि मिळते. अग्निष्टोम, आप्तोर्याम, अतिरात्र, वाजपेय, बृहस्पतिस्तव, व चार अश्वमेध या त्यानें केलेल्या यज्ञांचीं नांवें ताम्रपटांत आहेत. विन्ध्यशक्तीनेंही असेच यज्ञ केले होते. त्यावरून वैदिक धर्माचा पुरस्कार पितापुत्रांनीं जोरानें चालविल्याचें सिद्ध होतें.

प्रवरसेनानें कुंतल देशाच्या राजाला जिंकून त्याला आणि त्रिकूट व आन्ध्र येथील राजांना मांडलिकत्व कबूल करावयास लावलें. तो स्वतःला सम्राट् म्हणवूं लागला. त्याच्या ताब्यांत प्रयाग, वाराणसी व उज्जयिनी हीं पवित्र नगरें होतीं. त्याच्या साम्राज्याचे राजकीय पोटविभागांना राज्यें म्हणत असून त्यांपैकीं चार राज्यांवर त्यानें आपल्या चार पुत्रांना नेमलें होतें. त्याच्या चार पुत्रांतील एक गौतमीपुत्र याचें भारशिव घराण्यामधील महाराज भवनाग याच्या कन्येशीं लग्न झालें होतें. भारशिवांनीं दहा अश्वमेध केले व आपणास गंगाजलानें अभिषेक करून घेतला. अर्थात् ते संयुक्त प्रांतांत कोठें तरी स्वतंत्रपणें राज्य करीत असावे. गौतमीपुत्र आपल्या बापाच्या हयातींतच मरण पावला. तो शिवाचा अवतार भैरव याचा उपासक होता. प्रवरसेन साठ वर्षें राज्योपभोग घेऊन इ. स. ३२० च्या सुमारास मरण पावला. त्याची राजधानी चनका ही होती. त्याच्या मागून त्याचा नातू रुद्रसेन पहिला राज्याचा धनी झाला.

## रुद्रसेन पहिला

रुद्रसेनाच्या कारकिर्दीत वाकाटक साम्राज्याचे दिवस फिरले. प्रयाग, वाराणसी व उज्जयिनी यांजवरील वाकाटकांचा अंमल उडाला. सम्राट् ही पदवी लावण्याची पात्रता त्यांच्यात राहिली नाहीं. उज्जयिनी बहुधा पश्चिम क्षत्रपांनीं जिंकली असावी. रुद्रसेन हा समुद्रगुप्ताचा समकालीन दिसतो. समुद्रगुप्तापुढें वाकाटकांचें कांहीं न चालल्यामुळें माळवा व बुंदेलखंड यांतील वाकाटकांचे बरेच मांडलिक समुद्रगुप्ताचे अंकित झाले. समुद्रगुप्त माळवा व बुंदेलखंड घेतल्यावर दक्षिणेकडे चालून आला. दक्षिण—कोसलचा राजा महेन्द्र प्रथम त्याला बळी पडला. त्याच्या मागून महा-कांताराचा राजा व्याघ्रराज याची पाळी आली. त्यानंतर पिष्टापूरचा ( पिठ्ठापुरम् ) राजा महेंद्रगिरी व कोत्तूरचा राजा स्वामिदत्त हे त्याच्या तडाक्यात सांपडले. शेवटीं दक्षिणेच्या राजांनीं एकजूट करून कृष्णाकांठापाशीं समुद्रगुप्ताबरोबर निकराची झुंज दिली. या जुटींत कांचीचा राजा विष्णुगोप, वेंगीचा राजा, कुस्थलपूरचा धनंजय इत्यादि राजे होते. या झुंजीमुळें समुद्रगुप्ताची दक्षिणेकडील मोहीम खुंटली असावी. वाकाटकावर या मोहिमेचा किती परिणाम झाला हे समजण्यास मार्ग नाहीं.

## पृथ्वीसेन

रुद्रसेनामागून त्याचा पुत्र पृथ्वीसेन यास इ. स. ३४५ च्या सुमारास राज्यपद मिळालें. त्यानें वाकाटक साम्राज्याचें मंदावलेलें तेज बरेंच वाढविलें. अजंठा लेण्यांत लिहिलें आहे त्याप्रमाणें त्यानें कुंतलदेशाच्या राजास जिंकलें. पृथ्वीसेनाची तुलना युधिष्ठिराबरोबर केली आहे. त्यावरून तो 'युधिष्ठिराप्रमाणें नीतिमान व धर्मनिष्ठ राजा असावा असें वाटतें. तो बापाप्रमाणें मोठा शिवभक्त होता. पृथ्वीसेनास पुत्रपौत्र बरेच असून त्याची कारकीर्द बहुत वर्षे चालली.

## रुद्रसेन दुसरा

पृथ्वीसेनामागून त्याचा पुत्र रुद्रसेन दुसरा हा इ. स. ३८० च्या सुमारास राज्यावर आला. कवि कालिदास याजसंबंधीं पुढील दंतकथा प्रचलित आहे. राजा चन्द्रगुप्त दुसरा यानें रुद्रसेनाकडे आपला वकील म्हणून कालिदासास पाठविलें. पण रुद्रसेनानें त्याचा ठेवावा तसा मान ठेवला नाहीं. हें पाहून राजसभेंतील पंडितांत मोठी खळबळ उडाली. कालिदास बैठकीवर न बसतां भुईवर बसला व पंडितांना बसावयास भुईच चांगली असें तो म्हणाला.

चन्द्रगुप्तास पश्चिम क्षत्रपांविरुद्ध स्वारी करावयाची होती. त्यावेळीं वाकाटकांनीं त्या क्षत्रपांस मिळूं नये अशी चन्द्रगुप्ताची इच्छा असून हें कारस्थान आपली कन्या प्रभावती गुप्ता हिला रुद्रसेनास देऊन चन्द्रगुप्तानें तडीस नेलें.

रुद्रसेन विवाहानंतर दहा वर्षांनीं मृत्यु पावला असें दिसतें. त्याला दिवाकरसेन व प्रवरसेन हे दोन पुत्र होते. वडील पुत्र दिवाकरसेन यास युवराज नेमून राणी प्रभावती गुप्ता हिनें राज्यशकट चालविला. या बनावामुळें वाकाटक राज्यावर गुप्तांचा पगडा वाढला. कारण, त्या काळांतील वाकाटकांच्या ताम्रपटांत वाकाटकांऐवजीं गुप्तांची वंशावळ दिली आहे. दिवाकरसेन वयांत येण्यापूर्वी व सिंहासनावर बसण्यापूर्वीच मेला असावा. म्हणून त्याचा धाकटा भाऊ प्रवरसेन दुसरा तथा दामोदरसेन गादीवर बसला. प्रवरसेनानें महाराष्ट्र भाषेंत 'सेतुबंध' नामक काव्य रचल्याची आख्यायिका आहे. सेतुबंधावरील टीकेंत टीकाकार रामदास म्हणतो कीं गुप्त राजा चंद्रगुप्त विक्रमादित्य याच्या आज्ञेवरून कालिदासानें प्रवरसेनाकरितां हें काव्य लिहिलें.

प्रवरसेनाचे बरेच ताम्रपट उपलब्ध आहेत. त्याचा पट्टण येथील ताम्रपट त्याच्या कारकिर्दीच्या २७ व्या वर्षी दिलेला आहे. त्यांत अश्वत्थ खेड्यांतील ४०० निवर्तन जमीन धर्मशाळेची व्यवस्था ठेवण्यासाठीं दिल्याचा मजकूर आहे. प्रवरसेनाची राजधानी प्रवरपूर ही होती. वर्धा जिल्ह्यांतील

पवनेर हेंच तें गांव असावें; प्रवरपुराची स्थापना प्रवरसेनानें केली. त्यापूर्वी नागपुराजवळील रामटेकाशेजारचें नन्दिवर्धन ही वाकाटकांची राजधानी होती.

प्रवरसेनामागून त्याचा पुत्र नरेंद्रसेन राजा झाला. त्यानें इ. स. ४३५ ते ४७० पर्यंत राज्य केलें. कुन्तल देशाची राजकन्या अजित–भट्टारिका हिच्याबरोबर त्याचें लग्न लागलें. ती बहुधा कदंब राजघराण्यांतील असावी. नरेंद्रसेनानें प्रभुत्व कोसल, मेकल व माळवा येथील राजांवर होतें. पैकीं कोसल म्हणजे अर्वाचीन छत्तीसगड व मेकल म्हणजे ज्यांत मेकल पर्वत आहे तो मंडला जिल्हा.

नरेन्द्रसेनामागून त्याचा पुत्र पृथ्वीसेन दुसरा गादीवर बसला. त्यानें जबलपूर जिल्ह्यांतील व्याघ्रदेव राजास जिंकलें. ही गोष्ट इ. स. ४७० च्या सुमारास घडली असावी.

पृथ्वीसेन इ. स. ४८५ च्या सुमारास मेल्यावर त्याच्या चुलत्यानें आठ वर्षें राज्य केलें. त्याच्यानंतर त्याचा पुत्र देवसेन राज्यावर आला. त्यानें वत्सगुल्म तथा वाशिम येथून शांडिल्य गोत्रज भवस्वामि यास एक खेडें दान केल्याचा ताम्रपट उपलब्ध आहे. देवसेनाचा हस्तिभोज हा मुख्य मंत्री होता.

देवसेनामागून त्याचा पुत्र हरिसेन याजकडे राज्याचा वारसा आला. त्याच्या कारकिर्दींत मुख्य मंत्रिपद हस्तिभोजाच्या पुत्राकडे होतें. हरिसेनानें कुंतल, अवन्ती, कलिंग, कोसल, आन्ध्र व लाट येथील राजांना निष्प्रभ केल्याचा मजकूर अजंठा शिलालेखांत आहे.

अजंठ्याचीं जगप्रसिद्ध रंगीत चित्रें याच राजाच्या कारकिर्दींत काढण्यांत आलीं. हरिसेनानंतर वाकाटकांचा शेवट कसा झाला हें समजत नाहीं. त्यांच्या मागून नल व कलचूरी यांचा उदय झाला.

---

# प्रकरण पांचवें

## बदामीचें चालुक्य घराणें.

( इ. स. ५०० ते ७५० )

### पुलकेशी पहिला

चालुक्यांचें घराणें मूळचें अयोध्येकडील. त्यांचें गोत्र मानव्य. देवांचा सेनापति कार्तिकेय याची त्यांजवर कृपा होती. नारायणानें त्यांना ध्वज दिला त्यावर वराह होता. त्यांचा मुकुट वराहलांच्छित होता. ब्रह्मदेव प्रात:संध्येस बसला असतां त्याजकडे इन्द्रानें येऊन जगांत यज्ञयाग बंद पडल्याचा शोक केला. तेव्हां ब्रह्मदेवानें आपल्या हाताच्या चुळक्याकडे पाहिलें व त्यांतून एक पुरुष निर्माण केला. तोच चालुक्यांचा मूळ पुरुष अशी कथा आहे. चालुक्यांचा पहिला ज्ञात राजा जयसिंह. जयसिंहामागून रणराग, व रणरागामागून त्याचा पुत्र पुलकेशी पहिला राज्याचा धनी झाला. रणराग फार बलाढ्य व शूर निपजला. त्याच्यामागून पुलकेशीस इ. स. ५५७ च्या सुमारास सिंहासन मिळालें. राजा पुलकेशी यानें अश्वमेध केला. इद्रानें ब्रह्मदेवापाशीं येऊन पृथ्वीवर यज्ञयाग बंद पडल्याविषयीं खेद दर्शविला होता या कथेचा संदर्भ बौद्ध सांप्रदायाच्या प्रसाराशीं व अश्वमेधाशीं लागतो. अश्वमेध हा यज्ञ अत्यंत प्राचीन असून त्यांत यज्ञ केलेला घोडा स्वर्गाला जातो. या घोड्यास मारून व त्याचें मांस शिजवून त्याच्या आहुती अग्नीला द्यावयाच्या असतात. हा घोडा मोडल्यावर त्यास शत्रूनें धरून ठेवल्यास यज्ञाचा नाश होतो. प्रस्तुत यज्ञ सार्वभौम किंवा अभिषिक्त राजानें करावयाचा असून ज्याला सर्व काम सिद्ध व्हावयास पाहिजेत, सर्व जय मिळवावयास पाहिजेत व सर्वोत्कर्ष साधावयास पाहिजे त्यानें हा यज्ञ करावा. अश्वमेधांची सुरुवात शातवाहन व वाकाटक राजे यांनींहि चालुक्यांपूर्वीं केली होती हें विसरतां कामा नये.

अश्वमेध हा मोठ्या राजांनीं करावयाचा यज्ञ पुलकेशीनें पार पाडला यावरून त्याच्या राज्यविस्ताराची कांहींशी कल्पना येते. पुलकेशीनें वातापी तथा बदामी ही आपली राजधानी केली. त्यापूर्वी बदामी हें पल्लवांचें उत्तरेकडील एक महत्वाचें ठाणें होतें. त्यानें आपणास ' सत्याश्रय श्रीपुलकेशी वल्लभ महाराज ' अशी पदवीहि घेतली. वनवासीचा कदंबराजा हरिवर्मा याजपासून बदामीच्या पश्चिमेचा कर्नाटकाचा बराच भाग पुलकेशीनें जिंकून घेतला.

## कीर्तिवर्मा

पुलकेशीमागून त्याचा पुत्र कीर्तिवर्मा हा इ. स. ५६६ च्या सुमारास गादीवर बसला. त्यानें बापाच्या वेळेपेक्षां आपलें राज्य पुष्कळच वाढविलें. शातवाहनांची सत्ता बुडाल्यावर दक्षिणेंत ज्यांनीं आपली सत्ता वाढविली त्यांपैकीं कदंब, मौर्य व नळ यांचीं राज्यें होतीं. कदंब पश्चिम कर्नाटकावर राज्य करीत होते. कोंकणावर मौर्यांचें राज्य होतें व पूर्वेच्या अंगास नळ-नामक राजघराणें होतें. तें बहुधा नळदुर्गास असावें. या सर्वांचा कीर्तिवर्म्यानें पराभव केला. त्यानें कदंबाचें राज्य कदंबराजा कृष्णवर्मा २ रा याजपासून वनवासीसुद्धां जिंकलें व कोंकणांत जाऊन मौर्यांनाहि आपलें वर्चस्व कबूल करावयास लावलें. बदामीचीं लेणीं खोदण्यास यानेंच सुरुवात केली ( हिस्टॉरिकल इन्स्क्रिप्शन्स ऑफ सदर्न इंडिया, पृष्ठ २१ ). कीर्तिवर्मा हा शास्त्रांत निपुण व वर्णाश्रमधर्म पाळणारा होता. व्याघ्रस्वामी नामक राज-नीतिविशारद पुरुष त्याचा मुख्य मंत्री होता. त्याच्या विनंतीवरून कीर्ति-वर्म्यानें तुलगल नांवाचा गांव कृष्णस्वामी या वेदपारंगत ब्राह्मणास दान केला.

## मंगलीश

कीर्तिवर्म्यामागून त्याचा धाकटा भाऊ मंगलीश इ. स. ५७८ च्या सुमारास ( शक ५०० ) राजा झाला. त्यानें आपल्या पराक्रमांना वडील भावाच्या कारकिर्दीतच सुरुवात केली होती. त्याजपाशीं घोडदळ प्रबळ असून

त्याच्या जोरावर त्यानें पूर्व व पश्चिम किनाऱ्यावर स्वाऱ्या केल्या. उत्तर महाराष्ट्र व माळवा यांवर चेदी देशाचा कलचुरी राजा बुद्धराज याचा अंमल होता. त्याचा मंगलीशानें इ. स. ६०७ च्या सुमारास धुव्वा उडविला. मंगलीशाच्या पश्चात् राज्याचा खरा वारस कीर्तिवर्म्याचा पुत्र पुलकेशी. पण मंगलीशानें स्वार्थबुद्धीनें आपल्या पुत्रास (ध्रुवराज) गादी मिळवून देण्याचा घाट घातला. त्यास पुलकेशीनें अर्थातच विरोध केला. त्यामुळें मंगलीश व पुलकेशी यांजमध्यें यादवी माजली व तिच्यांत मंगलीश मरण पावला व त्याच्या मागून पुलकेशी दुसरा हा शक ५३२ त (इ. स. ६११) गादीवर बसला.

मंगलीश यानें आपल्या कारकिर्दीत बदामीस चांगलें स्वरूप आणिलें. पुलकेशी पहिला यानें अश्वमेध करून वैदिक धर्माच्या त्या प्रमुख अंगाविषयीं आपली पसंती दर्शविली, तर मंगलीशानें लेणें निर्मून १ गुणोपासनेस प्रोत्साहन दिलें. हें लेणें बदामी नगरांतच असल्यामुळें बदामीच्या सौंदर्यात भर पडली आहे. तेथें चार लेणीं असून त्यांपैकीं विष्णूचें लेणें मंगलीशानें निर्मिलें आहे. यात विष्णु, लक्ष्मी, गरुड, वामन, बळी, त्याची भार्या व शुक्र यांच्या सुंदर मूर्ती आहेत. मंगलीशानें या लेण्याला एक गांव दान केला, त्यासंबंधाच्या शिलालेखांत पुढील माहिती मिळते.

"चालुक्य कुळांतील पुरुषांनीं अग्निष्ठोम, अग्निचयन, वाजपेय, पौण्डरिक, बहुसुवर्ण व अश्वमेध हे यज्ञ केले होते. त्यांतील राजा मंगलेश्वर यानें आपल्या वाढत्या राज्याच्या बाराव्या वर्षी शकनृपतीच्या राज्याभिषेकाला पांचशें वर्षे झालीं असतां लेण्यांत विष्णूचें अद्भुत गृह रचिलें व विष्णुप्रतिमेची प्रतिष्ठापना केली. निविघ्न लिंगेश्वर नांवाचा गांव नारायणबलीसाठीं सोळा ब्राम्हणांना दानाकरितां व उरलेलें उत्पन्न संन्याशांना भोजन घालण्याकरितां दिला."

पैकीं अग्निष्टोम यज्ञाची माहिती येणेंप्रमाणें देतां येते. हा यज्ञ उपनयनाप्रमाणें त्रैवर्णिकांना आवश्यक आहे. तो सोमयज्ञांपैकीं एक नमुनेदार यज्ञ आहे. यांत अग्निची स्तुति आहे. हा प्रतिवर्षी वसंतऋतूंत पौर्णिमेस अथवा अमावास्येस करावयाचा असतो व एका दिवसांत संपवावा लागतो. **अग्निचयन**—जगाची उत्पत्ति, स्थिति व लय यांचें चक्र सतत फिरत आहे. त्या ईश्वरी कार्यास हातभार लावणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे. अग्नि ही सर्वश्रेष्ठ ईश्वरी शक्ति असून तिच्यापासून प्राण व शक्ति उत्पन्न होते. या यज्ञाकरितां विटांची वेदी (alter) बांधणें म्हणजे विश्वनिर्मितीच्या कार्यास मदत करणें आहे. तें कार्य या यज्ञानें साधतें. **वाजपेय**—हा यज्ञ ब्राम्हण व क्षत्रिय यांनीं करावयाचा. राजा स्वराज्यासाठीं म्हणजे इन्द्रपदप्राप्तीसाठीं तो करतो व ब्राह्मण अत्यंत विद्वान व भाग्यवान व्हावें म्हणून करतो. हा यज्ञ १७ दिवस चालत असून त्यांत १७ पशू मारण्यांत येतात.

बौद्ध सांप्रदायांत लेण्यांची कायमची व्यवस्था करीत; त्याच धर्तीवर मंगलीशानेंहि व्यवस्था केली. जशा बौद्ध लेण्यांत गौतमाच्या मूर्ती तशा या लेण्यांत विष्णूच्या अवताररूपी विविध मूर्ती, बौद्ध लेण्यांत जशी बौद्धभिक्षूंची वस्ती तशीच सनातनी लेण्यांत संन्याशांची वस्ती. या लेण्यापासून पलीकडच्या अंगास खालच्या दरींत उतरलें कीं बदामीचें विस्तीर्ण तळें येतें. तें लेण्यांतील संन्याशांना स्नानपानांस अगदीं नजीक आहे.

## पुलकेशी दुसरा

मंगलीश मरून पुलकेशी सिंहासनावर स्थिर होईपर्यंत कांहीं काळ अस्वस्थतेंत गेला. त्या काळांत आपला अंमल मुलुखांत पक्का बसविण्याकरितां पुलकेशीच्या आप्पायिक व गोविंद या सेनापतींनीं भीमेच्या उत्तरेकडील प्रदेशांवर स्वारी केली. त्यांपैकीं आप्पायिक पराभव पावला व गोविंद विजयी झाला. स्वतः पुलकेशीहि पराक्रमी असल्यामुळें तो सेनापतीवर अवलंबून राहाणारा नव्हता. त्यानें कदंबांची राजधानी वनवासी हिजवर स्वारी

करून ती जिंकली. तेथून तो उत्तरेस कोंकणांत शिरला. कोंकणावर मौर्यांचें राज्य असून त्यांची समुद्रकाठीं पुरी (दंडाराजपुरी) ही राजधानी होती. तिला जमिनीवरून सैन्याकडून व समुद्रावरून नौकांकडून वेढा घालून पुलकेशीनें मौर्यांचा पराभव केला. दक्षिणेस केरल व चेर या प्रांतांत शिरून तेथील राजांची त्यानें मैत्री संपादली. पल्लव राजा महेंद्र, यास उत्तर आन्ध्रांतून पिटाळून लावलें व त्याजपासून पिठापूर हें नगर घेतलें. चेदी व कलिंग येथील राजेहि त्यास शरण आले.

यावेळीं उत्तर भारतांत कनोज येथे हर्षवर्धन नांवाचा राजा राज्य करीत होता. तो पुलकेशी इतकाच बलाढ्य होता. पुलकेशीच्या आक्रमणापासून भय उत्पन्न होऊन तो प्रतिकाराची तयारी करीत असतां पुलकेशी नर्मदा उतरून त्याच्याच मुलखांत शिरला. पुलकेशीनें हर्षवर्धनाचे बरेच हत्ती मारून त्याजवर जय मिळविला. पुलकेशीसहि या विजयानंतर हर्षवर्धनाचें भय होतेंच. त्याकरितां व उत्तरेकडून त्याच्या राज्यावर चालून येणाऱ्या कोणाहि राजाच्या बंदोबस्ताकरितां त्या बाजूस कायमच्या सैन्याची जरूरी असल्यामुळें पुलकेशीनें नर्मदा ही आपल्या राज्याची उत्तरसीमा समजून तिजवर कायमचें सैन्य ठेवलें. उत्तरेकडील विजयांचें चिन्ह म्हणून त्यानें आपणास परमेश्वर ही पदवी घेतली.

पुलकेशीच्या कारकिर्दींत चालुक्यांच्या सार्वभौमसत्तेचा फैलाव पुष्कळच झाला. सार्वभौमसत्ता वाढली म्हणजे तितकें स्वराज्य वाढत नसलें तरी त्या प्रमाणांत स्वराज्याची अभिवृद्धि होतेच. सार्वभौम राजा कितीही प्रबळ झाला तरी तो ज्या ज्या राजाला जिंकील त्या त्या राजाचा मुलूख खालसा करण्याची आर्यांची रीत नव्हती. त्यास शरण आणून त्याजपासून खंडणी घेतली म्हणजे सार्वभौमराजा स्वतःस कृतकृत्य मानी. दुसरें असें कीं, इतका विस्तृत मुलूख सार्वभौम राजानें खालसा करण्याचें मनांत आणिलें तरी तो कायमचा ताब्यांत ठेवणें प्रवाससाधनांच्या अभावीं शक्य नसे. ज्यांनीं

सार्वभौमत्व कबूल केलें ते मांडलिक राजे संधि येतांच सार्वभौमसत्तेस लवकर झुगारून देऊन स्वतंत्र होत आणि स्वतंत्र झाल्यावर सार्वभौमराजाच्या अंगांत पूर्वीचें सामर्थ्य शिल्लक असल्यास सार्वभौम राजा पुनः स्वारीस निघे व आपली सत्ता स्थापण्याचा प्रयत्न करी. प्रत्येक राजापाशीं कांहीं सैन्य पगार देऊन कायमचें ठेवावेंच लागे. पण हल्लींसारखें राजशासन-यंत्र व्यापक, तपशील-वार व चोख नसल्यामुळें सैन्याचा खर्च सरकारी उत्पन्नाच्या बाबींमधून भागविणें अशक्य होऊन एका राजानें दुसऱ्या राजाच्या मुलखांत शिरून तो लुटणें व खंडणी उकळणें हा एकच उपाय होता. एकमेकांच्या मुलुखा-वर वारंवार स्वाऱ्या होण्याचें हेंच मुख्य कारण होय.

तथापि सार्वभौम राजाचें स्वराज्य असे व त्या स्वराज्याच्या विस्तारावरच त्याचें वैभव व सामर्थ्य अवलंबून राही. व्यवस्थेसाठीं स्वराज्याचे लहान विभाग पाडण्यांत येत व त्यांचा कारभार सामंत ( सुभेदार ) पाहात. सामंत लायकी पाहून नेमले जातच. पण राजघराण्यांत संतति उत्पन्न होऊन राजपुत्र व राजबंधु वयांत आले म्हणजे त्यांना राज्यकारभारांत जोखमीचीं कामें दिल्यानें राजसत्तेस एकजीव येई व शिवाय राजवंशीयांना कामें मिळाल्यामुळें राज्यांत बखेडा माजण्याचा संभव कमी होई. तरी पण राजपुत्र व राजबंधू परप्रांतांत गेल्यावर मूळ सत्तेपासून फटकून निघण्याची धास्ती नसे असें मात्र नाहीं. परंतु परकीय सुभेदारानीं स्वतंत्र होऊन राज्याचे लचके तोडण्यापेक्षां राजघराण्यांतील पुरुषांनीं ते तोडले तर राजाला परवडत असे. पुलकेशीनें आपल्या भाऊबंदांना व पुत्रांना याच हेतूनें राज्यकारभाराच्या गाड्यास जुंपलें. त्यानें आपला एक भाऊ विष्णुवर्धन यास प्रथम सातारा व पंढरपूर या प्रांतांवर सामंत नेमलें व मागाहून सन ६१५ त त्याची बदली बेझवाड्याकडे नवीन जिंकलेल्या कृष्णा व गोदावरी यांजमधील आन्ध्रदेशावर केली. त्याची राजधानी वेंगी एलोरपासून सात

मैलांवर आहे. वेंगीच्या चालुक्य घराण्याचा संस्थापक हाच असून तेथील राज्य सुमारें ४५० वर्षे टिकलें.

पुलकेशीचा दुसरा भाऊ जयसिंहवर्मा हा गोवर्धन प्रांताचा ( नाशिक जिल्हा ) सामंत झाला व जयसिंहाचा पुत्र नागवर्धन त्याच्या हाताखालीं मदतनीस राहिला. त्यानें इगतपुरीजवळचा बळेग्राम म्हणजे हल्लींचा बेळ-गांव-तारळा हा गांव ताम्रपटानें कपिलेश्वर देवास पूजेकरितां दिला. जयसिंहाचा आणखी एक ताम्रपट नाशिकास सांपडला असून त्यांत 'नासिक्य विषये ढोण्डक ग्रामः' असें म्हटलें आहे. ढोण्डकग्राम म्हणजे धोंडगांव नाशिकच्या पश्चिमेस त्र्यंबकेश्वराजवळ आहे, त्यांत जयसिंहानें मही व नर्मदा या दोन नद्यांमधील मुलुख जिंकल्याचा उल्लेख आहे. हाच लाट देश असून तो घेतल्यावर त्यानें नवसारी ही त्याची राजधानी केली.

पुलकेशीचा ज्येष्ठ पुत्र चंद्रादित्य गोमंतकाकडे विद्यमान सावंतवाडी संस्थानांत व आसमंतांतील भागांत सामंत नेमिला गेला व मागाहून राजाप्रमाणें वागूं लागला. त्यानें वेंगुर्ल्याजवळील कोचरें या गावांतील एक शेत खाजणासुद्धां आपली राणी विजयभट्टारिका हिच्या सांगण्यावरून दान केलें व वेंगुर्ल्यानजीकचीं कांहीं शेतेंहि दान केलीं. त्या सनदेंत 'स्वराज्याच्या पांचव्या वर्षी' असें म्हटलें आहे. हें स्वराज्य म्हणजे चंद्रादित्यानें स्थापलेलें वेगळें राज्य. पुलकेशीचा दुसरा पुत्र आदित्यवर्मा हा कृष्णा व तुंगभद्रा यांच्या संगमावर राज्य करीत होता. त्यानें आपल्या कारकिर्दीच्या पांचव्या वर्षी दिलेला एक ताम्रपट कर्नूल जिल्ह्यांत सांपडला आहे.

पुलकेशीचें राज्य इतकें विस्तार पावल्यावर त्याची कीर्ति हिंदुस्थाना-बाहेरील देशांत पसरून त्यांच्याशीं त्याला राजकीय संबंध जोडण्याचीहि जरूरी भासली. त्याचा वकील इराणचा राजा चोरस ( खुशरू दुसरा ) याच्या दरबारीं होता. पुलकेशीच्या ताब्यांत कोंकण, कानडा, केरळ यांचा किनारा आला व तेथील बंदरांत मिसर, अरबस्तान, इराण या देशांचे

व्यापारी व त्यांची जहाजें येत जात. त्या कारणानें त्या त्या देशांतील राजांनीं आपले वकील व्यापाराच्या सवलती मिळण्याकरितां पुलकेशीच्या दरबारीं पाठवावे व पुलकेशीनेंहि आपले वकील त्यांच्या दरबारीं स्वहित-रक्षणार्थ ठेवावे हें क्रमप्राप्तच समजावें लागतें. या नियमाला अनुसरून इराणचा वकील पुलकेशीच्या दरबारीं होता. तो वकील पुलकेशीस इराणच्या राजाचा खलिता देत असल्याचें एक चित्र अजंठ्याच्या पहिल्या लेण्यांत दाखवितात.

पुलकेशीचें वैभव व साम्राज्य वाढविण्यास महाराष्ट्रीयांची म्हणजे हल्लींच्या महाराष्ट्रांतील लोकांची त्यास किती मदत झाली हें नक्की सांगण्या-सारखें नाहीं. तथापि त्याचें खास स्वराज्य नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत व पश्चिम-समुद्रापासून पूर्वसमुद्रापर्यंत धरल्यास त्याच्या अधिकारीवर्गांत व सैनिकांत सर्व प्रांतस्थ रहिवाशांचे मिश्रण झालें असलें पाहिजे. सबंध दख्खन त्याची व त्याच्या कुलोत्पन्नांची होती. त्यांत विस्ताराच्या दृष्टीनें विद्यमान महा-राष्ट्रानें बराच भाग व्यापला असला तरी त्या प्रमाणांत विद्यमान महाराष्ट्र इतर प्रांतांशीं तुलना करतां विशेष महत्त्वाचा नसावा. तेव्हां पुलकेशीच्या राज्यकारभारांत आंध्र, कर्नाटक व महाराष्ट्र या प्रांतीयांचें अंग होतें, त्यांतील निदान तिसरा हिस्सा महाराष्ट्रीयांचा असावा. ब्राह्मण हे तत्कालीन संस्कृतीचें एक प्रमुख उगमस्थान. ते कोंकण, कऱ्हाड, पैठण, नाशिक इत्यादि प्रदेशांत स्थायिक झाले होते व सर्व महाराष्ट्राच्या केंद्रस्थानीं राजपुत्र, राजबंधु अगर इतर वरिष्ठ अंमलदार तळ देऊन होते. त्यांजकडून महाराष्ट्री-यांचें सद्‌गुणसामर्थ्य चालुक्यांच्या राज्यशकटास जुंपलें गेलें होतें. विशिष्ट प्रांतांतील लोकांचे गुणदोष तेथील भौगोलिक स्थितीवर अवलंबून असतात. हें ग्रहण केल्यास तत्कालीन महाराष्ट्रीय सद्यःकालीन महाराष्ट्रीयांसारखेच काटक, हिकमती, शूर, कष्टाळू, स्वामिभक्त, मितव्ययी असावयास पाहिजेत.

पुलकेशीच्या कारकिर्दीत चिनी प्रवासी ह्यूएनत्संग महाराष्ट्र पाहून गेला होता. त्यानें महाराष्ट्राचें व महाराष्ट्रीयांचें वर्णन केलें तें आपणांस कितपत लागू पडतें हें ओळखावें. तो लिहितो " महाराष्ट्राची जमीन सुपीक आहे. तिच्यांत विपुल धान्य पिकतें. तेथील हवा उष्ण आहे. लोकांची राहणी साधी आहे. ते प्रामाणिक, बाणेदार ( haughty ) व गर्विष्ठ (supercilous) आहेत. त्यांचा कोणी अपमान केल्यास ते त्याबद्दल प्राणाचीहि पर्वा न बाळगतां उसनें फेडल्याशिवाय राहात नाहींत. युद्धांत शरण आलेल्यास ते अभय देतात. लढाईत आपला सेनापति रणांगणास पाठ दाखवून परत फिरल्यास त्याला ते लुगडें नेसविल्याखेरीज कमी करीत नाहींत. राजापाशीं शेकडों मल्ल ( champions ) आहेत. ते शत्रूस आधीं सावध करून मग त्याजवर सूड घेतात. युद्धाकरितां तयार ठेवलेल्या जवानास ( champion ) बेहोष करण्यासाठीं ते दारू पाजतात. त्यांनीं त्या धुंदींत कोणाचा प्राण घेतला तरी त्यांना तो गुन्हा माफ असतो. ते आघाडीला ढोलाच्या तालावर नाचतात. जवानाप्रमाणेंच युद्धास निघालेल्या शेकडों हात्तींना ते दारू पाजून धुंद ठेवतात. हत्ती एका जमावानें शत्रूंना तुडवीत जातात. आपल्या असल्या सैनिकांच्या बळावर भिस्त ठेवून राजा शत्रूला तुच्छ लेखतो. "

वरील वर्णनांतील प्रामाणिकपणा, बाणेदारपणा, गर्विष्ठपणा हे गुण मराठ्यांचे वाटतात. युद्धांत शरण आलेल्यास अभय देणें, सेनापति शत्रूस पाठ दाखवून परत फिरल्यास त्यास लुगडें नेसविणें, शत्रूला आधीं सावध करून त्याजवर सूड उगविणें हें मराठ्यांपेक्षां अस्सल क्षत्रियांना—रजपुतांनाच शोभतें. चालुक्य राजे क्षत्रिय होते. त्यांच्या सैन्यांतील अधिकारी व कित्येक सैनिकहि उत्तरेकडून आलेले क्षत्रिय—कुलोत्पन्न असतील. म्हणून भारतीय युद्धांतील लढवय्यांना उचित असे सद्‌गुण ह्यूएनत्संग यास पुलकेशीच्या सैन्यांत आढळले. येथें एक विचार सुचतो तो असा कीं, हिंदू क्षत्रियांची ही थोरवी बुद्धोत्तर भरत खंडांतील क्षत्रियांची आहे. हे क्षत्रिय

तर बुद्धपूर्व भारतीय युद्धामधील क्षत्रियांच्या योग्यतेचे दिसतात. तर मग बुद्धोपदेशानें हिंदू राजे अहिंसावादी, नेभळे, नामर्द, भ्याड, पळपुट बनले हा आक्षेप सपशेल खोटा ठरत नाहीं काय ? मराठ्यांविषयीं बोलावयाचें तर पुलकेशीनें जे महाराष्ट्राबाहेर दिग्विजय मिळविले त्यांत मराठे शिपाई हजारों लाखों असतील व त्यांच्या शौर्यामुळें पुलकेशीचें राज्य सर्वत्र फैला-वलें असेल. ह्यूएनत्संग महाराष्ट्रास महालश म्हणतो. त्यानें केलेल्या राजाच्या वर्णनावरून चालुक्य राजांना तो महाराष्ट्रीय राजेच समजतो किंवा त्यांच्या राज्यांत मुख्य प्रदेश महाराष्ट्राचा असल्यामुळें तो सर्व राज्यास सामान्यतः महाराष्ट्र समजतो. पुलकेशीच्या अखेरच्या काळांत पल्लवांनीं चालुक्यांशीं लढून पूर्वपराजयाचें उट्टें काढलें. पल्लवराजा नरसिंह-वर्मा यानें पुलकेशीच्या सैन्याचा अनेक लढायांत पराभव करून त्याची राजधानी बदामी हिची धूळधाण उडविली. या पराक्रमाची निदर्शक अशी वातापी कोंडा ही पदवी त्यानें धारण केली. या पराभवानंतर पुलकेशी इ. स. ६४२ त मरण पावला ( His. Ins. of S. India. पृ. २४ ).

## विक्रमादित्य पहिला

पुलकेशीच्या मरणोत्तर तेरा वर्षें धामधुमीचीं गेलीं. त्यानंतर त्याची गादी ज्येष्ठ पुत्र चन्द्रादित्य यास न मिळतां दुसरा पुत्र विक्रमादित्य यास इ. स. ६५४ च्या सुमारास मिळाली. तत्कालीन ताम्रपटांत विक्रमादित्यास पुल-केशीचा 'प्रियतनय' म्हटलें आहे. तोच आदित्यवर्मा असावा. त्यास गादीवर स्थापण्याची तजवीज पुलकेशीनें करून ठेवली नसल्यामुळें भावाभावांत लढा लागून त्यायोगानें राज्यात धामधूम माजली. या सुमारास कांचीचा पल्लवराजा, मदुरेचा पांड्यराजा, कुंभकोणम् व तंजावर इकडील चोलराजा व केरळराजा यांनीं चालुक्यांचें सार्वभौमत्व झुगारण्याच्या हेतूनें उचल खाल्ली. पण विक्रमादित्यास राज्यपद उगीच मिळालें नव्हतें. तो नांवाप्रमाणें शूर होता. त्यानें पल्लवांवर चालून जाऊन त्यांची कांची घेतली व तीच स्थिति

इतरांचीहि केली. वरील युद्धांत पल्लवराजा परमेश्वर पोतवर्मा ऊर्फ ईश्वर पोतराज यास विक्रमादित्यानें इतकें लाजविलें कीं त्याला त्यानें आपल्यापुढें आणून वांकावयास लावलें.

पण विक्रमादित्याचा हा विजय क्षणभंगुर ठरला. त्रिचनापल्लीपर्यंत त्यानें जिंकलेला मुलुखहि त्याजकडे फार दिवस राहिला नाहीं. विक्रमादित्य व पल्लव यांचें युद्ध त्रिचनापल्लीपाशीं पुनः जुंपलें. विक्रमादित्याचें सैन्य कित्येक लक्ष असून त्यात हत्ती, घोडे व पायदळ होतें. हें युद्ध तुंबळ होऊन रणांगणावर रक्ताचा सडा पडला. कित्येक दिवसपर्यंत कोण कोणास जिंकतो याचा अंदाज लागेना. शेवटीं पल्लवसेनेची सरशी होऊन विक्रमादित्यास समरभूमीवरून पळ काढावा लागला. ( उदयेन्द्रियम् ताम्रपट. डॉ. देवरस ).

पल्लवाशीं लढतांना विक्रमादित्याचा मोड झाला तरी त्यानें मागाहून बल्लारी, कर्नूल व नेलोर हे जिल्हे घेतले व चालुक्य साम्राज्य पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत पसरलें.

## विनयादित्य

विक्रमादित्यामागून त्याचा पुत्र विनयादित्य यानें आपल्या नांवाची ग्वाही शक ६०१ ( इ. स. ६७८ ) त फिरविली. त्याजबरोबर इ. स. ६८७ त पल्लव, कलभ्र, केरल, हैहय, मालव, चोल, पांड्य इत्यादिकांनीं मैत्री कायम ठेवली. सिंहलद्वीपाचा राजा व इराणचा शहा यांनींहि मैत्री संपादिली.

## विजयादित्य

विनयादित्य शक ६१८ त ( इ. स. ६९६ ) मरण पावल्यावर त्याचा तनय विजयादित्य गादीवर आला. त्यानें शक ६२१ त वातापुरीस ब्रम्हा विष्णु व महेश यांच्या मूर्ती स्थापल्या. राजमाता विनयवती हिजकरितां व देवालयास उत्पन्नहि तोडून दिलें. हल्लीं त्या देवळास 'जंबु लिंग' म्हणतात. त्यानें दिगंबर पंथीय जैन मंदिरास एक गांव दान केला व पट्टदकल येथें संगमेश्वराचें देऊळ बांधलें. त्यानें राज्याचा उपयोग ३७ वर्षें घेतला. ही

मुदत बरीच मोठी आहे यांत शंका नाहीं. सनातन धर्माचा कट्टा अभिमानी असतांहि जैन पंथासहि त्यानें मदत केली यांतें त्याची समदृष्टि प्रतीत होते. त्याच्या कारकिर्दीत बदामीस चौदा विद्यांत निष्णात असे सहस्रावधि ब्राह्मण राहात असत. त्यावरून बदामी हें त्या काळीं मोठें क्षेत्र व विद्येचें आगर होतें हें दिसून येतें. त्याचें निदर्शक असें वाताप्याधिष्ठान हें नांव बदामीस तत्कालीन ताम्रपटांत देण्यांत आलें आहे (कर्नाटक इन्स्क्रिप्शन्स भाग पहिला).

## विक्रमादित्य दुसरा

विजयादित्यामागून त्याचा पुत्र विक्रमादित्य दुसरा याजकडे इ. स. ७३३ च्या सुमारास सिंहासन गेलें. त्याला युवराजपद पूर्वीच मिळालें असून तो पुलिगेरी ऊर्फ लक्ष्मेश्वर या प्रांताचा सामंत ( Viceroy ) होता ( लक्ष्मेश्वर शिलालेख ). विक्रमादित्य बापासारखा शांतताप्रिय नव्हता. त्याचा समकालीन पल्लवराजा नंदिवर्मन् पल्लवमल्ल २ रा. विक्रमादित्यानें नंदिवर्म्याचीं पाळेंमुळें खणून काढण्याचा विडा उचलला. त्याच्या फौजा ताबडतोब तोंडाईमंडल या प्रांतांत शिरल्या. या प्रांतांत मद्रास व कांजीवरम् हीं नगरें मोडतात. विक्रमादित्यानें या स्वारीचा स्वतः पुढाकार घेतला. त्याच्या बाहुबलानें नंदिवर्म्याचा सडकून पराभव होऊन तो रणांगणांतून पळून गेला व धांदलींत त्याचा समुद्रघोष शंख व खट्वांगध्वज विक्रमादित्याच्या हातीं पडला. त्याशिवाय हत्ती, रत्नें यांची अफाट लूट त्यास मिळाली. मग तो त्याच्या कांची राजधानींत शिरला. पण तिची धूळधाण न उडवितां ब्राह्मणांना व निराश्रितांना त्यानें दानांनीं प्रसन्न केलें. नरसिंह पोतवर्मा यानें तेथें राजसिंहेश्वरादि देवळें बांधलीं होतीं, त्यांजपासून विक्रमास सुवर्णराशी मिळाल्या ( राजसिंहेश्वर शिलालेख ). त्यांपैकीं कांहीं सोनें राजसिंहेश्वर देवळास त्यानें परत दिलें. विक्रमादित्यानें पांड्य, चोल, केरळ व कलभ्र इत्यादि राजांना जिंकलें व दक्षिणार्णवावर विजयस्तंभ रोवला ( केंदूर ताम्रपट ). ही गोष्ट इ. स. ७४२ पूर्वी घडली ( डॉ. देवरस ).

या विक्रमादित्याच्या कारकिर्दीत गुजराथ चालुक्यशाखेतील पुलकेशी या राजानें आरबांचा पुरा मोड केला. आरबांच्या या स्वारीचें वर्णन नवसारी ताम्रपटांत ( इ. स. ७३९ ) आहे. त्यावरून ही स्वारी इ. स. ७३६ च्या सुमारास झाली असावी. त्या ताम्रपटांत आरबांना ताजिक म्हटलें आहे. आरबांनीं आपल्या तीक्ष्ण तलवारींच्या जोरावर सिंध, कच्छ, सौराष्ट्र, मौर्य व गुर्जर राजांना जिंकलें. यांतील मौर्य हे कोंकणप्रांताचे राजे होत. आरबांच्या स्वारीस पुलकेशीनें तापीनदीवर आडवून धरून त्यांना खरपूस चोप दिला. त्यापूर्वीं मौर्यांबरोबर आरबांची लढाई समुद्रावर होऊन तिच्यांत मौर्य पराभव पावले होते. पुलकेशीनें आरबांशीं केलेल्या युद्धांत फार मोठें गजबल वापरलें होतें. पुलकेशीच्या या अतुल पराक्रमाबद्दल विक्रमादित्यानें त्याजवर दक्षिणापथस्वाधार, पृथ्वीवल्लभ इत्यादि पदव्यांचा वर्षाव केला.

विक्रमादित्यानें लोकमहादेवी व त्रैलोक्यमहादेवी या कलचुरी राजघराण्यांतील दोघी बहिणींशीं लग्न केलें. पैकीं लोकमहादेवीनें विजापूर जिल्ह्यांत पट्टदकल येथें लोकेश्वराचें देऊळ बांधलें व तिच्या बहिणीनें त्रैलोकेश्वराचें देऊळ बांधलें.

## कीर्तिवर्मा दुसरा

दुसऱ्या विक्रमादित्यामागून त्याचा पुत्र दुसरा कीर्तिवर्मा याच्या हातीं शके ६६९ त ( इ. स. ७४७ ) कारभार आल्यावर चालुक्यांची सद्दी फिरली. तरी सुद्धां दक्षिणेकडील राजांना ते भारीच होते. कांचीचे पल्लव हे चालुक्यांचे दीर्घ वैरी दिसतात. त्यांस एका चालुक्य ताम्रपटात ‘ कुलरिपु ’ म्हटलें आहे तें याच अर्थानें. ते वारंवार चालुक्यांचें वर्चस्व झुगारून देण्यासाठीं धडपड करीत. त्याप्रमाणें कीर्तिवर्म्याच्या कारकीर्दीत त्यांनीं एकदां डोकें वर काढलें असतां कीर्तिवर्म्यानें त्यांस खालीं बसविलें. पण चालुक्य साम्राज्यांतच फूट पडली तेव्हा कीर्तिवर्म्याचें तेज लोपलें. राष्ट्रकूट घराण्यांतील दन्तिदुर्ग हा कीर्तिवर्म्याचा एक मोठा फौजबंद अधिकारी

होता. त्यानें पल्लवांशीं झगडून चालुक्य सत्ता क्षीण झालेली पाहून तिज-विरुद्ध बंड केलें व चालुक्य साम्राज्यांतून फुटून निघून खानदेश, वऱ्हाड इत्यादि महाराष्ट्रीय प्रदेशांत आपलें स्वतंत्र राज्य स्थापिलें.

कीर्तिवर्म्याच्या कारकिर्दींत जैन मतास बराच मान असून जैनांच्या देवालयांना उत्पन्नें देण्यांत आलीं होतीं. तुंगभद्रा नदीवरील रामेश्वरतीर्था-जवळील रामेश्वरदेवस्थानासहि त्यानें उत्पन्न दिलें होतें.

## उपसंहार

दुसरा कीर्तिवर्मा हा चालुक्य घराण्यांतील शेवटचा मोठा राजा. त्याचा पराभव करून दान्तिदुर्गानें राज्याचा बराच भाग जिंकला. येथून पुढें बदामीचें चालुक्य घराणें जिवंत राहिलें असलें तर तें हलक्या स्थितींत व अप्रसिद्धावस्थेंत असल्यानें राजकारणांत त्याचें महत्त्व नाहीसें झालें हें उघड आहे. सारांश, बदामीकर चालुक्यांचें वैभव अदमासें इ. स. ५००पासून ७५०पर्यंत टिकलें. या काळांत दक्षिण हिंदुस्थानांत लहान मोठीं असंख्य राज्यें होतीं. म्हैसुरप्रांतांत व त्याच्या आसपास गंग, कदंब, अलूप व बाण यांचीं लहान राज्यें असून तीं चालुक्यांचीं मांडलिक होतीं. पल्लव हे चालुक्यांचे प्रतिस्पर्धी व त्यांची राजधानी कांची. पल्लवांच्या हद्दीस चालुक्यांची हद्द लागलेली असल्यामुळें त्यांच्या वारंवार लढाया होत. पल्लवांच्या दक्षिणेस चोल व पाण्डय आणि केरळांत चेर राज्य करीत असत. पूर्वेस कलिंग देशांत पूर्वगंग व उत्तरेस चेदी देशांत कलचूरी यांचें राज्य होतें. महाराष्ट्र हा चालुक्यांच्या सत्तेखालीं असल्यामुळें त्यांतील सगळीं राज्यें मांडलिक होतीं. त्यांपैकीं राष्ट्रकूट हे प्रमुख होत. कोंकणांत मौर्य व गोव्यांत कदंब नांदत होते. खुद्द चालुक्य घरण्यांतील राजपुत्र व राजबंधू हे महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांत सामंत किंवा मांडलिक या नात्यानें अधिकार चालवीत होते. पूर्वी राजधानी हेंच संस्कृतीचें केन्द्र असे व हल्लीं आहे. महाराष्ट्रांत मांडलिक राजांच्या जितक्या राजधान्या तितकीं संस्कृतीचीं केन्द्रें समजण्यास हरकत नाहीं. बदामीस जें कार्य मध्यवर्ती चालुक्य करीत तेंच कार्य कमीअधिक प्रमाणांत

महाराष्ट्रामध्यें पांचसहा ठिकाणीं तरी चालू असावें हें स्वाभाविक होय. देवालयें बांधणें, विद्वान् ब्राह्मणांना इनामें देऊन त्यांची गांवगन्ना स्थापना करणें व त्यांच्यामार्फत सनातन धर्म आणि विचार रुजत घालून ते फैलावणें इत्यादि उद्योग त्या विविध केंन्द्रस्थानांमार्फत संथपणानें चालू राहिले असले पाहिजेत. कोंकणांतील हल्लींच्या अनेक चित्पावन व इतर ब्राह्मणांची स्थापना चालुक्यकालीं झाली असल्याचें अनुमान वेंगुर्ल्याजवळील कोचरें या गांवांतील एक शेत ग्वाजणासुद्धां कांहीं ब्राह्मणांना चंद्रादित्यानें दान केलें यांतून आपोआपच निघतें. याचा अर्थ हिंदू संस्कृतीचा प्रसार बदामी-पासून पश्चिम समुद्रापर्यंत सर्वत्र सारखा सुरू होता.

अल्लाउद्दिन खिलजीच्या स्वारीपासून पुढील महंमदीय अमलांतील तीनशें वर्षांच्या काळांत दक्षिणेंत धर्म, विद्या व कला यांचा कमीअधिक लोप होत गेला. त्याबरोबरच क्षत्रिय राजांचा नाश व पांगापांग झाल्यामुळें ते विद्येंत मागासले व धार्मिक संस्कारांस मुकले. त्यापूर्वी दक्षिणेंत लहान मोठीं दीड-पावणे दोनशें तरी राज्यें असून त्यांचे परस्परांत शरीरसंबंध घडत. ते यज्ञयाग करीत, देवालयें बांधीत, विद्वानांना जवळ बाळगून ग्रंथरचनेस व विद्येस उत्तेजन देत. अशांच्या संगतींत वागणारे राजे अशिक्षित व संस्कारहीन असणें मुळींच संभवनीय नाहीं. या दृष्टीनें भीष्म, धर्म, जनक, यांच्या तोलाचे ते नसले तरी सर्वसामान्यरीत्या क्षात्रियांना योग्य ते आचार-विचार त्यांच्या ठिकाणीं असले पाहिजेत असें मानण्याकडे सहजच प्रवृत्ति होते. बदामीकर चालुक्यांपुरतें पाहिल्यास विक्रमादित्य दुसरा याचें लग्न कलचुरी राजकन्या लोकमहादेवी हिच्याशीं झालें होतें. विक्रमादित्य चौथा यानें कलचूरी राजा लक्ष्मण याची कन्या बोंथादेवी हिला वरलें. हीं उदाहरणें प्रांताप्रांतील राजे आचार व कुलीनता याबाबतींत समान दर्जाचे कसे होते याची साक्ष पटवितात. नर्मदानदीपासून दक्षिणेस रामेश्वरापर्यंत एक राज-मंडळच असून तें प्रांतनिरपेक्ष. भाषानिरपेक्ष व वंशनिरपेक्ष असल्याचा हा पुरावा आहे.


कनोज
गुजराथ
चेंदी (कलचुरी)
नर्मदा नदी
गोवर्धन प्रांत
नाशिक
मुंबई
कलिंग
गोदावरी नदी
पुरी
सातारा
पंढरपूर
नलदुर्ग
नलराज्य
वेंगुर्ले
वेंगी
कृष्णा नदी
तुंगभद्रा नदी
कदंबराज्य
बनवासी
कांची
पल्लवराज्य
मद्रास
नोळंबवाडी
गंगवाडी
केरळ
गंगराज्य
तंजावर
पाण्ड्यराज्य
मदुरा
चोलराज्य
सिंहलद्वीप
बदामीचे चालुक्य
व
इतर राज्यें

चालुक्यराजे सनातनधर्माचे अभिमानी असूनहि इतर धर्ममतांशीं सहिष्णुतेनें वागत, इतकेंच नव्हे तर त्यांना मदत व आश्रयहि देत. दुसऱ्या पुलकेशीनें कवि रविकीर्ति यास आश्रय दिला. जैनपंथ त्यावेळीं प्रभावशाली असून लोकप्रियता पावला असल्यामुळें त्याचा पगडा राजेरजवाड्यांवरहि बसावा यांत नवल नाहीं. त्यावेळीं दाक्षिण हिंदुस्थानांत जैनांतील दिगंबरपंथ फैलावला होता. विशेषतः त्याचे अनुयायी दाक्षिण महाराष्ट्रांत अधिक होते. त्यांच्या एका देवालयास विजयादित्य चालुक्यापासून एक गांव इनाम मिळाला. विनयादित्य चालुक्याचा निरवद्य पंडित हा जैन धर्मगुरु होता. अर्थात् त्याला जैनमत मान्य असलें पाहिजे. पण जैनमत मान्य केलें म्हणून हिंदुधर्मास तो सर्वथैव मुकला किंवा त्याचा इतर क्षत्रिय राजकुलांशीं रोटी-बेटी व्यवहार बंद पडला असें समजण्याचें कारण नाहीं. हल्लींच्या काळांत रामदासी पंथाची किंवा वारकरी सांप्रदायाची दीक्षा घेण्याइतकाच त्या काळांत जैनमत स्वीकारण्याचा अर्थ होता. चालुक्यराजे कर्नाटकांत राहात असल्यामुळें त्यांतून व तुंगभद्रेपलीकडून म्हणजे द्रविड देशातून विद्वान् ब्राम्हणांचा प्रसार महाराष्ट्रांत होत गेला. ज्या ब्राह्मणांना चालुक्य राजांनीं दानें दिलीं त्यांचीं नंदिस्वामी, लोहस्वामी व देवस्वामी अशीं नांवें आहेत, तीं वरील विधानाचीं द्योतक समजावीं. चालुक्यांना गुजराथ व माळवा इकडील राजांनीं जितका प्रतिकार केला त्यापेक्षां दक्षिणेकडील कांचीच्या पल्लवराजांकडूनच अधिक झाला. पल्लवांचें राज्य चालुक्यांच्या राज्यास लागून होतें. सर्व द्रविड देश शौर्यांत समान होते असें मानल्यास चालुक्य राजांच्या सैनिकांत मराठे लोकांचा भरणा अधिक असल्यामुळें चालुक्य राजे पल्लवांना म्हणजे द्रविडांना सतत जिंकूं शकल्याचें अनुमान सत्यास धरून काढतां येण्यासारखें आहे. गुजराथ व आंध्र हे देश जिंकून ताब्यांत ठेवण्यास मराठ्यांचेंच शौर्य कारण झालें असलें पाहिजे.

कर्नाटक, महाराष्ट्र, कोंकण, गोवें, गुजराथ, आन्ध्र देश, वेंगी ( कृष्णा व गोदावरी यांजमधील पूर्व किनारा ), पांड्य ( मदुरा ), पल्लव ( कांची ), चोल ( तंजावर ), केरल, माळवा यांवर बदामी चालुक्यांचें साम्राज्य पसरलें असून त्यांत बदामी, नळदुर्ग, ऐहोळी, वनवासी, गोवर्धन, नासिक्य, इगतपुरीजवळ वळेग्राम ( बेळगांव – तारळा ), करहाटक, वेंगुर्ल्याजवळ कोचरें, कांची, मदुरा, पुलिगेरी ऊर्फ लक्ष्मेश्वर इत्यादि गांवें प्रमुख होतीं.

---

# प्रकरण सहावें

## राष्ट्रकूट घराणें

( इ. स. ७५० ते ९७३ )

पूर्वी राष्ट्र, विषय, भोग किंवा भुक्ति इत्यादि राजकीय विभाग असत. त्या प्रत्येक विभागावर सरकारी अधिकारी असून त्यांपैकीं राष्ट्राच्या अधिकाऱ्याला राष्ट्रकूट अशी संज्ञा होती. एका घराण्यांत कोणताहि अधिकार आला असतां तो वंशपरंपरेनें बहुधा चाले व तें विशिष्ट घराण्याचें उपनांवच होऊन त्या घराण्यांतील जितकीं विभक्त कुटुंबें तीं तेंच उपनांव घेत. सांप्रतहि देशमुख, देशपांडे, कुलकर्णी हीं उपनांवेंच होऊन बसलीं आहेत. तोच न्याय राष्ट्रकूट घराण्यास लावल्यास महाराष्ट्रांत त्या काळीं राष्ट्रकूट उपनांवाचीं कुटुंबें कितीतरी असतील. त्यांतील कित्येक उपनांवाचे राष्ट्रकूट असतील व कित्येक राष्ट्रकूट हा अधिकार उपभोगीत असतील. या कारणानें

नुमत्या राष्ट्रकूट या आडनांवावरून विशिष्ट घराणें राष्ट्रकूट पदाधिष्ठित असेलच असें निश्चितपणें म्हणवणार नाहीं. म्हणूनच जे राष्ट्रकूट पुढें सम्राट् झाले त्यांचा व महाराष्ट्रांत इतस्ततः आढळणाऱ्या राष्ट्रकूटांचा परस्परसंबंध ठरविणें बरेंचसें बिकट आहे. अशीं राष्ट्रकूट घराणीं सोलापूर, एलिचपूर, लातूर, वेरूळ इत्यादि ठिकाणीं स्थायिक झालीं होतीं.

## दन्तिदुर्ग

दन्तिदुर्ग हा राष्ट्रकूट घराण्यांतील पहिला सम्राट्. त्याच्यापूर्वीं राष्ट्रकूट घराणें दक्षिणेंत दोनशें वर्षें तरी नांदत होतें. दरम्यानच्या काळांत वाकाटक व चालुक्य हीं राजघराणीं होऊन गेलीं. दन्तिदुर्ग इ. स. ७४२ त लाट देशावर चालुक्याचा अंकित या नात्यानें अधिकार चालवीत होता. बदामीचें चालुक्य घराणें यावेळीं अगदीं डबघाईस आलें नसलें तरी तें दन्तिदुर्ग या उदयोन्मुख, विशेष धाडसी व पराक्रमी अधिकाऱ्यापुढें तग धरूं शकलें नाहीं. त्यानें चालुक्य सम्राट् दुसरा कीर्तिवर्मा यास त्याच्याहून कमी सैन्यानिशीं जिंकलें व चालुक्य साम्राज्याच्या उत्तरभागाचें म्हणजे महाराष्ट्राचें आधिपत्य मिळविलें. त्यानें कांचीच्या पल्लवांना जिंकून कांची ताब्यांत घेतली. श्रीशैल, कलिंग, कोसल, मालव व टंक येथील राजांनाहि नमविलें. वेंगीच्या चालुक्यांचाहि त्यानें असाच पाडाव केला. गुजराथ जिंकून तिजवर त्यानें कर्क दुसरा यास सामंत नेमलें.

दन्तिदुर्ग सनातनधर्माचा कट्टा अभिमानी होता. माळव्यावरील स्वारींत उज्जयिनीस मुक्काम असतां त्यानें हिरण्यगर्भ महादान केलें. या विधींत दात्यानें सुवर्णपात्रांत बसावें, उत्तरेकडे तोंड करावें, हातांत ब्रह्मा व धर्मराज यांच्या सुवर्णमूर्ति घ्याव्या आणि हें सुवर्णपात्र गुरू व इतर पुरोहित यांना द्यावें असें सांगितलें आहे. ज्यांत दात्यानें बसावयाचें तें सुवर्णपात्र भारी वजनाचें असल्यानें ब्राह्मणांना फार मोठी प्राप्ति होत असली पाहिजे. या दानानें यजमानास हिरण्यगर्भाचा म्हणजे दैवी देह प्राप्त होतो अशी समजूत

आहे. इ. स. ७५४ त रथसप्तमीस आपली सुवर्णतुला करून तें द्रव्य त्यानें ब्राह्मणांस वांटलें व मातेच्या आज्ञेवरून कित्येक विद्वान् ब्राह्मणांना त्यानें भूमिदान केलें. इ. स. ७५४ त तो मरण पावला तेव्हां तीस वर्षांचा होता. मरणसमयीं त्याच्या ताब्यांत दक्षिण गुजराथ, खानदेश, वऱ्हाड व उत्तरमहाराष्ट्र हा प्रदेश होता. सबंध चालुक्य राज्याचा तो याविळीं धनी झाला नसून वरील प्रदेश वगळून उरलेला दक्षिणेचा प्रदेश चालुक्यांच्या ताब्यांत असला पाहिजे ( 'दि राष्ट्रकूटाज् अँड देअर टाईम्स,' पृ. ३९ ). याचा अर्थ राष्ट्रकूटांची सत्ता उत्तरेकडून दक्षिणेकडे पसरत जाऊन आधीं महाराष्ट्राचे व मग कर्नाटकाचे ते सत्ताधीश झाले. दन्तिदुर्गाचे अंगीं सेनानी, मुत्सद्दी, राजकारणी हे राज्यसंस्थापकास आवश्यक गुण असून शिवाय मातृभक्ति व धर्मनिष्ठा यांनींहि तो मंडित होता.

## कृष्ण पहिला

दन्तिदुर्गामागून त्याचा चुलता कृष्ण पहिला गादीवर बसला. त्यावेळीं तो ४५ वर्षांचा होता. दन्तिदुर्गास पुत्रसंतान नसल्यामुळेंच कृष्णाकडे राज्यपद आलें असावें. दन्तिदुर्गाच्या कारकिर्दीत चालुक्य सम्राट् कीर्तिवर्मा दुसरा याच्या सत्तेचें समूळ उच्चाटन झालें नसून कर्नाटकांत त्याचें राज्य अवशिष्ट होतें. तेंहि राज्य कृष्णानें बुडविलें, ही त्याची महत्त्वपूर्ण कामगिरी समजली पाहिजे. या कामगिरींतून मोकळा होतांच त्याचा मोर्चा म्हैसूर प्रांतांत गंगवाडीकडे वळून तो त्या स्वारींत यशस्वी झाला. त्यानंतर वेंगीच्या चालुक्यांकडे त्याचें लक्ष वेधलें. या मोहिमेवर युवराज गोविंद याची त्यानें योजना केली. वेंगीच्या सिंहासनावर चौथा विष्णुवर्धन होता; त्याचा गोविंदानें मोड केला. या विजयानें राष्ट्रकूटांच्या अंमलाखालीं विद्यमान् हैदराबाद संस्थानाचा बराच मोठा भाग आला. दक्षिण कोंकणावरहि कृष्णानें आपली सत्ता बसविली. कृष्ण इ. स. ७७५च्या सुमारास मरण पावला असावा. तो समर्थ राज्यकर्ता व कुशल सेनापति होता.

अवघ्या अठरा वर्षांच्या कारकिर्दींत त्यानें आपलें राज्य तिप्पट वाढविलें. चालुक्यानीं बदामींतील लेणीं खोदण्याची जी अजब कामगिरी बजाविली तीहून कृष्णानें वेरूळचें जगविख्यात कैलास लेणें खोदून अधिक बजाविली. बडोद्यास सांपडलेल्या एका ताम्रपटांत कैलास लेण्याच्या बाबतींत कृष्णराजाची पुढील शब्दांनीं स्तुति केली आहे. "एलापूर येथील पर्वतांत कृष्णराजानें एक विलक्षण आकाराचें देऊळ रचिलें. देव विमानांत बसून जात असतां त्या देवळाकडे आश्चर्यानें पाहात व मनांत म्हणत, हें शिवालय स्वयंभू आहे. कारण, मानवी कलाकृति इतकी सुंदर असणार नाहीं. ज्या कारागिरानें तें रचिलें त्यालाहि त्याजकडे पाहून मागाहून नवल वाटे. आपणास पुनः असली कृति साधेल कीं नाहीं याविषयीं शंका येऊन त्यानें म्हणावें 'काय आश्चर्य! मला पुनः ही कृति येईल कीं नाहीं कोण जाणे!" कृष्णराजानें कैलास लेण्यांतील शिवलिंगाला सुवर्णालंकार व रत्नालंकार घालून भूषविलें. कांचीचा जैन धर्मोपदेशक अकलंक यास त्याचा आश्रय होता.

कांची येथील कैलासनाथाचें मंदिर पल्लव राजा नरसिंह वर्मा दुसरा यानें इ. स. ६९० च्या सुमारास बांधलें. कांचीवरम् येथील कैलासनाथाच्या मंदिराचा नमुना डोळ्यापुढें ठेवून वरील कैलास लेणें बनविलें आहे असें म्हणतात. या लेण्याचा उल्लेख बडोदा ताम्रपटांत 'एलापुराचलगताद्भुतसन्निवेशम्' या शब्दांनीं केला आहे. राष्ट्रकूट घराण्यांतील तिसरा कृष्ण यानें शक ८६२ त दिलेला एक ताम्रपट उपलब्ध आहे. त्यांत पहिला कृष्ण व त्याची शिल्पकृति यासंबंधानें गौरवपर उद्गार काढण्यांत आले आहेत ते येणेंप्रमाणें—

तस्मादपालयदिमां वसुधां पितृव्यः
श्रीकृष्णराजनृपतिः शरदभ्रशुभ्रैः ।
यत्कारितेश्वरगृहैर्वसुमत्यनेक–
कैलासशैलनिचितेव चिरं विभाति ॥

अर्थ—त्याच्यानंतर त्याचा चुलता ( दन्तिदुर्गाचा ) कृष्णराज (पहिला) यानें पृथ्वीचें पालन केलें. त्यानें शरद् ऋतूंतील अभ्राप्रमाणें शुभ्र अशीं शिवालयें बांधलीं असून त्यायोगानें ही पृथ्वी अनेक कैलासपर्वतांनीं भरून गेल्याप्रमाणें शोभत आहे.

वरील श्लोक कैलास लेण्याचा सूचक असून त्याशिवाय त्यानें इतर तसलींच शिवालयें निर्मिल्याचें दर्शविलेलें आहे. वेरूळ येथील कैलास लेण्याच्या दोन्ही अंगांस आणखीही शिवलेणीं आहेत. तींहि कृष्णाच्या कारकिर्दींतच निर्माण झालीं असें अनुमान या श्लोकांतून सहजच निघतें. वरील लेण्यांनीं कृष्णराजाचें नांव अजरामर केलें यांत शंका नाहीं.

## गोविंद दुसरा

पहिल्या कृष्णामागून त्याचा वडील पुत्र गोविंद दुसरा इ. स. ७७३ त सिंहासनावर बसला. बापानें आपल्या हयातींत त्यास युवराज्याभिषेक केला होता व त्यानेंहि वेंगीवर विजय मिळविला होता. गोविंदानें आपला धाकटा भाऊ ध्रुव याजकडे राज्यांतील उच्च अधिकार सोंपविले व आपण विलासांत व व्यसनांत निमग्न झाला. त्याच्या भोंवतालीं सुंदर स्त्रियांचा वेढा पडला असून तेंच सुख तो साम्राज्यसुख समजूं लागला. अशा स्थितींत ध्रुव आयताच स्वार्थ साधून घेण्याच्या उद्योगांत राहिला. गोविंदाला तसा संशय येतांच त्यानें ध्रुवास त्या अधिकारावरून दूर करून दुसऱ्या मनुष्यास नेमलें. ध्रुवहि धूर्त होता. त्यानें उघडपणें बंड न करतां चार वर्षेंपर्यंत सामोपचाराचें धोरण ठेवलें. त्या चार वर्षांत त्यानें मोठें सैन्य जमवून आपली बाजू खंबीर केली. इ. स. ७७९ त ध्रुवपुत्र कर्क सुवर्णवर्ष हा नाशिक व खानदेश जिल्ह्यांवर राज्य करीत होता. इ. स. ७८१ त ध्रुवानें उघडपणें बंड पुकारून गोविंदानें राज्य आपल्या स्वाधीन करावें अशी मागणी केली. गोविंदानें ती मागणी अर्थातच झिडकारली. तेव्हां ध्रुव पुनः मिळतें घेऊं लागला. दरम्यान गोविंदाच्या मदतीस वेंगी, कांची, माळवा

व गंगवाडी येथील राजे आले. ध्रुवानें यादवी थांबविण्याकरितां पड खाण्याचें ठरविलें. पण गोविंदानें हट्टास पेटून त्याजबरोबर युद्ध पुकारलें. त्यांत ध्रुवानें गोविंदाचा पुरा मोड करून गादी बळकावली.

## ध्रुवधारावर्ष

ध्रुवानें इ. स. ७८० च्या सुमारास आपणास राज्याभिषेक करविला. तेव्हां त्याचें वय ५० वर्षांचें असावें. अशा रीतीनें प्रत्यक्ष सम्राट्पद मिळविल्यावर गोविंदाचा पक्ष घेऊन ज्या राजांनीं त्याजविरुद्ध हत्यार उपसलें होतें त्यांचें पारिपत्य करण्यास तो बाहेर पडला. त्यानें प्रथम गंगवाडीच्या गंगराजास जिंकून कैदेंत ठेवलें व त्याच्या राज्यावर आपला वडील पुत्र स्तंभ याची सामंत ( Governor ) म्हणून नेमणूक केली. मग तो पल्लव राजा दन्तिवर्मा याजकडे वळला. त्यानें त्याची कांची राजधानी घेतांच दन्तिवर्म्यानें शरण येऊन त्यास पुष्कळ हत्ती नजर केले. यावेळीं माळव्यावर गुर्जरवंशीय प्रतिहारांचें राज्य असून त्यांची राजधानी उज्जयिनी होती. त्यांचें राज्य दक्षिणेस नर्मदेपर्यंत पसरलें होतें व त्याच्या पलीकडे राष्ट्रकूटांचें राज्य होतें. गुर्जर प्रतिहार राजा वत्सराज हा गोविंदाचा पक्षपाती असल्यामुळें त्याजवर ध्रुवानें शस्त्र धरलें व त्याचा इ. स. ७८९ च्या सुमारास मोड केला. वत्सराजामागून बंगालचा राजा धर्मपाल याची पाळी आली. कारण त्यानें गंगा व यमुना यांजमधील प्रदेश घेऊन ध्रुवाची उत्तरेकडील प्रगति खुंटविली होती. त्यालाहि ध्रुवानें धूळ चारली. उत्तरेकडील या मोहिमेपासून ध्रुवाला कीर्तीपलीकडे लभ्यांश असा कांहींच झाला नाहीं. ही मोहीम इतक्यावरच संपवून ध्रुव परत दक्षिणेकडे फिरला, व इ. स. ७९३ च्या सुमारास मरण पावला. त्यानें अवघें तेराच वर्षें राज्य केलें. पण त्या अल्पावधींत उत्तर व दक्षिण या हिंदुस्थानाच्या दोन्ही भागांत जय मिळवून राष्ट्रकूटांच्या सत्तेस अखिल भारतांत त्यानें अग्रपूजेचा मान प्राप्त करून दिला. शातवाहनांनंतर विन्ध्यपर्वत ओलांडून उत्तरेकडे

जाणारा दक्षिणेकडील पहिला सम्राट् ध्रुव. ध्रुवानें आपला वडील बंधू गोविंद यास पदच्युत केलें. त्यामुळें त्यास जो काळिमा आला असेल तो सोडल्यास ध्रुवाला नांव ठेवण्यास मुळींच जागा नाहीं. उत्तरेस त्याचें राज्य विस्तार पावलें नसलें तरी दक्षिणेस गंगांचा मुलुख जिंकल्यामुळें त्याच्या राज्याची मर्यादा कावेरीपर्यंत गेली.

## गोविंद तिसरा

ध्रुवाला पुत्र बरेच होते. त्यांपैकीं चौघांचीं नांवें स्तंभरणावलोक, कर्कसुवर्णवर्ष, गोविंद व इंद्र अशीं होतीं. ध्रुवानें स्तंभास गंगवाडी मंडलावर सामंत ( Governor ) नेमलें होतें. कर्कसुवर्णवर्ष खानदेशाचा कारभार पाहात होता. गोविंदावर ध्रुवाची मर्जी असल्यामुळें राज्यपद त्यासच देण्याचा ध्रुवानें विचार केला. कारण, राज्य चालविण्यास सर्वांत लायक तोच अशी त्याची खात्री झाली होती. म्हणून युवराजाचिन्ह या दृष्टीनें गोविंदाच्या गळ्यांत कंठी घालून त्यास ध्रुवानें राज्याचा वारस ठरविलें. अर्थात् ध्रुव मरण पावल्यावर गोविंदच राजा झाला. पण वडील पुत्र स्तम्भ यास हा अपमान वाटून त्यानें मांडलिक राजांच्या मदतीनें गोविंदाविरुद्ध कट उभारला. त्यास कित्येक सरकारी बडे अधिकारीहि सामील झाले. पण गोविंदानें आपल्या आर्जवी स्वभावानें त्या कटांतील कित्येक मांडलिकांना फोडलें व त्यास त्याचा धाकटा भाऊ इन्द्र यानेंहि उत्साहपूर्वक मदत केली. गोविंद शूर शिपाई व हुषार सेनापति असल्यामुळें त्यानें स्तंभ व त्याचे साथीदार यांचा पराभव करून आपलें आसन स्थिर केलें. आणि स्तंभ निवळलेला पाहून त्यालाहि पूर्ववत् गंगवाडीवर नेमलें.

गोविंद नंतर कांचीवर चालून गेला व बापाप्रमाणें त्यानेंहि कांचीच्या पल्लवांचा फिरून पराभव केला. कांचीची व्यवस्था लावल्यावर पूर्वेस वेंगीकडे त्यानें रोख वळविला. त्या मोहिमेंत त्यानें वेंगीचा चालुक्य राजा विजयादित्य याला मोडून काढलें; तें इतकें की गोविंदाच्या आज्ञेवरून

विजयादित्यानें गोविंदाची राजधानी मालखेड हिचा तट बांधून देण्याची आज्ञा त्यास केली व त्याजकडून तो बांधून घेतला. ( His. Inscri. of S. India, Page 33). नंतर गोविंद नर्मदा उतरून उत्तर भारतांत शिरला. त्यानें गुर्जर-प्रतिहारावर हल्ला करण्यास आपला भाऊ इन्द्र यास पाठविलें आणि आपण दुआब व कनोज यांच्या दिशेनें चालून जाऊन तिकडे नवीनच उत्पन्न झालेला बलाढ्य प्रतिस्पर्धी नागभट्ट यावर इ. स. ८०६ च्या सुमारास हल्ला चढविला व त्यास जिंकून त्यानें हिमालयाचा पायथा गांठला. गोविंदाची उत्तरेकडील ही मोहीम केवळ दिग्विजयार्थ होती. त्या मोहिमेंत नागभट्ट ( दुसरा ) व धर्मपाल यांस त्यानें आपलें वर्चस्व कबूल करावयास लावलें.

गोविंदानें नंतर पश्चिमकडे कूच केलें. भडोच जिल्ह्यातील श्रीभवन ( सरभोन ) च्या राजानें त्याचें स्वागत करून त्यास बहुमोल नजराणा दिला. इ. स. ८०८ चा पावसाळा त्यानें तेथेंच काढला. त्याचा पुत्र अमोघवर्ष या मुक्कामांत तेथेंच जन्मला. पावसाळा संपल्यावर श्रीभवनाहून निघून तो द्रविड देशांत नवीन उत्पन्न झालेल्या शत्रूंचें पारिपत्य करण्यास गेला. त्या कटात गंगवाडी, केरल, पाड्य, चोल व कांची येथील राजे होते. गोविंदानें त्या सर्वांचा धुव्वा उडविला. त्यानें कांची पुनः घेतली व त्याचें सिंहल-द्वीपच्या राजास भय वाटून तो त्यास शरण आला. त्यानें शरणागतीचें चिन्ह म्हणून आपला व आपल्या मंत्र्याचा पुतळा गोविंदाकडे पाठविला. हे दोन्ही पुतळे मालखेडास शिवालयापुढें उभारण्यांत आले. हा दक्षिण दिग्विजय आटोपल्यावर गोविंदराज फार दिवस वांचला नाहीं. त्याचा अंत इ. स. ८१३ च्या सुमारास झाला असावा.

गोविंद हा सर्वश्रेष्ठ राष्ट्रकूट राजा होय. शौर्य, मुत्सद्दीपणा व संघटना-चातुर्य या त्रिविधगुणांनीं तो मंडित होता. शत्रूचें सैन्य कितीहि मोठें असलें तरी त्यांत जिवाची तमा न धरतां गोविंद घुसत असे. त्याला

मर्दानी खेळांचा फार शोक होता. त्यानें आपणास प्रभूतवर्ष, पृथिवीवल्लभ, श्रीवल्लभ इत्यादि पदव्या घेतल्या. राज्यविस्तार फार झाला व राजकुळांतील कर्त्या पुरुषांना राज्यशकटास जुंपण्याची जरूरी भासूं लागली म्हणजे त्यांना एकाद्या प्रांतावर स्वतंत्र अधिकार देऊन राजानें नेमावें लागतें. अशा नेमणुका चालुक्यांनीं केल्या व त्या योगानें चालुक्यांच्या तीन शाखा उत्पन्न झाल्या. राष्ट्रकूटांनींहि तोच मार्ग अवलंबिला. त्यास अनुसरून गोविंद राजानें गुजराथेंत माही व तापी या दोन नद्यांमधील लाट देशावर आपला भाऊ इंद्र दुसरा यास नेमलें व आपल्या घराण्याची वेगळी शाखा स्थापली.

## अमोघवर्ष पहिला

तिसरा गोविंद इ. स. ८१३ त मरण पावला. त्याच्यामागून त्याचा पुत्र अमोघवर्ष पहिला सिंहासनावर बसला. त्यावेळीं तो वयानें अवघा सहा वर्षांचा होता म्हणून तिसऱ्या गोविंदानें मृत्यूपूर्वी आपला भाऊ गुजराथेचा राजा इंद्र याचा पुत्र कर्क सुवर्णवर्ष याजकडे राज्यकारभार सोंपविला. तथापि अमोघवर्षाच्या बालपणांत राज्यांत बखेडा व अंदाधुंदी माजावयाची ती माजलीच. मांडलिकांनीं बंडें केलीं, व वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांचे खून झाले. त्या दंगलींत अमोघवर्षास पदच्युतहि व्हावें लागलें. कर्कानें आपल्याकडून बंडें मोडण्याचा प्रयत्न केला, व अखेरीस त्याला त्यांत यशहि आलें. तेव्हां अमोघवर्षाचें वय १२।१३ वर्षांचें होतें. वेंगीच्या चालुक्यांबरोबर राष्ट्रकूटांचें युद्ध पूर्वापार जुंपत असेच. वेंगीचा चालुक्य राजा गुणग विजयादित्य तिसरा यानें राष्ट्रकूटांच्या मुलखांत फारच गोंधळ माजवून अमोघवर्षाची सत्ता संपुष्टांत आणिली, आणि आपल्या बापास राष्ट्रकूटांनीं अंगण झाडावयास लावलें होतें त्याचा सूड घेतला. अमोघवर्ष जसा मोठा झाला तसें त्यानें आपलें सामर्थ्य वाढवून वेंगीच्या चालुक्यांचा पराभव इ. स. ८६६ च्या सुमारास केला. गुजराथेंत त्यास स्वतःच्या चुलत भावाबरोबर लढावें लागलें. उत्तरकोंकण प्रांतावर पहिल्या कृष्णानें शिलाहारांची स्थापना केली

होती. त्या वंशांतील पुलशक्ति हा राजा गुजराथेच्या राष्ट्रकूट शाखेचा अंकित होता व हे राष्ट्रकूट इ. स. ८२७ पासून स्वतंत्रपणें वागूं लागले होते.

अमोघवर्षाच्या कारकिर्दींत राष्ट्रकूटांची मान्यखेट (मालखेड) राजधानी फार भरभराटीस पोंचली. त्यानें तिची तटबंदी पुरी केली. त्याचें लक्ष राज्यकार-भारापेक्षा परमार्थाकडे अधिक असल्यामुळें वयाच्या ७० वर्षांच्या सुमारास अमोघवर्ष अध्यात्मचिंतनांत निमग्न राहिला. त्याजवर दिगंबर जैन पंथांतील साधूंची छाप चांगलीच पडली होती. जिनसेन नामक जैन साधू त्याचा गुरु होता. याचा अर्थ त्यानें सनातनधर्म सोडला असा नव्हे. कारण तो महा-लक्ष्मीचाहि भक्त असून त्यानें एकदां आपल्या डाव्या हाताचें बोट कापून महालक्ष्मीला वाहिलें होतें. याच्या कारकिर्दींत धारवाड जिल्ह्यांत शिग्गांव ( Shiggaon ) येथें आदित्यभत्तार ( Bhataram ) म्हणजे सूर्य, महादेव इत्यादि देवांना बागाईत जमिनी दान केल्याचे शिलालेख सांपडले आहेत (Karnatak Inscriptions, Vol. I). अमोघवर्षाची कारकीर्द बरीच मोठी झाली. पण लष्करीदृष्ट्या ती पराक्रमशाली नव्हती. चन्द्रवल्लभा नांवाची आपली कन्या अमोघवर्षानें गंगराजपुत्र बुटुग गुणदत्तरंग यास देऊन गंगांशीं सख्य जोडलें. तेव्हांपासून गंगवाडी राष्ट्रकूट साम्राज्यांतून बाहेर पडली. चन्द्रवल्लभा रूपानें सुंदर व नर्तनकुशल होती असें वर्णन आहे. गुजराथे-प्रमाणें माळवा प्रांतहि स्वतंत्र झाल्यानें उत्तरेकडे राष्ट्रकूटांची सत्ता उरली नाहीं. वेंगीचा राजा विक्रमादित्य याचा अमोघवर्षानें पराभव केला तोच काय तो त्याचा मोठा विजय. त्याचा बहुतेक काळ भाऊबंदकीच्या भांड-णांत गेला.

अमोघवर्षाचें वाङ्मयीन चळवळीकडे लक्ष होतें. तो स्वतः संस्कृत व कानडी या दोन भाषांत निष्णात होता. त्यानें प्रश्नोत्तररत्नमालिका व कवि-राजमार्ग हे संस्कृत ग्रंथ लिहिले. पहिला ग्रंथ नीतिवचनसंग्रहासारखा आहे,

व दुसरा ग्रंथ दंडीच्या काव्यादर्श या ग्रंथाच्या आधारें रचिला आहे. त्याच्या कारकिर्दींत वीराचार्य नांवाच्या जैन पंडितानें गणित–सारसंग्रह नांवाचा ग्रंथ लिहिला. वीरसेनाच्या आदिपुराणावरील जयधवल टीका त्याच्या कारकिर्दींत लिहिली गेली. मरणसमयीं अमोघवर्षाचें वय ८० च्या घरांत होतें.

## कृष्ण दुसरा

अमोघवर्षामागून त्याचा पुत्र दुसरा कृष्ण इ. स. ८८० च्या सुमारास गादीवर बसला. त्याला गादीवर बसल्यानंतर भोंवतालच्या राजांशीं लढावें लागलें. दक्षिणेस गंग व नोळंब यांजबरोबर, पूर्वेस वेंगीच्या चालुक्यांबरोबर आणि उत्तरेस गुर्जर-राष्ट्रकूट व कनोजचे गुर्जर प्रतिहार यांजबरोबर त्याचें युद्ध जुंपलें. कृष्णाचें लग्न चेदी ( जबलपूर ) देशाचा कलचुरी राजा कोक्कल याच्या कन्येशीं झालें असल्यामुळें त्याला युद्धप्रसंगांत केव्हां केव्हां चेदींची मदत मिळाली. कृष्णाच्या वेळीं वेंगीचा चालुक्य राजा विजयादित्य तिसरा याची तयारी चांगली होती. कारण त्याला कंदयराज व पांडुरंग हे दोन पराक्रमी सेनापति व विनयादित्य शर्मा हा हुशार ब्राह्मण मंत्री लाभला होता. त्यांच्या जोरावर विजयादित्यानें राष्ट्रकूटांच्या राज्यावर मुद्दाम स्वारी केली. तींत कृष्णाच्या सेनापतींचा मोड झाल्यावर कृष्णास स्वतःला आघाडीवर जावें लागलें. त्याच्या मदतीस त्याचा मेहुणा कलचुरी युवराजहि आला. पण त्या दोघांचा चालुक्य राजापुढें टिकाव लागला नाहीं. चालुक्य राजा विजयादित्य एवढ्यावर न थांबतां त्यानें दक्षिण कोसल आणि विदर्भ यांत शिरून अचलापूर ( एलिचपूर ) किरणपूर ( बालाघाट ) हीं नगरें जाळलीं. इतकेंच नव्हे, तर मालखेडहि पेटवून दिलें. (His. Inscriptions of S. India P. P. 39) शेवटीं उभय-पक्षांत तह होऊन युद्ध संपलें.

माळव्याचे परमार राजे राष्ट्रकूटांचे पांच पिढ्या मांडलिक होते. त्यांजवर लाट ( गुजराथ ) देशावरील राष्ट्रकूट राजे मध्यवर्ति राष्ट्रकूट सत्तेच्या वतीनें दाब ठेवीत. उत्तरेस गुर्जर प्रतिहार व दक्षिणेस राष्ट्रकूट प्रबल असेपर्यंत परमारांना डोकें काढण्यास वाव नव्हता. पण कृष्णाच्या काळांत राष्ट्रकूट सत्तेचें पाऊल कांहींसें मागें हटलें व माळव्याचा परमार राजा भोज पहिला पराक्रमी व युद्धविशारद निपजला. त्यानें कृष्णाशीं टक्कर देऊन पाहिली तेव्हां त्याला स्वतःचा कमकुवतपणा पूर्णपणें समजून चुकला. गुजराथेचे राष्ट्रकूट राजेहि कृष्णास जुमानीतनासे झाले होते. त्यांचाहि कृष्णानें पराभव करून आपलें त्यांजवरील वर्चस्व टिकविलें. वनवासीचा कदंबराजा कलिवित्त हा त्याचा मांडलिक होता व नोळंबवाडीवरहि त्याचें राज्य होतें ( His. Ins. of S. India, Page 41 ). कृष्णाचें सामर्थ्य एकंदरीनें बेताचेंच होतें. वेंगीचें चालुक्य घराणें लहान असतांहि त्याजपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं, यांतच त्याच्या सामर्थ्याचा अंदाज आला. कोणीकडून कलचुरी सासरा व मेहुणा यांच्या सहाय्यानें त्यानें आपलें आसन कायम राखलें इतकेंच.

## इन्द्र नित्यवर्ष तिसरा

कृष्ण दुसरा इ. स ९१४ च्या अखेरीस मरण पावल्यावर त्याचा नातू तिसरा इन्द्र नित्यवर्ष वयाच्या ३५ व्या वर्षी राज्यावर आला. कारण, कृष्णाचा पुत्र जगत्तुंग यावेळीं हयात नव्हता ( राष्ट्रकूटाज् अँड देअर टाइम्स, पृ. ९९ ). त्याची कारकीर्द अगदीं छोटी पण तेजस्वी ठरली. त्यानें कारकिर्दीच्या प्रारंभींच कनोजच्या प्रतिहारावर स्वारी केली. कनोजास जातांना वाटेंत माळव्यांत शिरून उज्जयिनीस महाकाळेश्वराची त्यानें पूजा केली, व या मोहिमेंत प्रतिहारराजा महीपाल याचा पराभव केला. अशा रीतीनें इन्द्र उत्तरेंत दरारा बसवीत असतां त्याचे सेनापति दक्षिणेंत विजय मिळवीत होते. त्यांपैकीं श्रीविजय हा सेनापति जैन होता हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

## अमोघवर्ष दुसरा

इन्द्र इ. स. ९१७ च्या सुमारास दिवंगत झाला. त्याच्यामागून त्याचा सर्वांत वडील पुत्र अमोघवर्ष दुसरा राज्यारूढ झाला. त्यावेळीं त्याचें वय २५ वर्षांचें होतें. तो कलचुरी राजकन्या विजंबा हिच्या पोटीं जन्मास आला होता. त्यास राज्यपद अवघें वर्षभरहि लाभण्यापूर्वी मृत्यूनें त्याला गांठलें. त्याच्यामागून त्याचा धाकटा भाऊ गोविंद चौथा गादीवर आला.

## गोविंद चौथा

गोविंद गादीवर आला तेव्हां त्याचें वय वीस वर्षांचें होतें. रूपानें केवळ तो मदनच वाटला. वय लहान, अधिकार मोठा व रूपसंपदा अनुकूल या त्रिविध कारणांनीं गोविंद विलासी व सुखलोलुप निघाला. त्याजभोंवतीं नर्तकींचा गराडा पडला. अशा स्थितींत गोविंदाचें लक्ष राज्यकारभारावरून उडावें यांत नवल नाहीं. गादीवर आल्यापासून पंधरा वर्षे त्यानें आयुष्य चैनींत घालविलें. त्यामुळें शत्रूंचें चांगलेंच फावून कनोजचा प्रतिहार राजा महीपाल यानें या संधीचा पूर्ण फायदा घेतला. महीपाल इ. स. ९१४ ते ९४६ पर्यंत राज्यकारभार करीत होता. तो मोठा वीरपुरुष असल्यानें त्यानें राष्ट्रकूटांच्या ताब्यांतील कनोज परत घेतलें, लाटदेश जिंकला व परमारास हांकून देऊन माळवा आपल्या राज्यास जोडला ( परमार घराण्याचा इतिहास, डी. सी. गांगुलीकृत). परमार राजा वैरिसिंह माळव्यांतून हुसकावून लावल्यावर राष्ट्रकूटांच्या राज्यांत आश्रयास येऊन राहिला. त्यास मान्यखेटाहून राष्ट्रकूटांनीं मदत दिली. ती घेऊन वैरिसिंह हा महीपाल मेल्यावर त्याच्या गादीवर बसलेला त्याचा पुत्र महेन्द्रपाल दुसरा याजवर चालून गेला व त्यानें महेन्द्रपालास माळव्यांतून घालवून आपलें राज्य परत मिळविलें. ही गोष्ट गोविंदाच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनीं म्हणजे इ. स. ९४९ च्या सुमारास घडली असल्यानें तिचें श्रेय अर्थात्‌च गोविंदास नाहीं. गोविंदानें वेंगीचा चालुक्यराजा दुसरा भीम याजवर सैन्य पाठविलें होतें त्याचाहि

भीमानें फडशा पाडला. गोविंदानें ता. १० मे ९३० रोजीं गोदावरी-तीरीं कपित्थक ( कवठें ) येथें आपली सुवर्णतुला केली, ६०० गांवें ब्राह्मणांना अग्रहार दिलीं व ८०० गावें देवालयांना दिलीं ( His. Ins. of S. India, P 44 ).

गोविंद एकंदरीनें नादान निघाल्यामुळें त्याला पदच्युत करण्याचा कट होऊन त्याच्याऐवजीं अमोघवर्ष तिसरा राजा झाला.

## अमोघवर्ष तिसरा व कृष्ण तिसरा

बद्दिग ऊर्फ अमोघवर्षास इ. स. ९३५ च्या सुमारास गादी मिळाली असावी. त्यानें सरासरी चार वर्षें राज्य केलें. तो स्वतः धार्मिक प्रवृत्तीचा असल्यामुळें पूर्वींच्या दुराचारी राजापेक्षां हा प्रजेला प्रिय झाला असल्यास नवल नाहीं. त्यानें आपली एक कन्या गंगराजास दिली. अमोघवर्षाच्या हातून महत्वाचें असें कोणतेंच कृत्य घडलें नाहीं. त्याच्यापेक्षां त्याचा पुत्र तिसरा कृष्ण ऊर्फ कन्नर हाच कर्ता निघाला. त्यानें उत्तरेस स्वारी करून चेदींचा ( कलचुरी ) पराभव केला. त्याची आई व भार्या याच घराण्यांतील होती. त्याच्या सैन्यानें चित्रकूट व कलिंजर या किल्ल्यांत तळ दिला. तो उत्तरेच्या मोहिमेवर असतांच त्याचा बाप मरण पावला. त्यानंतर म्हणजे ९३९ च्या सुमारास कृष्णानें आपणास राज्याभिषेक करून घेतला. वेंगीच्या चालुक्यांवर स्वारी करून इ. स. ९५७ च्या सुमारास तेथील राजा अमरराज यास त्यानें गादीवरून काढून टाकलें. पांड्य व केरळ यांना शरण आणून त्यानें सिंहलद्वीपच्या राजापासून खंडणी घेतली. याच मोहिमेंत आपला मांडलिक राजा बटुग दुसरा ( गंग ) याच्या मदतीनें परांतक चोल पहिला याजपासून कांची व तंजावर काबीज करून व रामेश्वरास जाऊन त्या प्रसिद्ध क्षेत्रांत तो राहिला. कृष्णानें आपणास अकालवर्ष व वल्लभ या पदव्या घेतल्या. त्याच्या ताब्यांत चिंगलपुट व अर्काट या जिल्ह्यांचा कांहीं

भाग होता. त्यानेंच परमार राजा वैरिसिंह यास मदत करून त्याची माळ-व्याच्या गादीवर पुनः स्थापना केली.

कृष्ण हा राष्ट्रकूटांतील शेवटचा बलाढ्य राजा. तो इ. स. ९६६ च्या सुमारास मरण पावला ( His. Ins. of S. India, Page 50 ). त्याच्या राजवटींत राष्ट्रकूट घराणें पुनरपि वैभवशिखरावर पोंचलें.

## खोट्टिग नित्यवर्ष अमोघवर्ष चौथा

कृष्णामागून त्याचा धाकटा भाऊ खोट्टिग यास राजपद मिळालें व तेव्हांपासून राष्ट्रकूट सत्तेस उतरती कळा लागली. त्याच्या राज्यावर पहिला आघात उत्तरेकडून परमारांनीं केला. राष्ट्रकूटांचा आश्रित वैरिसिंह परमार मेल्यावर त्याच्या गादीवर इ. स. ९४९ त त्याचा पुत्र सियक ऊर्फ हर्ष आला होता. त्यानें राष्ट्रकूटांची सत्ता आंतून पोखरली असल्याचें जाणून खोट्टिगाचे कारकिर्दींत त्यावर स्वारी केली. त्याला या कामीं त्याचा मांडलिक वागदाचा कंक याचें सहाय्य मिळालें. परमारास तोंड देण्याकरितां खोट्टिग माळव्याकडे चालून आला. उभयपक्षांचें नर्मदातीरीं कालीघाटावर तुंबळ युद्ध झालें. त्यांत कंक कामास आला तरी सियकानें खोट्टिगाचें पारिपत्य केलेंच. खोट्टिग शत्रूस पाठ दाखवून आपल्या राजधानीस येत असतां सियकानें त्याचा पाठलाग मान्यखेटापर्यंत केला. त्यानें इ. स. ९७२ त मान्यखेट लुटलें व त्यास आगीहि लावल्या. पण त्यास तेथील दुर्ग व राजकुटुंब हस्तगत करतां आलें नाहीं. कारण त्यांचें संरक्षण गंगराजा मारसिंह यानें केलें. एवढ्यावरच न थांबतां त्यानें हर्षाच्या पाठोपाठ जाऊन त्याचा तापी व विन्ध्याद्रि यांच्या आसपास फडशा पडला.

मालखेडच्या विनाशानंतर खोट्टिग फार दिवस जगला नाहीं. तो त्याच वर्षीं धीर खचून निवर्तला. त्याच्यामागून त्याचा पुतण्या म्हणजे निरूपमाचा पुत्र कर्क यास राज्य मिळालें. कर्काचा विजापूर जिल्ह्यावर तैल नांवाचा सामंत असून तो त्याचा जांवईहि होता. यास कर्काची कन्या जाकव्वा ही

दिली होती ( His. Inscri. of S. India, Page 383 ). **सामंत** तैल हा बदामीच्या चालुक्यांपैकीं असावा. सामंतपद लक्षांत न आणतां त्यानें राज्यांत माजलेल्या बखेड्यांत हात धुवून घेण्याचें ठरवून बंड उभारलें. या कामीं त्यास सेऊण देशाच्या यादवांनींहि मदत केली. सन ९७३ त उभयपक्षांची लढाई होऊन कर्क ठार झाला. तैल यानें मालखेड राजधानी पार लुटली. वरील यादव, सौंदत्तीचे रट्ट व कोंकणचे शिलाहार यांनीं स्वतंत्र होऊन राष्ट्रकूटांचा राज्यविस्तार व सामर्थ्य क्षीण करून सोडलें होतें. परमारानींही त्यास जबरदस्त धक्का दिला होता. त्यावर तैल यानें कळस चढवून राष्ट्रकूट साम्राज्य धुळीस मिळविलें.

## उपसंहार

कृष्णराज तिसरा याच्या मृत्यूनंतर अवघ्या पाच वर्षांत राष्ट्रकूट राज्य नाहींसें झालें याचें कोणासहि आश्चर्य वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. दन्तिदुर्गांपासून काळ मोजल्यास हें घराणें सुमारें अडीचशें वर्षें टिकलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा काळ लहान नव्हे. एवढा दीर्घकाळ राज्य त्याच्यांतील नैसर्गिक मजबुतीमुळेंच टिकलें असेंच अनुमान निघतें. चालुक्य राज्य व राष्ट्रकूट राज्य यांचें जीवमान जवळजवळ सारखेंच भरतें. राष्ट्रकूट हें कांहीं कमी कर्तबगार व कमी पराक्रमी घराणें नव्हतें. त्यांनीं हिंदुस्थानांतील बहुतेक राजांचा पराभव केला. उत्तरेस कनोज, पूर्वेस बंगाल व दक्षिणेस रामेश्वर, सिंहलद्वीप येथपर्यंत त्यांचा विजयशाली झेंडा नाचला. फक्त पंजाब, सिंध, हे प्रांत पादाक्रांत करावयाचे राहिले होते. नुसते पराभव केलेले व खंडणी घेतलेले प्रांत सोडल्यास त्यांच्या साम्राज्यांत दक्षिण गुजराथ, माळवा, मराठी मध्यप्रांत, कोंकण, सबंध वऱ्हाडसुद्धां महाराष्ट्र, हैदराबाद संस्थान, कर्नाटक व म्हैसूर इतका प्रदेश मोडत होता. या प्रदेशांत राजे होते, पण ते राष्ट्रकूटांचे मांडलिक होते. राष्ट्रकूट राजे मोहिमेवर निघाले म्हणजे त्यांना या मांडलिक राजांची कुमक मिळे. हें राज्य

सुमारें अडीचशें वर्षें टिकलें याचें मुख्य कारण एकच कीं, त्यांत कर्तबगार व समर्थ राजांची परंपरा एकसारखी सुरू राहिली. या दृष्टीनें राष्ट्रकूट घराणें बदामीच्या चालुक्य घराण्यापेक्षांहि श्रेष्ठ ठरतें. आपलीं सर्व राज्यें राजांच्या वैयक्तिक गुणांवरच भरभराटीस आलीं आहेत व टिकलीं आहेत. राजे दुर्बल, नालायक व अकर्ते निघाले म्हणून त्यांना पदच्युत करून मंत्रि-मंडळानें त्या घराण्यातील किंवा दुसऱ्या एखाद्या पुरुषास गादीवर बसविलें असें क्वचित् घडतें. फार तर राजघराण्यांतील पुरुषांमध्यें परस्परांशीं भांडणें लागून त्यांपैकीं अधिक समर्थ पुरुषानें राज्य बळकावल्याचीं उदाहरणें घडतात. तसा प्रकार राष्ट्रकूट घराण्यांतहि दिसून आला. राष्ट्रकूट राजा दुसरा गोविंद यास त्याचा धाकटा भाऊ ध्रुव यानें याच रीतीनें पदच्युत करून गादी बळकावली. पुढें ध्रुवानें आपल्या पश्चात् वडील पुत्र स्तंभ यास गादीचा मालक न करतां धाकटा पुत्र गोविंद तिसरा यास करण्यांत त्याची पात्रताच अधिक ओळखली. राजघराण्यांतील अनेक पुरुष विद्यमान असले म्हणजे असे उपाय निघतात. पण कृष्णासारख्या पराक्रमी राजाच्या मृत्यूनंतर अवघ्या पांच वर्षांत राष्ट्रकूट घराणें बुडालें याचें कारण त्या घराण्यांत लायक व कर्तबगार पुरुष कोणी उरला नाहीं हेंच होय. यावेळीं मंत्रिमंडळानें राजास मदत करून राज्य रक्षावयाचें, त्याऐवजीं मंत्रिमंडळां-पैकींच एक असा तैल ऊर्फ तैलप यानेंच गादी बळकावली हें परशत्रूनें येऊन राज्य जिंकण्यापेक्षा कमी हानिकारक समजण्यास हरकत नाहीं. त्याला यादवादिक मांडलिक राजांनीं मदत करून राष्ट्रकूटांची सत्ता संपुष्टांत आणली हें उघड आहे. राष्ट्रकूट मांडलिक असतां त्यांनीं पूर्वीं चालुक्यांना पालथें घातलें व आतां चालुक्य मांडलिक असतां त्यांनीं राष्ट्रकूटांना पालथें घालून त्यांजवर डाव उलटविला.

राष्ट्रकूट घराणें उपटसुंभ नव्हतें. चालुक्य काळांत तें मोठ्या अधि-कारावर असून चालुक्य सत्तेच्या परिसमाप्तीचे वेळीं उच्च दर्जाच्या राज-

कुलांत गणना होण्याजोगी त्यास योग्यता आली होती. बदामीचे चालुक्य व कल्याणचे चालुक्य या दोन्ही राजघराण्यांशीं राष्ट्रकूटांचा शरीरसंबंध जडला. राष्ट्रकूटांचा कुलोद्धारक दन्तिदुर्ग याचा बाप इन्द्र दुसरा याचें लग्न बदामीच्या चालुक्य राजकन्येशीं झालें होतें. कल्याण चालुक्य तैलप दुसरा यानें राष्ट्रकूट कर्क याच्या कन्येशीं लग्न केलें ( His. Ins. of S. India, P. 384 ). राष्ट्रकूट व पल्लव यांचें खडाष्टक असूनहि राष्ट्रकूट अमोघवर्ष पहिला याची कन्या शंखा ही पल्लव राजा नंदिवर्मन तिसरा याची भार्या होती. चेदी देशचे कलचुरी राजे यांचा व राष्ट्रकूटांचा शरीरसंबंध अनेकवार घडून आला. कारण, राष्ट्रकूट कृष्ण दुसरा याची भार्या कलचुरी कोक्कल याची कन्या होती. राष्ट्रकूट जगत्तुंग दुसरा यानें कलचुरी राजकन्या लक्ष्मी हिला वरिलें. कलचुरी राजकन्या विजांबा ही राष्ट्रकूट इन्द्र तिसरा याची भार्या. अशा रीतीनें कलचुरी, चालुक्य व पल्लव हे राष्ट्रकूटांचे प्रतिस्पर्धी प्रमुख राजे राष्ट्रकूटांचे सोयरे व संबंधी बनले होते. बदामीकर चालुक्यांचीहि सोयरीक कलचुरींशीं झाली होती व त्यानंतर राष्ट्रकूटांची सोयरीक अनेकवार जुळून आली, ती लक्षांत घेतल्यास चेदीचे कलचुरी घराण्यांतील वंशज यांस पुढें बाराव्या शतकांत महाराष्ट्राचें सम्राट्पद मिळण्यापूर्वी महाराष्ट्रात ठिकठिकाणीं अधिकाराच्या जागांवर ते नांदत असतील व महाराष्ट्राचे कायमचे रहिवासी बनले असतील यांत नवल नाहीं. राष्ट्रकूट स्वतः सम्राट् असल्यानें समान योग्यतेच्या घराण्यांत आपल्या मुली देत असतच. पण तें शक्य नसेल तेव्हां मांडलिकांनाहि मुली देणें त्यांस भाग पडे. त्याप्रमाणें अमोघवर्ष तिसरा याची कन्या रेवका ही त्यानें पश्चिमगंग बुटुग दुसरा यास दिली होती.

दन्तिदुर्ग या पहिल्या स्वतंत्र राष्ट्रकूट राजापासून शेवटच्या कर्कापर्यंत चौदा राजे होऊन गेले. त्यांपैकीं नऊ राजे लायक व समर्थ निघाले याचें कारण त्यांचें सत्कुलोत्पन्नत्व, त्यांस मिळालेलें क्षत्रियास योग्य असें सुशिक्षण व त्यांच्या भोंवतालचें उच्च वातावरण हेंच होय. राष्ट्रकूटांनीं आपलें

क्षत्रियत्व इतर वर्णांशीं संकर होऊं न देतां कायम राखलें. त्यांजपैकीं पहिल्या कर्क राजानें यज्ञ केले. दन्तिदुर्गानें उज्जयिनीस हिरण्यगर्भ महादान केलें व रथसप्तमीस सुवर्णतुला केली या गोष्टी द्विजत्वाचे संस्कार त्याजवर जन्मापासून झाले असल्याशिवाय संभवनीय नाहींत. मात्र या काळांत यज्ञ-संस्था हळूहळू मागें पडत चालली होती असें म्हणावें लागतें. त्याचें प्रमाण म्हणजे शातवाहन व वाकाटक यांच्या राजवटींत जितके यज्ञ झाले त्यांपेक्षां चालुक्य काळांत त्यांचें मान कमी व त्याहिपेक्षां राष्ट्रकूटकाळीं आणखी कमी हा फरक स्पष्ट दिसतो यज्ञाहून देवळें बांधण्याकडे प्रवृत्ति अधिक वाढत चालली. दक्षिणेस पल्लवांपैकीं महेंद्र पोट्टराज पहिला यानें इ.स. ६०० च्या सुमारास महाबळीपूर येथें खडक फोडून देऊळ रचिलें. पल्लवराजा दुसरा नरसिंहवर्मा यानें कांचीवरम् येथें इ. स. ६९० च्या सुमारास कैलासनाथाचें मंदिर बांधलें. त्याच धर्तीवरील चालुक्य सम्राट् मंगलीश यानें बदामीच्या डोंगरांत पोखरलेलें विष्णु लयन व राष्ट्रकूट कृष्णराज पहिला यानें इ. स. ७८० च्या सुमारास वेरूळच्या टेकड्यांत कोरलेलें कैलास लयन हीं होत. यानंतर सुमारें ९० वर्षांनीं गंग राजा रचमल्ल दुसरा यानें उत्तर अर्काट जिल्ह्यांत एक गुहा-मंदिर निर्मिलें. हीं सर्व जनांच्या विचारांत घडूं लागलेल्या क्रांतीचीं द्योतक समजण्यास हरकत नाहीं.

दन्तिदुर्ग या पहिल्या स्वतंत्र राष्ट्रकूट राजापासून शेवटच्या कर्कापर्यंत चौदा राजे होऊन गेले. पैकीं नऊ राजे विशेष लायक व समर्थ निघाले याचें कारण त्यांच्या अंगचे आनुवंशिक गुण, त्यांस मिळालेलें सुशिक्षण व त्यांच्या विद्यार्थिदशेंत त्याजभोंवतीं निर्माण केलेलें अनुकूल वातावरण यांसच द्यावें लागेल. जे अगदीं नालायक व नादान निपजले असे राजे केवळ दोनच; ते गादीवरहि अल्पकाळच राहिले. सव्वादोनशें—अडीचशें वर्षांत चौदा राजे झाले. म्हणजे प्रत्येक राजा सरासरीनें वीस वर्षें गादीचा उपभोग घेणारा निघाला. हें आयुर्मानहि देशस्थितीच्या मानानें कमी नव्हे.

राष्ट्रकूटांचें आरमारी सामर्थ्य आपणास माहीत नाहीं. त्यांच्या बहुतेक सगळ्या लढाया जमिनीवरच झाल्या असल्यानें आरमारी सामर्थ्याची त्यांना गरज नव्हती. फक्त पश्चिम किनाऱ्याचें रक्षण परचक्रापासून करण्यास जेवढें आरमार लागेल तेवढें त्यांनीं ठेवलें असेल. एकंदरींत चालुक्य काय किंवा राष्ट्रकूट काय, या हिंदू राजांचें लक्ष आरमाराकडे नव्हतें हेंच खरें. त्यांना समुद्रापलीकडे इराण, अरबस्तान, मिसर, हबसाण इत्यादि देश जिंकावयाचे असते किंवा त्या देशांच्या राजांनीं त्याजवर समुद्रांतून स्वाऱ्या केल्या असत्या तरच आरमाराची उणीव त्यांना भासली असती. हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्यावर व्यापार करण्यास कोणाही देशाच्या लोकांना मोकळिक असल्यानें त्याही बाबतींत परदेशीय राजांशीं कधीं हिंदु राजांची कटकट झाली नाहीं. हिंदुस्थानावर पश्चिम समुद्रांतून स्वारी करून आंतला प्रदेश जिंकण्याची गोष्ट सोपी नव्हती. त्याला द्रव्यबल व मनुष्यबल फार मोठें पाहिजे होतें. तितकें बळ स्वतःत नसलेले वरील लहान परदेशी राजे स्वारीच्या खटपटींत पडतील कशाला? आशिया व युरोप यांजमध्यें मालाची देवघेव करण्यांत गुंतलेल्या त्यांच्या प्रजेस पोटाला मिळत होतें व त्यांजपासून होणाऱ्या कराच्या उत्पन्नावर राजांचीं राज्यें चालत होतीं. याहि कारणानें हिंदुस्थानावरील स्वारीचा विचार त्यांना सुचला नाहीं. असें होतें तरीहि पण राष्ट्रकूटांतील तिसरा कृष्ण यानें सारा दक्षिणदेश रामेश्वरापर्यंत जिंकल्यावर सिंहलद्वीपावर स्वारी करून तेथील राजापासून खंडणी घेतली, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पण सदर कृत्य त्यास पांड्य आरमाराच्या मदतीनेंहि करतां येण्यासारखें होतें.

---

# प्रकरण सातवें

## कल्याणचें चालुक्य घराणें

(इ. स. ९७३ ते ११५० )

### तैलप दुसरा

चालुक्य घराण्यांतील तैल तथा तैलप दुसरा हा राष्ट्रकूटांचें साम्राज्य धुळीस मिळविण्यापूर्वी त्यांचा सेवक असून त्यानें बागेवाडी तालुक्यात नरसगी येथील ६ मार्च सन ९६५ च्या लेखांत आपणांस महासामंताधिपति व तिसऱ्या कृष्णाचा सेवक म्हटलें आहे. गंग राजा तिसरा मारसिंह हा राष्ट्रकूटांचा इमानी सेवक होता. त्यानेंच परमार राजा हर्ष याच्या परचक्रापासून राष्ट्रकूटराजा खोट्टिग व त्याचें कुटुंब यांचा बचाव केला होता. त्याला तैलपाचा विश्वासघात सहन न होऊन त्यानें तिसऱ्या कृष्णाचा नातू चौथा इन्द्र याचा पक्ष घेऊन त्यास राज्याभिषेक करविला. त्याचें लहानसें राज्य धारवाड जिल्ह्यांत होतें. मारसिंह जैन मताचा असून तो त्या मताप्रमाणें धारवाड जिल्ह्यांत बंकापुरास प्रायोपवेशन करून ( His. Ins. of S India, Page 52 ) इ. स. ९७४ त मरण पावल्यावर त्याच्यामागून गंगराजा पांचालदेव यानेंहि इन्द्राचा पक्ष उचलून धरला. तैलपास ही उठावणी अर्थातच रुचण्यासारखी नसल्यामुळें त्यानें आपला एक सेनापति नागदेव यास पांचालदेवाच्या पारिपत्यास पाठविलें. तेव्हां त्या उभयतांची लढाई झडून तींत पांचालदेव प्राणास मुकला. इन्द्रास यापुढें कोणीच वाली उरला नाहीं, अशा स्थितींत हताश होऊन त्यानें इ. स. ९८२ त जैन तत्वास अनुसरून सल्लेखन म्हणजे प्रायोपवेशन करून इहलोक सोडला.

अशा रीतीनें तैलपाच्या वाटेंतील कांटा उपटून निघाल्यावर तैलप आपलें आसन स्थिर करण्याच्या उद्योगास लागला. तैलपास तैल, तैलप्पा, तैलपय्या अशा वेगवेगळया नांवांनीं संबोधण्यांत आलें आहे. कांहीं ताम्र-

पटांत त्यास महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक समस्त भुवनाश्रय श्रीमत् आहवमल्लदेव असेंहि म्हटलें आहे. सेऊण देशचे यादव तैलपाचे सहाय्यक होते. त्यांनींहि त्याचें सार्वभौमत्व कबूल केलें. तैलपाची राजधानी मान्यखेटास इ. स. ९९३ पर्यंत असल्याचें दिसून येतें ( The Chalukyas of Kalyani, by S. L. Katre, Indian Historical Quarterly, March 1941 ). तैलपाचा पुत्र युवराज सत्याश्रय याचें त्यास राज्यप्रसाराच्या बाबतींत चांगलें सहाय्य झालें. त्यानें उत्तर कोंकणच्या शिलाहारांना शरण आणिलें. त्याची सत्ता म्हैसूर प्रांताचा कांहीं भाग, अनंतपूर व बल्लारी यांवरहि पसरली.

'चोलराजा राजराज पहिला यावर स्वारी करून त्यानें त्याचा पराभव केला. चेदी राजासहि त्यानें असेंच शरण आणिलें' ( Bombay Gazetteer General chapters, Page 212 ). त्याचा सेनापति बारप यानें गुजराथमध्यें शिरून अनिहलपट्टण येथील चौलुक्य घराण्याचा संस्थापक मूळराज यास नमविलें व लाट देश आपल्या ताब्यांत घेतला ( Bombay Gazetteer, General chapters, Page 213 ). चौलुक्याप्रमाणें उत्तरेस परमाराविरुद्धहि तैलपानें शस्त्र उपसलें. परमार राजा वाक्पति तथा मुंज याच्या तैलपाशीं अनेकवार झटापटी उडून त्यांत केव्हां केव्हां मुंजानें तैलपासहि धूळ चारली. तथापि शेवटच्या झटापटींत मुंजाचें दैव फिरलें. त्याचा प्रधान रुद्रादित्य यावेळीं आजारी होता. त्यानें मुंजास तैलपावरील स्वारीचें साहस न करण्यास सांगितलें असतांहि मुंज मोहिमेस निघाला. त्यानें आपली छावणी गोदावरीच्या दक्षिण तीरावर ठोकली. रुद्रादित्यास मुंजानें केलेला अविचार कळतांच त्यानें अग्निकाष्ठ भक्षिलें. मुंजाची तैलपाच्या सेनेशीं लवकरच गांठ पडली. तुमुल युद्ध जुंपलें व त्यांत मुंज तैलपाच्या हातीं पडला. त्याला तैलपानें दोरानें बांधून एका लांकडी पिंजऱ्यांत ठेवलें. पण मुंजाचे इतर मंत्री तैलपाच्या राजधानींत लवकरच येऊन त्याच्या मुक्ततेच्या

तजविजीस लागले. त्यांनीं एक गुप्त बोगदा खणला व त्यातून मुंजास पळवून नेण्याची मसलत योजली. पण मुंजानें मूर्खपणा केला. त्याच्या दिमतीस तैलपानें आपली बहीण मृणालवती हिला दिलें होतें. तिच्या प्रेमपाशांत सांपडून मुंजानें हें गुपित तिला सांगितलें. पण ती तरुणी भावाच्या पूर्ण विश्वासांतली. तिनें हें गुप्त वर्तमान भावास निवेदिलें. मग तैलपाचा राग काय विचारावा ! त्यानें आपल्या सेवकांकडून मुंजाला काढण्यानीं बांधविलें व त्यास दारोदार भिक्षा मागत हिंडविलें. शेवटीं त्याची राजमार्गावरूनहि धिंड काढविली. अखेर त्यास वधस्तंभापाशीं नेऊन त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. त्याचें मस्तक तेथून काढून व तें दह्यानें माखून राजवाड्याच्या अंगणांतील एका खांबावर अडकवून ठेवण्यांत आलें. परमारांशीं झालेल्या या युद्धांत तैलपास त्याचा दक्षिण खानदेशावर (सेऊण) राज्य करणारा मांडलिक यादव राजा दुसरा भिल्लम याचें बहुत साहाय्य झालें ( History of the Parmar Dynasty, by D. C. Ganguli ).

तैलपानें एकंदर २४ वर्षें राज्य केलें. त्याच्या राज्याचा विस्तार मोठा होता. त्यांत मद्रास इलाख्यांतील बल्लारी, अनंतपूर हे जिल्हे, म्हैसूर संस्थानाचा बराच मोठा भाग, धारवाड, बेळगांव, विजापूर हे जिल्हे मोडत असून त्याचें राज्य इशान्येस वारंगळ जिल्ह्यास भिडलें होतें. महाराष्ट्राचा बराच भाग व कोंकण यांवर यादव व शिलाहार राज्य करीत असून ते तैलपाचे मांडलिक असले तरी पुष्कळच स्वातंत्र्य उपभोगीत होते. कुंतल म्हणजे कर्नाटक यावर तैलपाची सत्ता असली तरी त्यांत लहान मोठीं मांडलिक राज्यें अनेक होतीं. त्याचे विभाग वनवासी द्वादशसहस्र, हनगल पांचशें, लक्ष्मेश्वर तीनशें, बेलवोले तीनशें, कुंडि त्रिसहस्र, वेणुग्राम सत्तर (बेळगांव), तोरगल षट्सहस्र, केळवाडी तीनशें ( बदामीजवळ ), किसुकाड सत्तर, बागलकोट ( बागडगे ) सत्तर, तर्दवाडी सहस्र येणेंप्रमाणें असून ते बहुतेक सर्व मांडलिकांच्या ताब्यांत होते.

## सत्याश्रय दुसरा

तैलपास राष्ट्रकूट राजकन्या जाकब्बा हिजपासून सत्याश्रय व दशवर्मन् असे दोन पुत्र झाले होते. त्यांपैकीं वडिल पुत्र सत्याश्रय यास सन ९९८ त गादी मिळाली. त्यास बापाच्या हयातींतच युवराजपद लाभलें होतें. सत्तिग व सत्तिम असेंहि त्यास म्हणत. सत्याश्रयानें साहसभीम हें बिरुद धारण केलें. त्याच्या शौर्यावर खुष होऊन प्रसिद्ध कन्नड कवि रण्ण यानें साहसभीमविजय नांवाचें काव्य इ. स. ९८२ त रचिलें. सत्याश्रयानें उत्तर कोंकणाचा राजा अपराजित शिलाहार यावर स्वारी करून त्यास आपलें अंकितत्व कबूल करावयास लावलें. अपराजितानें त्यास वीस हत्तींची खंडणी दिली.

तैल व सत्याश्रय यांनीं मुंजाच्या नाशापासून जो फायदा करून घ्यावयास पाहिजे तो घेतला नाहीं. मुंजानंतर त्याचा धाकटा भाऊ सिंधुराज परमार राजा झाला. त्याच्या कारकिर्दींत मध्यप्रांतांतील मराठी जिल्हे व वऱ्हाड हा प्रदेश परमारांच्या अंमलाखालीं राहिला. कलचुरी हे चालुक्यांचे आप्त, पण त्यांचाहि परमारांनीं पराभव केला.

सत्याश्रयाच्या कारकिर्दींत चोल फार प्रबळ झाले. त्यांचा राजा उत्तम चोल मरून त्याच्याजागीं राजराज पहिला हा पराक्रमी राजा आला. त्यानें गादीवर बसतांच चेर व पाण्ड्य यांजवर शस्त्र धरून त्यांचा अनेक वेळां पराभव केला. चेर व पाण्ड्य यांच्यामागून गंगांनाहि त्यानें शरण आणिलें. त्यानंतर राजराजाचा डोळा सत्याश्रय चालुक्याकडे वळला. त्याला सत्याश्रय हा दुबळा वाटून तो त्याच्या मुलुखांत घुसला. त्यानें विजापूर जिल्ह्यांतील बागेवाडी तालुक्यांत धनवूर म्हणजे अर्वाचीन होनूर येथें नऊ लक्ष सैन्यानिशीं तळ दिला. त्यानें भोंवतालचा प्रदेश बेचिराख करून स्त्रिया, मुलें व ब्राह्मण यांची कत्तल उडविली असें नमूद आहे व ब्राह्मणांच्या मुलीहि पळवून नेऊन त्यांचीं लग्नें इतर जातींच्या पुरुषाशीं लावलीं

( His. Ins. of S. India, Page 57 ). चालुक्याच्या दाराशीं शत्रू अशा रीतीनें पोंचल्यावर सत्याश्रयाला राजधानींतून बाहेर पडणें प्राप्तच होतें. दोघांची लढाई झाली. पण तिच्यांत निश्चित पराभव कोणाचा झाला हें सांगवत नाहीं. कारण परस्परविरुद्ध पुरावा दोन्ही पक्षांना आहे.

सत्याश्रयानें आपली कन्या नोळंब राजा इरिवी नोळंब यास दिली होती. नोळंबांच्या राज्यास नोळंबवाडी असें नांव असून तें गंगवाडीस लागून होतें. त्यांत बल्लारी, अनंतपूर, बंगळूर, कोलार, अर्काट इत्यादि प्रदेश मोडत होता. नोळंब हे चालुक्यांचे मांडलिक होते.

## जयसिंह तिसरा

सत्याश्रय मरण पावला तेव्हां त्याला संतान नसल्यामुळें त्याचा धाकटा भाऊ दशवर्मा याचा पुत्र पांचवा विक्रमादित्य इ. स. १००८ त गादीवर बसला. त्यानें राज्यपद पांच वर्षें उपभोगिलें. त्याच्यामागून त्याचा धाकटा भाऊ जयसिंह यास इ. स. १०१५ त राज्याभिषेक झाला. त्यानें आपणास त्रिभुवनमल्ल व वल्लभ नरेंद्रदेव हीं बिरुदें लावलीं, तसेंच जगदेकमल्ल ही पदवी धारण केली. परमार राजा मुंज यास तैलपानें हालहाल करून मारलें होतें. आपल्या चुलत्याची ही दुरवस्था पोटांत डांचत असल्यामुळें परमार राजा भोज यानें चालुक्यांवर सूड घेण्याचें ठरविलें. पण तें कृत्य त्याच्या एकट्याच्या शक्तीबाहेरचें होतें. म्हणून त्यानें कलचुरी राजा गांगेय व चोल राजा राजेन्द्र पहिला यांजबरोबर जूट केली ( History of the Parmar Dynasty, by D. C. Ganguli ). पण जयसिंहानें इ. स. १०१९ त त्या त्रिकूटाचा पराभव करून भोजास रणांगणांतून पळावयास लावलें. हा धारेचा प्रसिद्ध राजा भोज. जयसिंहानें चेरराजाचाहि असाच पराभव केला. त्यानंतर दक्षिण कोकणावरील शिलाहारांना जिंकून त्यानें कोल्हापुरास आपली छावणी ठोकली.

जयसिंहाच्या कारकिर्दींत शक ९३३ मध्यें जुन्नीनगर ( जुन्नर ) येथें सिंद घराण्यांतील गोवन ( गोपन ) हा राज्य करीत होता ( Notes on Political & Cultural History of Konkan, by M.G. Dixit, Bulletin of the Deccan College Research Institute 1943 ). सिंदांचा शक १२१६ तील ( इ. स. १२९४ ) एक शिलालेख मंचर येथील विहिरींत आहे. यावरून सिंदांचें राज्य मुसलमानांची महाराष्ट्रावर स्वारी होईपर्यंत जिवंत असल्याचें दिसून येतें. त्यांचें राज्य तळेगांव दाभाडे या गांवापर्यंत म्हणजे इंद्रायणी नदीपर्यंत विस्तारलें होतें. उत्तर शिलाहारांच्या राज्यानें घाटावर चढून पुणें प्रांत व्यापला असून तें यादवांच्या राज्यास शक ९४८ त भिडलें होतें. सारांश शिलाहार, यादव व सिंद यांचीं राज्यें एकमेकांस भिडलीं होतीं.

या चालुक्य घराण्यांत स्त्रियांवरहि राज्यकारभाराचा भार टाकण्याची वहिवाट दृष्टीस पडते. जयसिंहाची बहीण अक्कादेवी अशा स्त्रियांपैकीं होय. ती हानगलच्या कदंब घराण्यांत दिली असून जयसिंहाच्या कारकिर्दींत किसुकाड ७०, तोरगरे ६, व मासवाडी १४६ यांवर राज्य करीत होती. तिला तिच्या गुणावरून गुणाड बेदांगी (Gunad Bedangi) म्हणजे मोठी सद्‌गुणी ( Marvel of virtuous qualities ) एकवाक्ये ( She whose speech is single and uniform ) अशा पदव्या होत्या. तिला तिच्या शौर्यावरून रणभैरवीहि म्हणत. तिची राजधानी विजापूर जिल्ह्यांतील हुनगुंद तालुक्यांत अरसीबिडी अथवा विक्रमपूर येथें होती. तिनें गोकाककडील बंड मोडण्याकरितां इ. स. १०४७ त गोकाकास वेढा घातला. ( Bombay Gazetteer, General chapters, Page 435 ). शक ९६२ त ( इ. स. १०४९ ) जयसिंहाची कारकीर्द संपून सोमेश्वर पहिला गादीवर आला.

## सोमेश्वर पहिला

सोमेश्वरानें गादीवर बसल्यानंतर आहवमल्ल व त्रैलोक्यमल्ल या पदव्या धारण केल्या. तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर कांचीचे चोल राजे चालुक्यांचे प्रतिस्पर्धी होतेच. सोमेश्वरास राज्यपद मिळाल्यावर त्यांच्याशीं सामना द्यावा लागला. चोल राजा राजाधिराज पहिला व त्याचा भाऊ राजेन्द्र यांनीं चालुक्य सत्ता धुळीस मिळविण्याचा व चालुक्यांचे मांडलिक गंग व नोळंब यांना वठणीवर आणण्याचा निश्चय केला होता. या निश्चयानें चोल फौजा आपल्या राज्याच्या पश्चिम व वायव्य दिशेस चालून गेल्या. सोमेश्वराच्या बाजूनें जयसिंह प्रभृति चालुक्य राजपुत्र लढावयास आले व चोलांच्या बाजूनें राजाधिराज व त्याचा भाऊ राजेन्द्र हे जातीनें उभे ठाकले. दोन्ही सैन्यें एकमेकांस इ. स. १०५२ त कृष्णा नदीवर कोपम येथें भिडलीं. राजेन्द्र अगदीं आघाडीला हत्तीवर बसला होता व त्याच्या मागें राजाधिराज होता. चालुक्यांच्या तिरंदाजांनीं राजेंद्राच्या हत्तीवर शरसंधान धरलें. त्याबरोबर त्याचा हत्ती पाठ फिरवून पळूं लागला. पण त्यास राजाधिराजानें थांबविलें. तरी पण राजेन्द्राचा हत्ती जखमी झाला व राजाधिराज युद्धांत ठार मारला गेला. त्यामुळें चोल सैन्य कच खाऊन पळत सुटलें. त्याचा पाठलाग चालुक्य फौजेनें करून चोलांची राजधानी कांची घेतली ( His. Ins. of S. India, Page 73 ).

' परमार भोज मरण पावला आणि कलचुरी व चौलुक्य यांनीं त्याची राजधानी धारा घेतली, तेव्हां भोजराजाचा उत्तराधिकारी जयसिंह परमार हा कलचुरी व चौलुक्य यांजपासून माळवा परत घेण्यास समर्थ नसल्यामुळें सोमेश्वरास शरण गेला. सोमेश्वरासहि चौलुक्य व कलचुरी हे आपल्या सीमेवरील राजे डोईजड होणें इष्ट नव्हतें. या कारणानें सोमेश्वरानें आपला पुत्र विक्रमादित्य यास जयसिंहाच्या मदतीस दिलें. विक्रमानें मोठें शौर्य गाजवून कलचुरी राजा कर्ण व चालुक्य राजा भीम यांना माळव्यांतून

हुसकावून लावलें व माळव्याच्या सिंहासनावर जयसिंहाची स्थापना केली. तेव्हांपासून जयसिंह हा चालुक्यांचा पक्का दोस्त बनला' (History of the Parmar Dyansty, by D. C. Ganguli ).

इ. स. १०६२ मध्यें वेंगीचा चालुक्य राजा राजराज मरण पावला. त्याचा पुत्र राजेन्द्र दुसरा लहान असलेला पाहून विक्रमादित्याच्या मनांत पूर्ववैरानुसार वेंगीचें राज्य जिंकून पूर्व चालुक्य व पश्चिम चालुक्य यांच्या सत्तेचें एकीकरण करण्याचें आलें. त्यानें आपल्या मदतीस परमार जयसिंह यास घेतलें व दोघांनीं मिळून वेंगी जिंकली. तेव्हा राजराजाचा धाकटा भाऊ विजयादित्य यानें साहजिकच राजेंद्राचा पक्ष घेतला व चोल राजा वीरराजेन्द्र यास मदतीस बोलावलें. उभय सैन्यांची गांठ बेजवाड्यापाशीं कृष्णा नदीवर पडली. या युद्धांत विक्रमादित्याचा मोड होऊन परमार जयसिंहाचा भाऊ कामास आला. चोलांनीं वेंगी घेतली व वीर राजेन्द्र चोलानें चालुक्य बालराजा राजेन्द्र दुसरा याच्या अज्ञानावस्थेंत वेंगीचा कारभार बालराजाचा चुलता विजयादित्य याजवर सोंपविला. वीरराजेन्द्र चोलानें राजेन्द्र चालुक्याचा पक्ष घेण्याचें मुख्य कारण असें कीं तो वीर राजेन्द्राच्या बहिणीचा पुत्र होता. कांची ही पल्लवाची राजधानी मूळची होती खरी. परंतु पल्लव राजा अपराजित याचा चोल राजा आदित्य पहिला यानें पराभव करून इ.स. ८८०च्या सुमारास पल्लवांचें राज्य घेतल्यापासून कांची ही चोलांच्या ताब्यांत गेली होती आणि राष्ट्रकूट व नंतर कल्याणचे चालुक्य यांचे चोल हेच शेजारी बनल्यामुळें त्यांच्याशीं त्यांचे युद्धप्रसंग घडूं लागले होते ( History of the Parmar Dynasty, by D. C. Ganguli ).

सोमेश्वराचें सामर्थ्य यावेळीं पुष्कळच वाढून तो उत्तरेस कनोजपर्यंत जाऊन पोंचला, व त्यानें तेथील राजास पळवून डोंगराचा आश्रय घ्यावयास लावलें.

सोमेश्वरास चार राण्या असून त्यांपैकीं एकीचें नांव बाचलदेवी. तिला सोमेश्वर दुसरा, विक्रमादित्य सहावा व जयसिंह तिसरा असे तिघे पुत्र होते.

दुसरी राणी चंद्रिकादेवी तिला पिरियरसी म्हणजे पट्टराणी म्हटलेलेंहि कोठें आढळतें. तिसरी राणी मैळालदेवी. हिलाहि पिरियरसी अशी पदवी दिलेली आहे. चौथी राणी केतलदेवी. यांपैकीं मैळालदेवी ही वनवासी द्वादशसहस्त्र याचा कारभार इ. स. १०५३–५४ त पाहात होती. केतलदेवी हिच्या नजरेखालीं विजापूर जिल्ह्यांतील पोनवाड अग्रहार म्हणजे होनवाड हा प्रदेश होता. सोमेश्वराचे मांडलिक अनेक असून त्यांतील महामंडळेश्वर होयसळ विनयादित्य हा इ. स. १०४८ च्या सुमारास कोंकण, भडदवयल, तळकाड, साविमले यांवर होता. गोव्याच्या कदंबांपैकीं जयकेशिन १ ला हा कोंकणच्या पिढीजाद भागावर म्हणजे गोव्यावर इ. स. १०५२च्या सुमारास राज्य करीत होता. कोल्हापूरचा शिलाहारराजा महामंडलेश्वर मारसिंह हा इ. स. १०५८ त किलिगल ( कागल ) दुर्गांत वास्तव्य करीत होता. राजपुत्रांपैकीं युवराज सोमेश्वर २ रा याजकडे बेळवोले तीनशें व पुरीगेरी तीनशें यांचा कारभार राजानें सोंपविला होता. विक्रमादित्य याजकडे इ. स. १०५५–५६ त गंगवाडी ९६००० व बनवासी १२००० असून त्याच्या हाताखालीं हानगलच्या कदंबांपैकीं हरिकेसरिन हा व गोव्याचा कदंब राजा जयकेशी १ला त्याचा वनवासीचा कारभार पाहात होता. जयसिंह तिसरा यास तर्दवाडी सहस्र ( विजापूरच्या उत्तरेस ) व विष्णुवर्धन विजयादित्य यांजकडे नोळंबवाडी ३२००० देण्यांत आली होती. चालुक्यांची पहिली राजधानी मालखेडच्या शेजारीं यादगिरी येथें होती. तिच्या ऐवजीं सोमेश्वरानें कल्याण ही नवी राजधानी केली. तेथून तुंगभद्रा नदी दक्षिणेस सुमारें दीडशें मैलांवर आहे. जुन्या चालुक्यांच्या बदामीपासून कल्याण दोनशें मैल भरेल. तुंगभद्रेपासून नर्मदेपर्यंतचा मुलुख यावेळीं चालुक्यांच्या ताब्यांत होता, असें मानल्यास जुने चालुक्य व राष्ट्रकूट यांच्या राजधान्यांच्या बेतांत कल्याण बसतें. हल्लीं कल्याणची भाषाही मराठी असल्यामुळें नवे चालुक्य जुन्या चालुक्यांप्रमाणें हल्लींच्या महाराष्ट्राच्या हद्दीवर न राहातां कांहींसे खास महाराष्ट्रांतच

राहावयास आले. मात्र शक ९७५ त म्हणजे आतांपासून सुमारें नऊशें वर्षांपूर्वी तेथील भाषा प्रामुख्यानें कानडी असावी.

विक्रमादित्याचे विशेष गुण लक्षांत घेऊन सोमेश्वरानें वडिल पुत्राऐवजीं विक्रमादित्यासच युवराज पदावर स्थापण्याचें योजलें. पण विक्रमादित्यानेंच वाडिलभावाची बूज राखण्याकरितां हा मान नाकारला, असें कवि बिल्हण म्हणतो तें अतिशयोक्तीचें वाटतें. तथापि राजास खरा उपयोग त्याचाच झाला व तोच बापाच्या ऐवजीं स्वतः मोहिमांवर जाऊं लागला. विक्रमादित्यानें चोलावर जाऊन चोलराजा वीर राजेंद्र याचा पराभव केला, व त्याला राज्यांतून घालवून दिलें. विक्रमादित्यानें केरळ, सिंहलद्वीप व वेंगी येथील राजांनाहि जिंकलें. विक्रमादित्याचें विजयी सैन्य दिग्विजय करीत हिंडत असतां त्याचा बाप सोमेश्वर ऊर्फ आहवमल्ल याला दोषी ताप आला. या दुखण्यांतून वांचण्याची आशा त्याला न राहिल्यामुळें तुंगभद्रेच्या तीरीं कुरुवट्टी येथें तो गेला. तुंगभद्रेंत स्नान करून त्यानें पुष्कळ सुवर्णदक्षिणा वांटली. नंतर तो पुन्हां पाण्यांत शिरला व गळयाइतक्या पाण्यात गेल्यावर वाद्यांच्या गजरात त्यानें जलसमाधि घेतली. हें वर्तमान ३० मार्च १०६८ रोजीं घडलें. आहवमल्लानें यज्ञयाग पुष्कळ केले होते, व पंडितांना उदार आश्रय दिला होता. सोमेश्वर उर्फ आहवमल्ल याच्या जलसमाधीस विशेष अर्थ आहे. क्षत्रियांनीं धारातीर्थी देह ठेवावा हेंच श्रेयस्कर. रणांगणावर वीरांच्या रक्ताच्या धारा उडतात तेंच खरें धारातीर्थ. त्यावर वीरांनीं आपला देह ठेवल्यानें त्यांना मुक्ति मिळते. त्याशिवाय दुसरें तीर्थ पवित्र नद्यांचें पात्र. सोमेश्वराचा मधला पुत्र एवढा कर्ता व पराक्रमी निघून लढाया मारीत होता. तशी शक्ति आतां सोमेश्वरांत न उरल्यामुळें अंथरुणावर खितपत पडून आपला काळ पाहण्याऐवजीं तुंगभद्रानदींत त्यानें आपला देह सोडला. क्षत्रियांचा हा धर्मच असून रविकुलांतील अजराजानें आयुष्याचा शेवट याच उपायानें केला. त्या प्रसंगाचें हृदयद्रावक वर्णन कालिदासाच्या रघुवंशांत

पाहावयास सांपडतें. आहवमल्लाच्या प्रस्तुत कृतींत धीरोदात्तपणा दिसतो. त्याच्या अनेक गुणांवर लुब्ध होऊन त्याजवर कवींनीं कथा, कविता व नाटकें रचिलीं आहेत.

आहवमल्लाच्या कारकिर्दीत नाशिक जिल्ह्याचा कांहीं भाग, माळवा व गुजराथ यांच्या हद्दीवरचा उत्तर भाग यशोवर्मा नामक राजाच्या ताब्यांत होता. यशोवर्मा हा माळव्याचा प्रसिद्ध राजा भोज परमार याचा मांडलिक होता. त्याच्या राजधानीचें गांव सेल्लूक ( Selluka ). त्या गांवाचा अर्धा भाग भोजराजापासून त्यास मिळाला. ज्या ताम्रपटांत हा मजकूर आहे तो इ. स. १०६१च्या सुमाराचा आहे ( एपिग्राफिया इंडिका, खंड १९ वा ). ताम्रपटांतील दान सुव्रतदेव नामक श्वेतांबर पंथीय जैन साधूस चैत्रमासीं सूर्यग्रहणाच्या पर्वणीस कलकलेश्वराच्या पवित्र तीर्थांत दिलें आहे. कलकलेश्वराचें देऊळ कळवणच्या पश्चिमेस १० मैलांवर आहे. दानांत मुख्य जमीन व त्याशिवाय तेलाचे घाणे ( तैल—घाणकाः ) चौदा वाण्याचीं दुकानें ( वाणिकहट्टाः ) व चौदा द्राप आहेत. दान जैन साधूच्या ( ऋषी ) योगक्षेमासाठीं आहे. भोज लढाईत मारला गेल्यावर धारानगरींत अंदाधुंदी माजली, तो काल या ताम्रपटाचा दिसतो.

## सोमेश्वर दुसरा

सोमेश्वर आहवमल्ल याच्या मृत्यूनंतर त्याचा वडील पुत्र सोमेश्वर दुसरा हा ता. ११ एप्रिल १०६८ रोजीं गादीवर बसला. त्यानें आपणास भुवनैकमल्ल ही अत्यंत गौरवपर पदवी धारण केली. तो बापाच्या हयातींतच धारवाड जिल्ह्याचा कारभार पाहात असून त्यास त्याच्या बापानें वेंगीपति अशी पदवीहि दिली होती. सोमेश्वराच्या राज्यारोहणसमयीं विक्रमादित्य मोहिमेवर होता. त्यास बापाच्या मृत्यूचें व भावाच्या राज्यारोहणाचें वर्तमान मोहिमेंतच समजलें. म्हणून तो मोहीम तशीच टाकून वेंगीहून परत कल्याणास आला. सोमेश्वरानें त्याचें हार्दिक स्वागत केलें व विक्रमादित्यानेंहि

मोहिमेंत मिळविलेली सारी संपत्ति भावास दिली. त्यानंतर कांहीं काळ दोघां भावांच्या गोडींत गेला. सोमेश्वरानें आपला तिसरा भाऊ जयसिंह यास नोळंबवाडीचा सामंत नेमून त्याच्या मदतीस चौथा भाऊ विजयादित्य यास दिलें. त्याच्या हाताखालीं तेथील मांडलिक राजा विक्रम नोळंब वागत असे. विजयादित्य तिकडील कारभार पाहात कंपली या गावीं राहात असे ( His. Ins. of S. India, Page 82 ). विक्रमादित्यहि सोमेश्वराचा नोकर या नात्यानेंच वागत होता.

विक्रमादित्यानें हा सेव्य-सेवक संबंध बराच काळ कायम ठेवला. परंतु त्याची मनःस्थिति नीट नव्हती. तो पराक्रमी असल्यामुळें त्याला सोमेश्वरास पदच्युत करून गादी मिळवावयाची इच्छा असणें स्वाभाविक होय. भावाभावांचें नीट नाहीं हें कांचीचा राजा वीर राजेन्द्र चोल यास माहीत असल्यामुळें त्यानें त्या फुटीचा फायदा घेण्याचें ठरविलें. सोमेश्वर गादीवर एप्रिल महिन्यांत आला. त्यानंतर थोड्याच दिवसांनीं राजेन्द्रानें विक्रमास भेटीस बोलावलें ( His. Ins. of S. India, Page 81 ). विक्रम सैन्यानिशीं धाकटा भाऊ जयसिंह यास घेऊन राजधानींतून बाहेर पडलेला सोमेश्वरास पाहवला नाहीं. म्हणून त्यानें विक्रमावर फौज पाठविली. पण विक्रमापुढें त्या फौजेचें कांहींच चाललें नाहीं. त्यानें आलेल्या फौजेचा धुव्वा उडविला. पुढें तुंगभद्रेवर कांहीं काळ राहून अखेर चोलाकडे जाण्याच्या बेतानें सोमेश्वरास थांग लागूं न देण्यासाठीं तो प्रथम पश्चिम किनाऱ्याच्या रोखानें निघाला. वाटेंत वनवासीच्या अरण्यांत मजा मारून मलयाचलाचें सौंदर्य पाहात व सुगंध घेत तो केरळांत शिरला. येथील जयशक्ति राजानें त्यास अमित संपत्ति देऊन तोषविलें. केरळांतून तो चोलाकडे वळला. चोल राजा वीर राजेन्द्र यानें त्याचें स्वागत करून त्यास आपली कन्या दिली आणि विक्रम हाच चालुक्यांचा राजा अशी ग्वाही फिरविली. हें वर्तमान कळतांच सोमेश्वरास साहजिकच राग येऊन तो राजेन्द्राचें पारिपत्य करण्यास

निघाला. त्याच्या बाजूनें गंग व नोलंब राजेहि मांडलिक या नात्यानें लढण्यास होते. पण त्यांचा पराभव करून राजेंद्रानें चालुक्यांच्या मुलुखांत शिरून कंपली हें नगर जाळलें व तेथें आपला विजयस्तंभ उभारला ( His. Ins. of Southern India, Page 81 ).

वरील लढाईत खुद्द विक्रम राजेन्द्राच्या बाजूनें लढला कीं नाहीं हें समजत नाहीं. तसा तो लढला असता तर तितक्यावर हें प्रकरण न मिटतां विक्रम व सोमेश्वर यांजमध्यें उघडपणें हाडवैर माजलें असतें. पण वरील वृत्त घडल्यानंतरहि विक्रम व सोमेश्वर यांचें बाह्यात्कारीं बरींच वर्षें बरें होतें तें लक्षांत घेतल्यास विक्रम यावेळीं दूरवर धोरण ठेवून वागला असावा असेंच म्हणावें लागतें. वीर राजेन्द्राच्या कन्येशीं विक्रमाचें लग्न होऊन एक वर्षहि लोटलें नाहीं तोंच वीर राजेन्द्र सन १०६९ त मरण पावला. त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र अधिराजेंद्र गादीवर बसण्यापूर्वीच राज्यांत दंगल माजून ती त्यास मोडतां येत नाहीं असें पाहून विक्रमादित्य त्याच्या सहाय्यार्थ धांवला. त्यानें कांचीस जाऊन तेथील बंड मोडलें व अधिराजेन्द्रास गंगई कोंडा चोलापुरम् येथें नेऊन राज्याभिषेक करविला. ही कामगिरी आटोपून विक्रम परत तुंगभद्रेवर आला. लागलीच वेंगीचा चालुक्य राजा राजेन्द्र दुसरा यानें ही संधि साधून चोल राज्यावर धाड घातली व अधिराजेन्द्राला ठार मारून चोलांचीहि गादी बळकावली. अशा रीतीनें वेंगीचें राज्य व चोलराज्य यांचें एकीकरण झालें आणि तें पुढें कांहीं वर्षें टिकलें. पूर्व चालुक्य राजेन्द्र दुसरा याची आई आमंगादेवी ही चोलराजा राजेन्द्र पहिला याची कन्या होती. म्हणजे चालुक्य राजेन्द्र दुसरा हा वीर राजेन्द्राच्या बहिणीचा पुत्र, अर्थात त्याचा भाचा होता. तात्पर्य राजेन्द्र दुसरा यानें आपल्या मामेभावाचा वध केला. राजेन्द्र दुसरा याजकडे वेंगीबरोबर चोल राज्यहि गेल्यामुळें तो मद्रास इलाख्याच्या बऱ्याच मोठ्या भागाचा धनी झाला असें समजण्यास हरकत नाहीं. अशा रीतीनें वेंगीचा राजेन्द्र हा कल्या-

णच्या पश्चिम चालुक्यांना प्रबळ प्रतिस्पर्धी निर्माण झाला यांत शंका नाहीं. याविळीं गंजम प्रांतावर कलिंग–गंग राज्य करीत होते. घाटाखालचा केरळ प्रांत व म्हैसूर येथील राजे पश्चिम चालुक्यांचें मांडलिकत्व पत्करून होते.

वेंगीच्या राजेन्द्रानें विक्रमावरहि मात केली खरी. आपला मेहुणा अधिराजेन्द्र याचा वेंगीच्या राजेन्द्रानें वध केल्यानंतर विक्रमानें त्याचें पारिपत्य करावयास पाहिजे होतें. पण विक्रम स्वस्थ राहिला यावरून त्याचा वेंगीच्या राजेन्द्रापुढें निरुपाय झाला असेंच म्हटलें पाहिजे. यामुळें विक्रमासहि वीर राजेन्द्राच्या वेळीं जो एक आधार मिळाला होता तो तुटून सोमेश्वरास पदच्युत करून कल्याणची गादी बळकावण्याचा त्याचा बेत असल्यास तो त्यास तूर्त रहित करावा लागला. पुढील कांहीं वर्षें विक्रम सोमेश्वराचें वर्चस्व पत्करून त्याच्या राज्यांत एक मोठा अधिकारी म्हणून वावरत होता असें दिसतें. सन १०७१ त विक्रमाचा मुक्काम बळ्ळारी जिल्ह्यांत गोविंदवाडीस होता. सन १०७२ त त्याचा धाकटा भाऊ जयसिंह नोलंबवाडीस सामंत होता. सन १०७४ त विक्रम व त्याचा तिसरा भाऊ विष्णुवर्धन–विजयादित्य हे धारवाड जिल्ह्यांत बंकापुरास असून विक्रमानें पोमवल्लीच्या रामेश्वर देवालयास बसलूर हा गांव इनाम दिला. त्यावरून चालुक्य राज्यांत विक्रमाचा दर्जा इतर भावाहून अधिक नसला तरी त्यांच्या बरोबरीचा होता इतकें स्पष्ट झालें ( His. Ins. of S. India ).

तथापि भावाभावाचीं मनें नीट नसल्यामुळें त्यांचा मत्सराग्नि केव्हां भडकेल याचा नेम नव्हता. वेंगीच्या राजेन्द्रानें आपल्या मेहुण्यास ठार मारून चोलांचें राज्य घेतलें याचें शल्य विक्रमाच्या हृदयांत घर करून होतें. सहा वर्षें वाट पाहिल्यावर तो कांचीवर चालून गेला. त्याच्या मदतीस त्याचा भाऊ सोमेश्वर हाहि होता. पण सोमेश्वरासहि विक्रमाचा कांटा निघावयास पाहिजेच होता. त्यामुळें सोमेश्वर व राजेन्द्र यांनीं विक्रमास पालथें घालण्याचा गुप्त कट केला. मोहिमेंत आघाडीला विक्रम व पिछाडीला

सोमेश्वर असून विक्रम व राजेन्द्र या दोघांच्या सैन्यांची गांठ पडतांच सोमेश्वर व राजेन्द्र या दोघांनीं दोन्ही अंगांनीं विक्रमास चिरडण्याचा घाट घातला. पण विक्रम उभयतांना पुरून उरला. त्यानें तात्काळ रंग ओळखून दोन्ही फौजांना एकदम तोंड दिलें, त्यांचा फडशा पाडला, सोमेश्वरास कैद केलें व त्यास गादीवरून काढून टाकून इ. स. १०७६ त कल्याणास आपणास राज्याभिषेक करून घेतला.

## विक्रमादित्य सहावा

विक्रमादित्यानें राज्याचा उपभोग तब्बल ५१ वर्षे घेतला. त्याला एकंदर सहा राण्या होत्या. पहिलीचें नांव सावळदेवी, ती मंगळवेढ्याचा मंडलेश्वर व दरीकाडू नाडाचा ( Darikadu nad ) महामंडलेश्वर जोगम रस याची कन्या होती. दुसरीचें नांव तारादेवी. ती इ. स. १०७७ त नारायणमंगळ या अग्रहाराची व्यवस्था पाहात होती. हा गांव राजानें तिला अंगभोगासाठीं म्हणजे खासगी खर्चाकरिता दिला होता. तिसरी राणी लक्ष्मादेवी हिला पिरियरसी ( पट्टराणी ) म्हटलें असून ती इ. स. १०९५ त कल्याणास राज्य करीत होती. हा कारभार बहुधा राजा स्वारी-वर असतां तिजकडे कौतुकानें सोपविण्यांत आला असावा. तिच्याकडे १८ अग्रहार व डंबल गांव यांचीहि ११०९—१० त व्यवस्था होती. इ. स. १११९ त तित्तसिंगी खेडें तिच्या देखरेखीखालीं होतें. चौथी राणी कदंब घराण्यांतील जक्कल देवी. तिच्याकडे इ. स. १०९३ त इणगुणिगे गांव होता. पांचवी राणी मलयमती इ. स. १०९४ त किरिय किरियुर अग्र-हाराम दिलेल्या परगण्याची व्यवस्था पाहात होती. सहावी चंदलदेवी ऊर्फ चंद्रलेखा ही कोल्हापूरकर शिलाहाराची राजकन्या असून तिला विक्रमादित्यानें स्वयंवर पद्धतीनें वरलें होतें असें कवि बिल्हण वर्णितो. तिला जयकर्ण नामक पुत्र होता. तिनें रडुवाडीच्या अग्रहारास इ. स. ११०४ त राजा-कडून दान देवविलें. सातवी माळलदेवी ही उच्च घराण्यांतील नसून एका मांत्र-कामगाराची ( Saua bhoga ) कन्या होती.

विक्रमादित्य व त्याचा धाकटा भाऊ जयसिंग यांचें सोमेश्वरास पदच्युत केल्यावरहि बरींच वर्षें सख्य असून सोमेश्वराच्या कारकिर्दींतल्या प्रमाणें त्याजकडे राज्यांतील जोखमीचीं कामेंहि सोपविण्यांत आलीं होतीं. म्हैसूरचा शिमोगा, चितळदुर्ग हा वायव्य भाग आणि गंगवाडी, अनंतपूर, बल्लारी व वनवासी या प्रदेशांवर वेळोवेळीं तो सामंत-पदावर होता. वेंगीचा चालुक्य राजा राजेन्द्र दुसरा या सुमारास पुष्कळच प्रबळ झाला होता. त्यानें चोलांचें राज्यहि घेतलें असून तो आपणांस आतां कुलोत्तुंग चोल पहिला असें म्हणवूं लागला होता. पांड्यांचा पराभव करून व त्यांची राजधानी मदुरा घेऊन मदुराई कोंडा ही पदवी त्यानें घेतली, कन्याकुमारीपर्यंत जाऊन तिकडील प्रदेश जिंकला, कुर्गमधील लोकांची कत्तल केली, विक्रमादित्य चालुक्य याचा भाऊ जयसिंह याजपासून गंगवाडी व वनवासी हेहि प्रांत मिळविले. सिंहलद्वीपच्या राजानें आपले दूत विक्रमादित्य व राजेन्द्र चोल या दोघांच्याहि दरबारीं पाठविले होते. राजेन्द्रानें आपल्या दरबारीं आलेल्या सिंहली दूतांचीं नाकें कापलीं (His. Ins. of Southern India, Page 89). यावेळीं सिंहलद्वीपाचा राजा विजयबाहू हा होता.

राजेन्द्र चोल इतका प्रबळ झाल्यावर त्यानें कल्याणच्या चालुक्यांशीं असलेलें आपल्या घराण्याचें पूर्वापार वैर लक्षांत घेऊन विक्रमादित्याच्या घरांत फूट पाडण्याचा विचार मनांत आणिला असावा. त्याच्या अंतस्थ मदतीनें जयसिंह विक्रमादित्याशीं लढण्यास उभा राहिला. त्यानें इतर राजांचीहि मदत घेऊन विक्रमाविरुद्ध फळी उभारली. शिवाय विक्रमादित्याच्या फौजेंतहि फूट आरंभली. विक्रमादित्यानें थोर मनानें त्यास या अविचारापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा कांहींहि उपयोग न होऊन जयसिंह आपल्या सैन्यानिशीं व दोस्तांनिशीं कृष्णातीरीं आला. त्यानें भोंवतालचीं खेडीं लुटलीं, जाळलीं, लोकांना कैद केलें, इतकेंच नव्हे तर विक्रमादित्याकडे उपमर्दकारक निरोपहि पाठविले. तेव्हां विक्रमादित्यास त्याचा समाचार घेणें भाग पडलें.

विक्रमादित्य कृष्णा नदीकडे यावयास निघाला तेव्हां त्याच्या फौजेवर छापे घालून तिला शत्रूनें हैराण केलें. नदीतीरीं आल्यावर पाहातो तों शत्रूची फौज त्याच्याहून मोठी होती. युद्धाला तोंड लागून शत्रूनें विक्रमादित्याच्या सैन्यावर हत्ती घातले व त्याच्या सैन्यांत गडबड उडवून दिली. त्याचे हत्ती, घोडे व माणसें मागें हटूं लागलीं. पण आपल्या पराक्रमाचा पूर्ण भरंवसा असल्यामुळें विक्रमादित्यानें न डगमगतां मस्त हत्तीवर बसून शत्रूवर हल्ला चढविला व कापाकापीला सुरुवात केली. जयसिंहाचे पुष्कळ हत्ती मेले व कित्येक सैनिक ठार झाले. त्याबरोबर सैन्याचा पराभव होताच जयसिंह व त्याचे दोस्त पळून गेले. त्यांचा पाठलाग न करतां समरभूमीवर हत्ती, घोडे, स्त्रिया व इतर सामान शत्रूनें सोडलेलें बरोबर घेऊन विक्रम आपल्या राजधानीकडे चालता झाला. जयसिंह पळून गेल्यावर अरण्यांत भटकत असतां पकडला गेला. समोर आणिलें असतां त्याला कसलेंहि शासन न करितां विक्रमानें क्षमा केली.

विक्रमाच्या कारकिर्दीत कुलोत्तुंग चोल जसा प्रबल झाला होता तसे म्हैसूर प्रांतांत होयसळ यादव आपलें सामर्थ्य वाढवीत होते. त्यांच्यापैकीं विनयादित्य हा आपणास चालुक्यांचा मांडलिक म्हणवीत असून त्याच्या ताब्यांत गंगवाडीचा कांहीं भाग व हसन जिल्हा होता. विनयादित्याचा पुत्र ऐरेयंगा इ. स. १०९३ त मध्य व उत्तर म्हैसुरावर राज्य करीत होता. ऐरेयंगाला बल्लाळ पहिला, विष्णुवर्धन व उदयादित्य असे तिघे पुत्र होते. त्यांपैकीं बल्लाळ व विष्णुवर्धन विशेष पराक्रमी निपजले. विष्णुवर्धन इ.स. १११५–१६ चे सुमारास इतका बळावला कीं त्यानें चोलांचा कांहीं प्रदेश घेतला व नोळंबवाडीच्या पांड्यांवरहि स्वारी केली. इ. स. १११७ त त्यानें द्वारसमुद्र ऊर्फ हळेबीड घेतलें व तो चोलांप्रमाणें चालुक्यांनाहि जुमानीनासा झाला. बल्लाळ, विष्णुवर्धन व उदयादित्य हे एका घराण्यांतील तिघे पुरुष एकजुटीनें वागत असल्यामुळें त्यांचें सामर्थ्य बरेंच मोठें होतें. त्यांनीं

आपल्या कटांत गोव्याचे कदंब व कोंकणचे शिलाहारहि घेतले. विक्रमादित्याच्या बाजूनें सिंद राजा अचुगी दुसरा हा होता. त्यानें द्वारसमुद्रास वेढा घातला. पण ऐरेयंगाचे तिघे पुत्र — बल्लाळ पहिला, विष्णुवर्धन व उदयादित्य — यांजपुढें त्याचें कांहीं न चालून त्यास वेढा उठवावा लागला. ही माघार विक्रमास साहजिकच कमीपणाची वाटून त्यानें अधिक तयारीनें आपल्या सैन्याची शत्रूवर पुनः रवानगी केली. त्यावेळीं नोलंबवाडी व बनवासी प्रांतांतून घुसून विष्णुवर्धन कृष्णानदीवर आला. तेथें अचुगीनें होयसळ सेनापति गंगराज याजवर रात्रींचा कानेंगाल ( Kannegala ) येथें छापा घालून त्याचा बेलूरपर्यंत पाठलाग केला. नंतर पश्चिमेस वळून त्यानें कदंब व शिलाहार सैन्यास मागें हटवून गोवें जिंकलें (His. Ins. of S. India, Page 95 व विक्रमांकदेवचरित).

विक्रमादित्याची कारकीर्द फार मोठी झाली. त्याला गादीवर बसूनच आतां इ. स. १११७ च्या सुमारास ४२ वर्षें लोटलीं होतीं. त्यानें गादी मिळविली तेव्हांच तो वयानें ३० वर्षांच्या बेतांत असावा. त्या हिशेबानें त्याची हयात आतां सत्तराहून अधिक सहज असली पाहिजे. इतक्या दीर्घकाळांत त्यानें आपल्या हाताखालीं अनेक कर्ते माणसें व घराणीं राजकारणास लावलीं असतील. हळेबीडचें होयसळ घराणें त्यांपैकींच होय. तसेंच एक काकतीय घराणें कल्याणच्या पूर्वांगास त्याच्या कारकिर्दींत उदयास आलें. त्या घराण्यांतील त्रिभुवनमल्ल बेटा ( Beta ) यास विक्रमानें अनमकोंडा तथा वारंगळ येथील राज्य दिलें होतें. तें वेंगीच्या तोंडावर असल्यामुळें वेंगीच्या राजेंद्रास म्हणजे कुलोत्तुंग चोलास धाकांत ठेवण्यास त्याचा विक्रमादित्यास बराच उपयोग होत असला पाहिजे. बेटामागून त्याचा पुत्र प्रोल दुसरा हा इ. स. १११७ च्या पूर्वी कांहीं दिवस वारंगळ येथें राज्य करूं लागला होता. आंध्र प्रांताचा पूर्वभाग वेंगीखालीं व पश्चिमभाग वारंगळाखालीं जाऊन आन्ध्र प्रांत दोन ठिकाणीं विभागला गेला

होता. अशा स्थितींत वारंगळचें राज्य लहान असल्यामुळें प्रोल तें विक्रमाच्या वृद्धावस्थेचा फायदा घेऊन वाढविण्याच्या खटपटींत होता. कुलोत्तुंग कांचीचा राजा झाल्यापासून वेंगीस न राहातां कांचीस राहूं लागला होता व त्याचा पुत्र विक्रम चोल वेंगीचा कारभार पाहात होता. कुलोत्तुंग ५० वर्षें राज्योपभोग घेऊन इ. स. १११९ च्या सुमारास मरण पावला. तेव्हां विक्रम चोल वेंगीहून कांचीस येऊन बापाच्या सिंहासनावर आरूढ झाला. त्याच्या पश्चात् वेंगीचा कारभार ढिला पडतांच विक्रमादित्य चालुक्याचें फावून त्यानें वेंगी चौदाशेंचा ताबा घेतला. या धालमेलींत प्रोल काकतीयानें आपला हात साहजिकच मारावा यांत नवल नाहीं. विक्रमादित्याची सत्तरी आतां उलटली असली तरी त्याची तरतरी व तडफ म्हणण्यासारखी कमी झाली नव्हती, हें, वेंगीचें राज्य त्यानें घेतलें यावरून सिद्ध होतच आहे. वारंगळचा प्रोल राजा व म्हैसूरचा होयसळ विष्णुवर्धन राजा हे महत्त्वाकांक्षी व स्वातंत्र्यप्रिय असल्यामुळें विक्रमाचें वर्चस्व झुगारूं इच्छित असल्यास नवल नाहीं. पण विक्रमानें त्यांचें कांहींहि चालूं न देतां आपली त्यांजवरील पक्कड कायम ठेवली. इतकेंच नव्हे तर या वयांतहि आपल्या अधिकाऱ्यांवर सर्वस्वी अवलंबून न राहातां तो राज्याची व्यवस्था पाहात वारंवार हिंडतहि असे. कारण मरणापूर्वी अवघीं तीनच वर्षें म्हणजे इ. स. ११२३ त त्याचा मुक्काम वनवासीस असल्याचें दिसून येतें ( His. Ins. of S. India, Page 98. )

विक्रमानें प्रजाहितार्थ अनेक कामें केलीं व देवालयांना देणग्याहि दिल्या. विजापूर जिल्ह्यांत असिबिर्डी ऊर्फ विक्रमपूर नगर सुधारून त्याशेजारीं एक विष्णुमंदिरहि बांधलें व त्यासमोर तळें खोदलें. त्याची प्रजा सुखी व भरभराटींत होती. तथापि अनंतपूर, म्हैसूर या भागांत दरोडे पडणें, गुरें चोरून नेणें इत्यादि अत्याचार घडत असतच. तरी पण देशांत एकंदरीनें निर्भयता नांदत असल्याचें बिल्हणानें वर्णन केलें आहे. त्यांत कांहीं लाघव

असलें तरी तें वाचनीय आहे. तो म्हणतो, ' प्रजानन रात्रीं निजतांना आपल्या दारांना कड्या घालीत नाहींत आणि त्यांच्या घरांत चोर न शिरतां खिडक्यांतून फक्त रविकिरण शिरतात. ' विक्रम मोठा उदार व गुणिजनांचें आश्रयस्थान होता. काश्मीरचा पंडित बिल्हण सर्व देशभर आश्रय पाहात हिंडला. त्याला विक्रमादित्यानेंच आपल्या सभेंत ठेवून विद्यापति या पदवीनें भूषित केलें. धर्मशास्त्रांत मिताक्षरा ही याज्ञवल्क्य-स्मृतीवरील टीका महाराष्ट्रांत व हिंदुस्थानाच्या बऱ्याच मोठ्या भागांत प्रमाण मानली जाते. तिचा कर्ता विज्ञानेश्वर विक्रमाच्या कल्याणांतच राहात होता. सदर ग्रंथाच्या शेवटीं विज्ञानेश्वरानें पुढील उद्गार काढले आहेत, ते विक्रमाच्या कीर्तींत भर घालणारे आहेत.

" पृथ्वीच्या पाठीवर कल्याणासारखें दुसरें शहर पूर्वीं नव्हतें, हल्लीं नाहीं व पुढेंही होणार नाहीं. विक्रमादित्यासारखा ऐश्वर्यसंपन्न राजा कधीं पाहिला नव्हता कीं ऐकिला नव्हता." या व इतर अनेक प्रमाणांवरून दुसऱ्या चालुक्य घराण्यांत हा सहावा विक्रमादित्य अतिशय वैभवशाली होऊन गेला याविषयीं शंका राहात नाहीं. त्याच्या कारकिर्दींत चालुक्यसत्ता कळसास पोंचली. त्याचें अधिराज्य पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत व तुंगभद्रेपासून नर्मदेपर्यंत पसरलें होतें. त्याची कारकीर्द ५१ वर्षें झाली, आयुष्य दीर्घकाल लाभलें व संततीकडूनही न्यून नव्हतें.

विक्रमाच्या राज्याची व्यवस्था पुढीलप्रमाणें होती. त्याच्या साम्राज्याच्या वायव्येस महाराष्ट्रावर यादवांचें राज्य होतें. महामंडलेश्वराधिपति व महासामंताधिपति अनंतदेव शिलाहार हा इ. स. १०९५ त उत्तर कोंकणांत राज्य करीत होता. इ. स. ११२५ त गोव्याचा कदंब राजा महामंडलेश्वर जयकेशिन् दुसरा असून त्याच्या सत्तेखालीं कोंकण नऊशें, पळसिगे द्वादशसहस्र, पयवे किंवा हयवे पांचशें आणि कवडीद्वीप सव्वा लाख इतका विस्तीर्ण

प्रदेश होता. यांपैकीं पयवे किंवा हयवे म्हणजे सध्यांचा कानडा व कारवार जिल्हा, पळसिगे म्हणजे बेळगांव–खानापुराभोंवतालचा प्रदेश, कोंकण नऊशें म्हणजे दक्षिण कोंकण व कवडीद्वीप म्हणजे उत्तर कोंकण होय. यावरून या वेळीं गोव्यांतील कदंबांचा अंमल नसला तरी वर्चस्व पश्चिम किनाऱ्यास मलबारपासून वसईपर्यंत होतें असें समजण्यास हरकत नाहीं. कोल्हापुरांत महामंडलेश्वर गण्डरादित्य शिलाहार इ. स. ११०९ त राज्योपभोग घेत होता. या घराण्याच्या ताब्यांत सध्यांचें कोल्हापूर संस्थान व सातारा जिल्हा होता. चालुक्यांची एक शाखा पुणें व सातारा ह्या जिल्ह्याच्या सीमेवर निरा नदीच्या तीरीं सध्यांच्या भोर संस्थानांतील शिरवळ गांवीं राज्य करीत असून ती विक्रमाची मांडलिक होती. त्यापूर्वी तीन पिढ्या हें राज्य तेथें चालत आलें होतें. विक्रमकाळीं शिरवळांत खांभा ( स्तंभ ) नामक राजा असून त्याचे पांच मंत्री होते. मुख्य मंत्र्याचें नांव कुमार जयसिंह, चाचू हा सामंत म्हणजे वमूलमंत्री, कोंटली ठाकूर हा अमात्य व सोमनाथीय हा राणीचा कारभारी होता. खांभा राजानें शक १००१ मध्यें दिलेला ताम्रपट सांपडला आहे ( Epigraphia Indica XXII ). त्यांत शिरवळास श्रीवलय म्हटलें आहे. दान दिलेला गांव विंग पूर्वी शक ७०२ त म्हणजे तीनशें वर्षांपूर्वी धारावर्ष ध्रुवराज राष्ट्रकूट यानें कऱ्हाडचा ब्राह्मण वासुदेव भट्ट यास दिला होता. खांभानें आतां तो अनेक ब्राम्हणांना दिला. विंगाला ताम्रपटांत महास्थान–पवित्रतीर्थ म्हटलें आहे. शिरवळच्या चालुक्यांचें हें संस्थान जुनें व महत्त्वाचें असून त्याचा अंमल बहुधा पुणें जिल्ह्याच्या बऱ्याच भागावर पसरलेला असावा.

महासामंत धाडियादेव हा शक १००८ ( इ. स. १०८७ ) त नागपूर ( सिताबर्डी ) व भोंवतालचा प्रदेश यांचा कारभार करीत होता ( Epigraphia Indica III ). तो आपणास महाराष्ट्रकूट वंशांत जन्मलेला म्हणवितो. तो मूळ लट्टलर ऊर्फ लातूर येथील असून तेथून

त्याची नेमणूक नागपूर म्हणजे सिताबर्डी प्रांतावर झाली होती. धाडियादेव याचें मूळ आडनांव राष्ट्रकूट, पण गौरवार्थ तो आपणास महाराष्ट्रकूट म्हणवीत असावा. या हकीकतीवरून विक्रमाचें साम्राज्य महाराष्ट्रावर असतां राजकीय दृष्ट्या महाराष्ट्राची वांटणी कशी झाली होती याची कल्पना येते.

महाराष्ट्र व कोकण यांप्रमाणें विक्रमाच्या साम्राज्यांतील इतर प्रदेशांत ठिकठिकाणीं कित्येक संस्थानिक वंशपरंपरेनें राज्य करीत होते. त्यांना महामंडलेश्वर, मंडलेश्वर व सामंत यांसारखी पदवी असे. यावेळीं कदंबांच्या वांटण्या होऊन कर्नाटकांत त्यांचीं राज्यें सर्वत्र विखुरलीं होतीं. विशेषतः म्हैसूर, धारवाड व कानडा हा प्रदेश त्यांच्या ताब्यांत होता. त्याप्रमाणें हनगलचे कदंब व गंग पेरमाडी यांचें आधिपत्य वनवासीवर, महामंडलेश्वर विष्णुवर्धन होयसळ याचें गंगवाडीवर व महामंडलेश्वर त्रिभुवनमल पाण्ड्यदेव याचें नोलंबवाडीवर होतें. त्यास कोकणराष्ट्राधिपति व गोकर्णपुरवराधीश्वर यांसारख्या पदव्या होत्या. महामंडलेश्वर रट्ट याचें बेळगांव जिल्ह्यांत सौंदत्तीवर व महामंडलेश्वर मुंज सिंद याचें विजापूर जिल्ह्यांत तिडगुंडीवर आधिपत्य होतें. याशिवाय राजपुत्र वा राजबंधू यांजकडेहि कांहीं प्रांतांवरचा कारभार सोंपविण्यांत आला होता. अर्थात् तो अल्पकालीन असून ते बहुधा तत्प्रांतीय संस्थानिकांवर सम्राटातर्फे हुकमत गाजवीत. त्या पद्धतीस अनुसरून विजापूरच्या उत्तरेकडील तर्दवाडी प्रांतावर इ. स. १०६४–६५ त राजबंधु विजयसिंह याची नेमणूक करण्यांत आली होती. इ. स. १०७७ ते १०८२ पर्यंत तो युवराज या नात्यानें वनवासीस राहून वनवासी द्वादशसहस्र, शांतलिगे सहस्र, बेळवोले त्रिशत, पुलेगेरे त्रिशत व वासवल्ली सहस्र यांची व्यवस्था पाहात होता. त्याचवेळीं त्यानें विक्रमाविरुद्ध बंड केलें. विक्रमादित्यास राजपद मिळण्यापूर्वी त्याचा भाऊ विष्णुवर्धन विजयादित्य हा इ. स. १०६४ व १०६६ त नोलंबवाडी ३२००० वर नेमला असल्याचें दिसून येतें. विक्रमास चंदलदेवीपासून झालेला पुत्र जयकर्ण याजकडेहि

त्यानें कांहीं राज्यकारभार सोंपविला होता. त्यास इ. स. ११२१ त महामंडलेश्वर ही पदवी असून त्याच्या हाताखालीं दंडाधिप चामुंड व सौंदत्तीच्या रट्ट घराण्यापैकीं मंडलेश्वर सेन दुसरा हे कुंडी देशाचा कारभार पाहात होते.

## सोमेश्वर तिसरा

विक्रमादित्याच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र सोमेश्वर तिसरा ऊर्फ आहवमल्ल सन ११२६ त ऑक्टोबर महिन्याच्या सुमारास गादीवर आला. स्वतः विक्रमादित्यच मरणसमयीं ८० वर्षांहून अधिक वयाचा असल्यामुळें, गादीवर बसला तेव्हां सोमेश्वर साधारणपणें उतारवयास पोंचलेला असला पाहिजे. बापाच्या कारकिर्दींत सोमेश्वरानें कोठें कर्तबगारी गाजविल्याचा उल्लेख नाहीं. बहुधा तो शांतताप्रिय व विद्वानांच्या सहवासांत राहण्याची आवड असणारा दिसतो. त्याची कारकीर्द अवघी बारा वर्षांचीच झाली. त्या काळांत त्याला जबरदस्त शत्रू असा कोणीच भेटला नाहीं. विक्रमादित्याशीं स्पर्धा करणारा राजेन्द्र ऊर्फ कुलोत्तुंग चोल हा मरून या वेळीं ९ वर्षें झालीं असल्यामुळें त्याची भीति सोमेश्वरास उरली नव्हती. त्याच्या गादीवर बसलेला विक्रम चोल यानें सोमेश्वराच्या राज्यास मुळींच उपसर्ग पोंचविला नाहीं म्हणून सोमेश्वरही त्याच्या वाटेस गेला नाहीं. वनवासीचा मयूरवर्मा, वारंगळचा काकतीय प्रोल दुसरा, व म्हैसूरचा होयसळ विष्णुवर्धन इत्यादि मांडलिकांनीं आपलें चालुक्यांशीं पूर्वापार चालत आलेलें नातें कायम ठेवलें होतें. तथापि काकतीय व होयसळ प्रबळ होत चालले असून स्वतंत्र होण्याची वाट पाहात होते. सारांश, बापाच्या वेळेचा राज्यविस्तार व लौकिक सोमेश्वराच्या वेळीं कायम राहिला असें समजण्यास हरकत नाहीं. पण त्याच्या कारकिर्दींत राज्याची अभिवृद्धि खुंटली यांत शंका नाहीं. इ. स. ११३३ त विक्रम चोल मरण पावला. त्याबरोबर चोलसत्तेस व त्यामागून अल्पावधींत चालुक्यसत्तेस उतरती कळा लागून सर्वत्र मांडलिक राजांचें प्राबल्य वाढत चाललें.

सोमेश्वराच्या नांवावर अभिलाषितार्थचिंतामणि ऊर्फ मानसोल्लास हा ग्रंथ मोडतो. तो अनेक ग्रंथांच्या आधारें लिहिलेला स्पष्ट दिसतो. त्याचीं एकंदर पांच प्रकरणें असून पहिल्या प्रकरणांत राज्यप्राप्तीचे उपाय, दुसऱ्यांत राज्यरक्षणाचीं साधनें, तिसऱ्यांत राज्योपभोग, चौथ्यांत मनोविनोद व पांचव्यांत क्रीडा सांगितलेल्या आहेत. सोमेश्वरास सर्वज्ञानभूप अशीही पदवी होती, त्यावरून तो स्वतः विद्वान् असावा असें म्हणतां येतें. तथापि त्याच्या नांवावर मोडणारा ग्रंथ त्याच्या आश्रयाखालीं एखाद्या विद्वन्मंडळानें रचिला असला पाहिजे असें मानण्याकडेच स्वाभाविक प्रवृत्ति होते. यावेळीं कर्नाटकांत दिगंबर जैन पंथ जोरांत असून त्यापैकीं गुरु मल्लीशेन यानें धवलेश्वर तीर्थावर प्रायोपवेशन केलें. सन ११३८ त सोमेश्वर मरण पावला.

सोमेश्वराच्या काळांत कलचुरी घराण्याचा चालुक्यांच्या राज्यव्यवस्थेंत प्रवेश होऊन त्यास वजनदारी प्राप्त झाली होती. त्यांतील महामंडलेश्वर पेरमाडी याची नेमणूक इ. स. ११२८ त तर्दवाडीवर झाली होती. गोव्याच्या कदंबांपैकीं महामंडलेश्वर जयकेशिन् दुसरा हा कोंकण नवशत व पळसिगे द्वादशसहस्र यांजवर राज्य करीत होता. कोल्हापुरांत गण्डरादित्य शिलाहाराची कारकीर्द चालू होती. नाशिक, खानदेश, देवगिरी या बाजूला महासामंत सेऊण यादवाचें राज्य होतें आणि महामंडलेश्वर विष्णुवर्धन होयसळ याच्या ताब्यांत इ. स. ११३७ त गंगवाडी, नोळंबवाडी व वनवासी होती.

## जगदेकमल्ल दुसरा

सोमेश्वराच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र जगदेकमल्ल कल्याणास सन ११३८ त राज्यावर बसला. त्याची कारकीर्द बापाइतकीच झाली. सोमेश्वरानें स्वारी अशी कोठेंच केली नव्हती. तितकी निष्क्रिय कारकीर्द मात्र जगदेकमल्लाच्या वांट्यास आली नाहीं. यावेळीं परमार घराण्यांतील जयवर्मा माळव्याच्या गादीवर होता. त्यावर जगदेकमल्लानें सन ११४५ त स्वारी केली.

या कामीं त्यास त्याचा मांडलिक होयसळ नरसिंह पहिला याचें सहाय्य झालें. चालुक्यांचें सामर्थ्य अद्यापिहि बरेंच टिकून असल्यामुळें जगदेकमल्लानें या मोहिमेंत जयवर्म्यास पराभूत केलें. यानंतर पाव शतकाच्या आंत माळव्यांतील परमार सत्ता नष्ट झाली ( His. of Paramar Dynasty by Ganguli ). जगदेकमल्लास दक्षिणेकडून परचक्राचें भय नव्हतें. कांचीच्या चोल राजांपैकीं विक्रम चोल मरून राजराज दुसरा त्याच्या जागीं आला. राजराज हा कुलोत्तुंगाइतकाहि कर्तबगार नसून चोल घराण्यांतील तो शेवटचा नांव घेण्याजोगा राजा. आणि जगदेकमल्ल हाहि चालुक्य घराण्यांतील शेवटचाच उल्लेखनीय राजा. सारांश परस्परांस लागून असलेल्या या दोन्ही मोठ्या राजघराण्यांचा अंतकाल जवळजवळ एकदमच ओढवत आला होता. ज्याच्या पराक्रमाच्या जोरावर हळेबीडचें होयसळ घराणें बलाढ्य झालें तो होयसळ विष्णुवर्धन सन ११४२ च्या सुमारास बंकापुरास मृत्यु पावल्यावर तें घराणें डोईजड होण्याची भीति कमी झाली. इतकेंच नव्हे, तर माळव्यावरील मोहिमेंत होयसळ नरसिंह हा जगदेकमल्लाचा मांडलिक म्हणून लढावयास आल्यानें चालुक्यांचें त्यांजवरील वर्चस्व अधिक शाबीत झालें. बाकीच्या काकतीय, सिंद वगैरे मांडलिकांनीं आपलें इमान कायम ठेवलें असून, हनगलचा कदंब राजा केशीराज हा तर जगदेकमल्लाचा महाप्रधान, संधिविग्रहिन्, सेनाधिपति व दंडनायक होता. जगदेकमल्लानें बदामीच्या तळ्याजवळील योगेश्वर देवास इ. स. ११३९ सालीं वार्षिक नेमणूक करून दिल्याचा शिलालेख तेथें आहे. जगदेकमल्लामागून त्याचा धाकटा भाऊ तैलप तिसरा इ. स. ११५१ त चालुक्यांचा सम्राट् झाला.

महाराष्ट्रापुरतें पाहावयाचें झाल्यास महामंडलेश्वर विजयादित्य शिलाहाराचें राज्य कोल्हापुरांत होतें ( इ. स. ११४३ ). थोड्याच अवधीनंतर चालुक्यांचा घात करणारा विज्जल तथा विज्जण कलचुरी हा मोठ्या अधिकार-

पदावर असून त्याच्या हाताखालीं विजय पाण्ड्यदेव नोळंबवाडी ३२००० वर अंमल चालवीत होता.

## तैलप तिसरा

तैलपाच्या कारकिर्दीत त्याचे मांडलिक डोईजड व्हावयास लागले. काकतीय घराणें प्रबल झालें असतांहि आतांपर्यंत चालुक्य सत्तेला मानीत होतें. पण तैलप गादीवर आल्यापासून पांच वर्षांचे आंत काकतीय राजा प्रोल दुसरा यानें त्याजबरोबर उघडपणें वैर आरंभलें. तेव्हां तैलपास त्यास नरम आणण्याकरितां त्याजबरोबर लढणें भागच पडलें. त्या लढाईसंबंधीं अनमकोंडा (वारंगळ) येथील शिलालेखांत पुढीलप्रमाणें वर्णन आढळतें. "प्रोलानें तैलपास एका क्षणांत कैद केलें. वैभवशाली व चालुक्यालंकार असा तैलप हस्तिविद्येंत निपुण असून हत्तीवर आरूढ होऊन लढत होता. त्यास कैद केल्यावर प्रोलानें स्वामिनिष्ठेखातर त्यास सोडून दिलें." या पराभवानें चालुक्यांच्या इभ्रतीस जोराचा धक्का बसला. खुद्द तैलपाच्या पक्षांत जी जूट असावयास पाहिजे तीहि नव्हती. त्याचा सेनाधिपति विज्जल याचें प्रस्थ राज्यांत बरेंच माजलें असून तो आपल्या सामर्थ्याचा उपयोग चालुक्यांचें राज्य गिळंकृत करण्याकडे करीत होता. त्याच्या सामर्थ्याची कल्पना पुढील हकीकत वाचून येईल. विज्जलाच्या हुकुमानें काशपय्य नायक इ. स. ११५० त वनवासी द्वादशसहस्राचा कारभार पाहात होता. विज्जलाचा हस्तक असा महाप्रधान, सेनाधिपति, व दंडनायक भैळरय्या याजकडे तर्दवाडी सहस्रावरील अधिकार होता. महाप्रधान रवळय्य नायक याजकडे विज्जलानें कुक्कनूर (निजामराज्य)ची हुकमत इ.स. ११५६ त दिली होती. सारांश विज्जलानें चालुक्य राज्यांत आपला सवता सुभाच स्थापन केला होता.

उलटपक्षीं तैलप पक्षाचे सामर्थ्याचा अंदाज पाहूं. महासामंताधिपति, सेनाधिपति व दंडनायक महादेव हा वनवासी द्वादशसहस्र व पुरिगेरी तीनशें यांचा कारभार तैलपाच्या हाताखालीं (इ. स. ११५२) पाहात होता.

सिंदराजा महामंडलेश्वर चामुंड दुसरा हा किसुकाड ७०, प्रागडगे ७० व केळवाडी ३०० वर तैलपातर्फे होता.

होयसळ घराण्यांतील नरसिंह पहिला व नोळंबवाडीचा राजा विजय-पाण्ड्य आपणांस तैलपाचे मांडलिक म्हणवीत होते. इतक्यापुरतें पाहिल्यास दोन पक्षांत अधिक प्रबल कोण हें एकदम सांगतां येणार नसलें तरी तैल-पाचें सैन्यच विज्जलाच्या ताब्यांत असल्यामुळें विज्जलानें उघडपणें बंड पुकारल्यावर तैलपाचा त्याजपुढें निभाव लागणें शक्य नव्हतें.

तैलपास पदच्युत करण्याचा पुढें जो कट विज्जलानें केला त्यांत कोल्हा-पूरचा शिलाहार राजा विजयादित्य याजबरोबर प्रोलहि सामील झाला. त्या त्रिवर्गांनीं मिळून तैलपाची उचलबांगडी करून त्यास कैदेंत ठेवलें व विज्ज-लानें सत्ता बळकावली तरीहि चालुक्य साम्राज्यांतील जनतेला व इतर सरदारांना व राजेरजवाड्यांना विज्जलाची ही दांडगाई न आवडल्यामुळें व बरोबरच्या सरदारांस त्याजविषयीं वाटणाऱ्या मत्सरामुळें त्याची सत्ता सर्वत्र स्थापन होण्यास बरींच वर्षें लागलीं. कारण विज्जलानें आपल्या हातीं सत्ता घेतल्यावरहि प्रसिद्ध होयसळ घराण्यांतील नरसिंह पहिला व नोळंबवाडीचा राजा विजय पांड्य हे तैलप यास राजनिष्ठ राहिले होते. विज्जलास लोकमत प्रतिकूल असल्याचें दिसून आल्यावर लोकांना राजी राखण्याकरितां कांहीं योजना आंखावीच लागली. तैलपास भूलोकमल्ल व जगदेकमल्ल असे पुत्र होते. त्यांस अटकेंत न ठेवतां विज्जलानें त्यांजवर राज्यांतील जबाबदारीचे अधिकार सोंपविण्याचें धोरण स्वीकारून भूलोकमल्लाकडे वनवासी व सात-लिगे हे जिल्हे आणि जगदेकमल्लाकडे कागली, बल्लकुंडे व कदंबलिगे यांचा कारभार सोंपविला. अशा रीतीनें विज्जल आपलें बस्तान बसवीत होता तरी होयसळ राजा त्याला शेवटपर्यंत वश झाला नाहीं व विज्जलानेंहि त्यास दुखविलें नाहीं. राज्यांतील ही बेदिली विज्जलाच्या हयातीअखेर टिकली असें समजण्यास हरकत नाहीं.

## उपसंहार

पहिलें चालुक्य, राष्ट्रकूट, व दुसरें चालुक्य या तीन घराण्यांचें कालानुक्रमांत जें स्थान आहे तेंच आयुर्मानांतहि आहे. पहिल्या चालुक्यांचें राज्य अडीचशें वर्षे टिकलें. राष्ट्रकूटांना राज्योपभोग सरासरी सव्वादोनशें वर्षे मिळाला आणि दुसऱ्या म्हणजे कल्याणवासी चालुक्यांच्या वांट्याला दोनशें वर्षेंहि आलीं नाहींत. त्यांचा आयुर्दाय अवघा १७० वर्षांचा होता. या घराण्यांत सम्राटपद उपभोगणारे राजे दहा झाले. त्यांत तैलप दुसरा, जयसिंह तिसरा व विक्रमादित्य सहावा यांस दीर्घायुष्य लाभलें. हे तिघेहि राजे कर्तबगार व पराक्रमी होते. या तिघांबाहेरचा सोमेश्वर पहिला यानें अल्पकालांत प्रकटविलेलें कर्तृत्व त्यास भूषणावह होय. विक्रमादित्यानें एकट्यानेंच चालुक्य राजवटींतील १७० वर्षांपैकीं ५१ वर्षांचा काळ सम्राट् या नात्यानें व्यापला. त्यापूर्वी बापाच्या व वडिल भावाच्या कारकिर्दींत त्याचा राज्यकारभारांत पुष्कळ हात होता. तो जमेस धरल्यास इ. स. १०६० ते ११२६ पर्यंतचा सुमारें ६६ वर्षांचा म्हणजे चालुक्य राजवटींतील एक तृतीयांशाहून अधिक काळ विक्रमादित्याच्या कर्तबगारीनें व विक्रमानें गजबजलेला होता असें म्हणतां येतें. या व इतर दृष्टींनींहि त्याचें स्थान कल्याणवासी चालुक्यांत अद्वितीय होय. मराठी राज्यांत वयाच्या सोळाव्या सतराव्या वर्षापासून कारभार पाहाणारांचीं व लढाईवर जाणारांचीं उदाहरणें खुद्द पेशवे घराण्यांत व इतरांतहि अनेक आहेत. तोच नियम मुसलमानपूर्व हिंदु राजघराण्यांनाहि लावण्यास सहावा विक्रमादित्य याचें उदाहरण प्रमाण म्हणून मानतां येतें. त्याचा प्रत्यक्ष कारभाराशीं संबंध सुमारें ६६ वर्षे होता, त्याअर्थी मरणसमयीं तो ८१।८२ वर्षांचा असेल. म्हणजे त्यानें राज्यकारभार पाहावयास वयाच्या पंधराव्या सोळाव्या वर्षी सुरुवात केली असली पाहिजे. तेव्हांपासून राज्यव्यवहाराचें व युद्धकर्माचें शिक्षण रोखठोक मिळाल्यामुळें चैनींत ऐषआरामांत, दुर्व्यसनांत किंवा आळसांत काळ घालविण्यास राजपुत्रांना

सवडच न राहून ते राजपद प्राप्त होऊन राज्याची धुरा अंगावर घेत त्या सुमारास भावी जबाबदारीस पूर्णपणें पात्र झालेले असत.

विक्रमादित्यास इतकी प्रदीर्घ हयात लाभली होती आणि वैभव व शांतता मिळाली होती तरी ज्याच्या योगानें त्याचें नांव अजरामर राहील असें शिल्प त्यानें निर्मिलेलें दिसत नाहीं. बदामीकर चालुक्यांपैकीं मंगलीश व राष्ट्रकूटांपैकीं पहिला कृष्ण यानें खोदलेलीं उत्कृष्ट लेणीं विक्रमापुढें होतीं. तैलपाचा मांडलिक गंग राजा राचमल्ल चवथा याचा मंत्री चामुंडराय यानें इ.स.९७७त श्रावण बेळगोळ येथें गुंमत भुजबळी ही प्रचंड जैनमूर्ति उभारली होती. तितक्या उच्च दर्जाची कलाकृति विक्रमादित्यासहि करण्याचें सुचलें नाहीं, मग इतरांना सुचलें नाहीं यांत आश्चर्य कसलें? कल्याणवासी चालुक्यांचा मुख्य गुण हा कीं ते विद्याव्यासंगी व विद्याप्रेमी होते. विक्रमाच्या पदरीं विज्ञानेश्वर व बिल्हण यांसारखीं रत्नें असून, त्याचा पुत्र सोमेश्वर हा त्यांच्या संगतींत वाढल्यामुळेंच कीं काय स्वतः विद्वान निपजला. विक्रमाचा पिता पहिला सोमेश्वर यानें जलसमाधि घेतली ही विरळा घडणारी गोष्ट समजली पाहिजे. खुद्द विक्रमानें स्वयंवर केलें असेल तर तेंहि कृत्य तितकेंच अद्भुत होय. या सर्वांवरून कल्याणचें चालुक्य घराणें अशिक्षित व असंस्कृत नसून थोर क्षत्रिय राजांना शोभण्यासारखें अभिजात, उदार व उच्च होतें असेंच म्हणावेंसें वाटतें.

या घराण्याचा संस्थापक तैलप २ रा हा राष्ट्रकूट राजा कर्क तिसरा याचा जांवई होता. नोळंबवाडीचा पल्लव राजा इरिव्ह यास सत्याश्रयानें आपली कन्या दिली होती. जयसिंह तिसरा याची कन्या हंमा हिचें लग्न यादव राजा भिल्लम तिसरा याच्याशीं झालें होतें. गोव्याचा कदंब राजा जयकेशिन् दुसरा याची भार्या मैलालदेवी ही सहाव्या विक्रमाची कन्या होती. कर्का-खेरीज बाकीचे सर्व राजे चालुक्यांचे मांडलिक असले तरी आचार-विचारांच्या दृष्टीनें समान दर्जाचे असले पाहिजेत हें सांगावयास नकोच. या-

वरून तत्कालीन क्षत्रियवर्ण आपला चातुर्वर्ण्यान्तर्गत धर्म संभाळून होता असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं. चालुक्यांच्याच उत्तेजनानें हळेबीडचें होयसळ क्षत्रिय घराणें व वारंगळचें काकतीय घराणें हीं दोन्ही उदयास येऊन पुष्कळच भरभराट पावलीं. सिंदांच्या ताब्यांतील मुलखास सिंदवाडी म्हणत असून तें राज्य उत्तर म्हैसूर, बल्लारी व विजापूर या भागांत पसरलें होतें आणि गंगांची गंगवाडी व नोळंबांची नोळंबवाडी याच्या लगत्यास होतें. सिंद हेहि गंग व नोळंब यांप्रमाणें चालुक्याचे मांडलिक व सहाय्यक होते. महाराष्ट्रांतील शिंदे या प्रसिद्ध घराण्याचे हे सिंद-शिंद पूर्वज दिसतात. तसेंच कदमांचीं घराणीं हींहि वनवासी, गोवें व हनगल येथील कदंब कुलापासूनच उत्पन्न झालीं आहेत. कोंकणचे शिलाहार म्हणजे महाराष्ट्रांतील शेलार. सारांश महाराष्ट्राच्या भावी अभ्युदयाचीं बीजें न कळत कल्याणच्या चालुक्यांनीं रुजत घातलीं. विक्रमादित्यानंतर विशेष कर्तबगार पुरुष चालुक्यांत निपजले नाहींत. तरी पण बहुतेक मांडलिकांची विक्रमादित्यावरील भक्तीमुळें चालुक्य घराण्यावर भक्ती असल्यानें चालुक्यांचा सेनापति व दंडनायक विज्जल हा त्या घराण्यावर उलटला नसता तर इ. स. ११५७ च्या पुढें पन्नासएक वर्षें त्यांच्या सहाय्यानें चालुक्यांकडे सम्राटपद टिकलें असतें असें वाटतें.

विक्रमदित्याची राणी सावळदेवी हिचा बाप जोगम राणा मंगळवेढ्याचा मंडलेश्वर हा सूर्यवंशीय होता. महाराष्ट्रांतील सुरोशी नांवाचे मराठे त्याच वंशांतील होत. यादवांचा मांडलिक ( इ. स. ११५३ ) गोवण हा खानदेशांत राज्य करीत होता. त्याच्या घराण्याचें नांव निकुंभ. निकम या आडनांवाचीं मराठे घराणीं महाराष्ट्रांत अनेक आहेत. त्यांच्या निकम या आडनांवाची उत्पत्ति निकुंभ नांवापासूनच संभवते.

# प्रकरण आठवें

## कलचुरी घराणें

### ( इ. स. ११५० ते १२०० )

### विज्जल दुसरा

कल्याणवासी चालुक्यांमागून सम्राटपदावर आलेला विज्जल व त्याचे वंशज आपला धागा चेदी देशाच्या कलचुरींशीं जोडतात ( बांबे गॅझीटिअर, भाग २ रा ). विज्जलाचा मूळ पुरुष कृष्ण हा नासिकाच्या आसपास मांडलिक या नात्यानें राज्य करीत होता. त्याचा पुत्र शंकरगण व शंकरगणाचा पुत्र बुद्ध. इ. स. ६०७ च्या सुमारास बुद्ध गादीवर असतां बदामीचा चालुक्य सम्राट मंगलीश यानें त्याचा पराभव केला. बुद्धानंतर कृष्ण ऊर्फ कन्नम्मा हा पुरुष निर्माण झाला. तो इ. स. १०४२ त असून आपणास त्रिकलिंगाचा राजा म्हणवीत असे. कन्नमास विज्जल पहिला व राज किंवा राजल असे दोघे पुत्र होते. राजल यास अंमुगी, संकम पहिला, कन्नर व जोगम असे चौघे पुत्र असून जोगमाचा पुत्र पेरमाडी ऊर्फ हेमाडी हा चालुक्य सम्राट सोमेश्वर तिसरा याचा सन ११२८ च्या सुमारास मांडलिक होता. हेमाडीचा पुत्र विज्जल दुसरा यानें चालुक्यांचें राज्य हस्तगत केल्यावर त्रिभुवन-मल्लदेव व कालंजरपुराधीश्वर या पदव्या धारण केल्या. शेवटच्या पदवीनें त्याचें घराणें चेदी देशांतील असल्याचें निदर्शनास येतें. ( His. Ins. of S. India ).

विज्जलाकडे बापाची तर्दवाडाची जहागीर आलीच. शिवाय त्यानें वनवासी द्वादश सहस्र व कुन्नर हीहि जहागीर मिळविली. सातारा जिल्ह्यांत म्हसवडास शके १०६९ ( इ. स. ११४७ ) मधील एक लेख सांपडला असून त्यांत 'मंगाळवेड' हें कळचुर्य विज्जणाचें स्थिर शिबिर असल्याविषयीं स्पष्ट निर्देश आहे. त्यावरून चालुक्य राजा तैलप तिसरा याच्या कारकिर्दीस सुरु-

बात होण्याच्या पूर्वीपासून विज्जलाची राजधानी मंगळवेढें ही होती यांत शंका राहात नाहीं. कल्याणच्या चालुक्यांचा एक अधिकारी मंगळवेढ्यास राहात होता असें कोल्हापूर गॅझीटियरांत म्हटलें आहे तें याच अर्थानें. हा मंगळवेढें गांव तर्दवाडी सहस्रांत असणेंहि संभवनीय आहे. विज्जलानंतर राय-मुरारी सोयीदेव ऊर्फ सोमेश्वर व सोमेश्वरामागून संकम राजा झाला. संकम-देवाचा एक कानडी शिलालेख औंध संस्थानांतील आटपाडी पेट्यांत नेल-करंजी येथील भिमाशंकराच्या देवळांत असलेला औंधास आणून ठेवलेला आहे. त्यांत सोयीदेवाचा निवास मंगळवाड येथील स्थिरशिबिरांत असल्याचें नमूद आहे. तें विचारांत घेतां कल्याणचें सम्राटपद मिळाल्यावरहि कलचू-रींनीं आपली राजधानी मंगळवेढ्यास ठेवली असून ते कल्याणास कारणपरत्वें राहात असतील असेंहि अनुमान काढतां येतें.

विज्जल गादीवर बसल्यानंतर आपली सत्ता सर्वत्र स्थापण्याकरितां राज्यांत दौऱ्यावर निघत असे. सन ११६२ त तो म्हैसूर प्रांतांतील शिकारपूर तालुक्यांत बळगांवे येथें होता. त्यानें त्या व पुढच्या वर्षी आपल्या राज्याच्या दक्षिण भागांत मोठा दौरा काढला.

विज्जलानें आपल्या कारकिर्दीत राज्याची आर्थिक व्यवस्था फार चोख ठेवली होती. त्याचा काश्यप नायक नांवाचा वनवासीचा सामंत (Viceroy) फार हुशार होता. फडणिशी खात्यांत श्रीधर नायक, आचण्णा नायक, चत्तिमय्या नायक (Chattimayya) मल्लियण्णा नायक व तिक्किमय्या नायक असे पांच करण (अधिकारी) असून ती विज्जल देवाची जणूं काय पंचेंन्द्रियेंच होतीं. ते पांच अधिकारी, सिंहासारखे पराक्रमी, व राज्य-कारभारांतील कनिष्ठ नोकरांच्या लबाड्या उघडकीस आणण्यांत पटाईत होते. विज्जल एकंदरींत धर्मनिष्ठ, कर्तबगार व कार्यकुशल राज्यकर्ता असून त्याचे ठिकठिकाणचे अधिकारीहि त्याजप्रमाणेंच धर्मनिष्ठ होते. त्यांनीं अनेक शिवालयें व विष्णु मंदिरें बांधलीं. काश्यप नायक हा त्यांपैकीं एक श्रेष्ठ

अधिकारी समजण्यास हरकत नाहीं. ( Ancient India Vol. I by Krishnaswami Aiyangar ).

विज्जलाच्या काळांत कर्नाटकांत धार्मिक विचारक्रान्ति झपाट्यानें सुरू होती. रामानुजाचार्यांचा वैष्णव संप्रदाय म्हैसूरच्या भोंवतीं जोरानें प्रसार पावत होता. त्याशिवाय पाशुपत, कापालिक व कलमुख हे शैवपंथहि जोरांत होते. वामदेव पंडित हा महान् पुरुष गौतमाचार्यांचा शिष्य व धर्मोपदेश असून त्यास जुन्या लेखांतून राजगुरू म्हटलें आहे. त्याजकडे विज्जलानें शैव वैष्णव व जैन संप्रदायांच्या देवालयांना नेमणुका करून देण्याचें काम सोंपविलें होतें. ( Ancient. India vol. 1 by Krishnaswami Aiyangar ). विज्जलाच्या राज्यांत सर्वत्र धार्मिक चळवळ उत्पन्न झाली होती. पण त्या चळवळीपेक्षां खुद्द कल्याणांत घडलेल्या धर्मक्रांतीचें स्वरूप निराळें असून तिचा परिणाम विज्जल ऊर्फ विज्जण किंवा ब्रिज्जण यास भोगावा लागला. त्या क्रांतीचा प्रवर्तक बसव हा ब्राह्मण होता. बसवाचा बाप मादिराज हा कलादगीपाशीं बागेवाडीस राहात असे. विज्जणाचा मुख्य प्रधान बलदेव हा बसवाचा मामा असून त्यानें आपली कन्या बसवास दिली होती. बलदेव मरण पावल्यावर विज्जणानें बसवासच आपल्या प्रधानपदावर नेमलें. बसवाला नागलंबिका नांवाची एक बहिण होती. तिचा पुत्र चनबसव याच्या सहाय्यानें बसवानें लिंगायत पंथाची स्थापना केली. या पंथांत लिंग व नंदी यांना अग्रस्थान मिळालें. नवीन पंथाकरितां जंगम हा नवा पुरोहित वर्ग बसवानें निर्मिला व त्या वर्गासाठीं राजाच्या कोशागारांतून तो मनसोक्त पैसा खर्चूं लागला.

विज्जणाचा मंचण्णा हा एक प्रधान होता. त्यानें बसवाच्या धर्मपंथाविरुद्ध राजाचें मन दूषित केल्यामुळें असो वा इतर कारणामुळें असो बसव व विज्जण यांजमध्यें वितुष्ट आलें. बसवास याचा सुगावा लागल्यावर तो राजधानी सोडून गेला. राजानें त्याच्या पाठलागास सैन्य पाठविलें. त्या

सैन्याची व बसवाच्या अनुयायाची लढाई होऊन तींत विज्जणाचें सैन्य पराभव पावलें. बसव परत कल्याणास प्रधानपदावर आला. राजाचा त्याजवरचा राग कायम असून त्याला कारण बसवाचें धर्मबाह्य वर्तन हेंच असलें पाहिजे. बसवानें नवीन स्थापलेल्या धर्माविषयीं राजाचें, त्याच्या मंत्रिमंडळाचें व सामान्य जनतेचें मत विरुद्ध होतें. नवीन पाखंडी मताचें निर्मूलन कसें करावें याचा विज्जणास विचार पडून त्यानें लिंगायत पंथीयांचा छळ मांडला. त्या पंथाच्या मुख्य पुढाऱ्यांचें परिपत्य झालें म्हणजे पंथ आपोआप मरेल या समजुतीनें विज्जणानें बसवाचे दोन पट्टशिष्य हलेयाग ( Halleyaga ) व मधवय्या यांना पकडून त्यांचे डोळे काढविले. हें भयंकर वर्तमान कल्याणांतील सर्व लिंगायतांना समजून त्यांचीं मनें प्रक्षुब्ध बनलीं. ते सर्व पुढील उपाय योजण्याकरितां बसवाच्या मठांत जमले. त्यांच्या बैठकींत राजाला ठार मारण्याचा बेत झाला व बसवानें ही कामगिरी जगद्देव या शिष्यावर सोंपविली. जगद्देव प्रथम या धाडसी कृत्यास तयार नव्हता. पण मागाहून त्याच्या आईनेंच भर दिल्यावरून तो त्यास सिद्ध झाला. मालय्या व बोमय्या या दोन साथीदारांसह जगद्देव थेट राजवाड्यांत गेला. आणि भोंवतालचे दरबारी लोक व अमीर-उमराव यांच्या गर्दीतून वाट काढून त्या सर्वांनीं हत्यार चालवीत राजाला ठार मारलें. या धाडसी कृत्यानंतर ते रस्त्यांत आले व राजवधाचें कारण सर्वांना त्यांनीं सांगितलें. इकडे राजपक्षीयहि खवळले. दोनही पक्षांपाशी शस्त्रास्त्रें व सैनिक यांची वाण नव्हती. माणसाला माणूस, घोड्याला घोडा व हत्तीला हत्ती भिडून कल्याण नगरांत मोठाच संग्राम माजला. त्या मारामारींत विज्जण पक्षाचें फार नुकसान होऊन कल्याण नगराची राखरांगोळी झाली. तेथून बसव मलप्रभा व कृष्णा यांच्या संगमावरील संगमेश्वराच्या देवालयांत गेला व तेथें शंकरापाशी तपश्चर्या केल्यावर त्याच्या मनाला शांति मिळाली. ( बॉंबे गॅझीटियर भाग २ रा. )

विज्जलाच्या मृत्यूचा ग्रंथ आणखी एका रीतीनें लावण्यांत येतो. विज्जलाचें प्रेम बसवाच्या बहिणीवर ( नागलंबिका ) बसलें होतें व तिचाच पुत्र चनबसव व त्याच्याच सहाय्यानें बसवानें पुढें लिंगायत पंथाची स्थापना केली. विज्जलाचा मुख्यप्रधान बलदेव हा बसवाचा मामा असून त्यानें आपली कन्या बसवास दिली होती. पुढें बलदेव मरण पावल्यावर विज्जलानें कदाचित् नागलंबिकेच्या भिडेखातरहि बसवास प्रधानपद व सेनापतित्वाचा अधिकार दिला असेल (' Mysore & Coorg ' Rice P.79 ) त्यानंतर बसवावर सर्व जोखीम टाकून विज्जल गाफील व निष्काळजी राहिला. ( His. Ins. of S. India P. 114 ). बसवास आपल्या बहिणीशीं राजाचा असलेला अनीतिमूलक संबंध सहन होणें शक्य नसल्यामुळें त्यानें हातीं आलेल्या सत्तेचा फायदा घेऊन विषप्रयोगानें वा वर लिहिल्याप्रमाणें तिघा अनुयायांच्या करवीं त्याचा नाश केला असावा. याशिवाय दरबारी लोक व अमीर-उमराव यांच्या देखत राजवाड्यांत जाऊन त्याला ठार मारणें व दोन्ही पक्षांची लढाई कल्याण नगरांत झडणें शक्य वाटत नाहीं. लिंगायत पंथ हिंदु धर्मातील चातुर्वर्ण्याविरुद्ध बंड करून उठला या घटनेचाहि उलगडा अन्यरीतीनें होत नाहीं. कारण स्वतः बसव हा ब्राह्मण होता. पण त्याचा भाचा अनीतिमूलक संबंधापासून जन्मास आला होता. त्याची मदत बसवानें नवीन पंथस्थापनेस घेतली म्हणूनच ब्राह्मणांनीं त्या उभयतांस बहिष्कृत केलें असावें.

## सोमेश्वर

विज्जलाचा वध व तदनुषंगिक अनर्थ इ. स. ११६७ त घडल्यावर त्याच्यामागून त्याचा पुत्र सोमेश्वर गादीवर बसला. तो मंगळवेढ्यास राहात असे. त्याचा सातारा जिल्ह्यात भिवघाट येथील शिलालेख प्रसिद्ध असून त्यांत त्यानें आपणास समस्तभुवनाश्रय, पृथ्वीवल्लभ, महाराजाधिराज, परमेश्वर, परममाहेश्वर, काळंजरपुरवराधीश्वर, कळचुर्यकुलकमलमार्तण्ड,

कलचुर्य-कुलप्रताप-चक्रवर्ती अशा पदव्या लावल्या आहेत. याचा सेवक महाप्रचंडदण्डनायक म्हणजे मुख्य न्यायाधीश ( Chief justice ) याच्या विनंतीवरून त्यानें उत्तरायणसंक्रमणपर्वकाळीं पाडे नाडांतील करजय गांवांमधील दोन मत्तर जमीन भिमाशंकर देवास दिली. यांतील पाडे म्हणजे औंध संस्थानांतील आटपाडी गांव असावें. त्याची राणी बावलदेवी हिच्या विनंतीवरून त्यानें चौदा ब्रह्मणांना व सोमेश्वर देवाला शक १०९६ ( इ. स. ११७४ ) जमिनी दिल्या. त्याच्या कारकिर्दीत महत्त्वाचा युद्धप्रसंग असा घडला नाहीं. तथापि त्याच्या राज्यांतच कलचुरींचा अंमल मानण्याकडे अद्यापिहि रयतेची प्रवृत्ति नसल्यामुळें सोमेश्वराचें बरेंच सामर्थ्य त्या कामींच खर्ची पडत असलें पाहिजे. कारण बनवासीदशसहस्त्र या प्रांतांतील वसूल देण्याचें तेथील मांडलिकांनीं नाकारल्यावर सोमेश्वरास आपले दोघे सेनापती एप्रिल ११७३ मध्यें त्यांच्या पारिपत्यार्थ सैन्यानिशीं पाठवावें लागले. त्यांच्या सैन्याचा तळ तुंगभद्रेच्या पूर्वेकडे पडला असतां त्यांजवर स्थानिक जहागीरदारांनीं चोहोंकडून हल्ला केला व मोठें तुंबळ युद्ध जुंपलें. हा विरोध त्यांनीं चालुक्यांचे पक्षपाती म्हणूनच केला असावा हें उघड आहे. कारण यावेळीं तैलपा पुत्र सोमेश्वर चालुक्य नांदत असून त्यास बल्लारी वगैरे भागांत राजा या नात्यानेंच वागविण्यांत येत होते. ( His. Ins .of S. India P. 118 ).

## मल्लुगी

सोमेश्वर इ. स. ११७५ त मरण पावल्यावर सोमेश्वराचा चुलता म्हणजे विज्जलाचा धाकटा भाऊ मल्लुगी हा गादीवर बसला. सोमेश्वरास कदाचित् पुत्रसंतति नसेल. पण त्यास धाकटे भाऊ संकम, आहवमल्ल व सिंगण हे असतां मल्लुगीनेंच गादी कां बळकावावी हा प्रश्न उद्भवतो. पण त्यानें गादी अन्यायानें बळकावली असल्यामुळें त्याजकडे ती फार दिवस टिकली नाहीं असें दिसतें. त्याला ' यादवराजा चौथा भिल्लम हा जबरदस्त शत्रू भेटला. त्यानें मल्लुगीचा

पराभव केला व कल्याण नगर घेतलें ( सूक्तिमुक्तावलि ). तें घेतल्यावर कल-चूरींना मंगळवेढें हें एकच राजधानीचें जुनें शहर राहिलें. शक १०९८ ( इ. स. ११७६ ) च्या सुमारास वऱ्हाडांत अकोल्यापाशीं अग्नेयीस सहा कोसांवर बार्शी टाकळी या गांवावर मालुगी देवाचा ( मल्लुगी ) पुत्र राजल यानें स्वारी केली ( एपिग्राफिया इंडिका खंड २१ वा ). त्या गांवीं तरुण राजा हेमाद्रिदेव हा राज्य करीत होता. पण त्या स्वारींत राजलच पराभव पावला. मालुगीची कारकीर्द अल्पकालीन व अपेशी ठरली. त्याच्या मागून ११७७ त संक्रम देव राज्यावर बसला. त्यानें देखील तीनच वर्षें राज्य केलें. त्याच्या महाप्रधानानें सोमेश्वराप्रमाणेंच भिमाशंकरास जमीन दिली असून त्या दानपत्रांत संक्रमास कळचुर्य-कुलप्रताप-चक्रवर्ती व निःशंकमल्ल अशा पदव्या आहेत. गादीवर येण्यापूर्वी संक्रम हा बल्लारी जिल्ह्यांत महा-सामंत ( Viceroy ) असून सिंद राजा त्याचा मांडलिक होता. राज्यांतील इतक्या महत्त्वाच्या अधिकारामुळेंच त्याला राज्यप्राप्ति सोपी झाली. त्याच्या कारकिर्दींत होयसळ राजा बल्लाळ दुसरा म्हैसुरांत राज्य करीत होता.

## आहवमल्ल

संक्रमामागून त्याचा धाकटा भाऊ आहवमल्ल यानें इ. स. ११८० त गादी मिळविली. त्यावेळीं बम्म ऊर्फ ब्रह्म या सरदारानें सोमेश्वर चालुक्य याचा पक्ष उघडपणें घेऊन त्याच्या नांवाची सन ११८३ त द्वाही फिरविली. अनंतपूर जिल्ह्यांतील रयतेनेंहि त्याचाच कित्ता गिरवून सोमेश्वरासच आपला राजा मानलें. ही सांथ वायव्य म्हैसूरांतहि पसरून वनवासीचा कदंब राजा कोंडम यानेंहि इ. स. ११८७ त त्याचें वर्चस्व कबूल केलें. ११८९ त कुंतल विषय म्हणजे बेळगांव जिल्ह्याचा कांहीं भाग सोमेश्वराच्या सत्तेखालीं आला ( His. Ins of S. India P. 122 ). अशा रीतीनें दक्षिणेकडून कल्याणकर चालुक्यांनीं पुनः डोकें काढून कलचूरींची सत्ता संपुष्टांत आणिली

व उत्तरेकडून यादवांनींहि त्या सत्तेवर आधींपासून आक्रमण चालविलेंच होतें. या दोघांनीं दोन्हीकडून उचल केल्यावर जो आणखी कार्यभाग उरला तो द्वारसमुद्राचा होयसळ राजा बल्लाळ दुसरा हा पुरा करीतच होता. बिज्जलानंतरचे सारेच कलचुरी राजे सामान्यतः दुर्बल असल्यामुळेंच त्यांना व खुद्द बिज्जलालाहि आपला अंमल दृढ बसवितां आला नव्हता. त्यांत फितुरी, परचक्रें व बेदिली यांची भर पडल्यामुळें आहवमल्ल कलचुरी हा कंकवाचाच धनी राहिला.

इ. स. ११९० च्या सुमारास यादवराजा चौथा भिल्लम प्रबल होऊन आपल्या राज्याच्या दक्षिणेकडील कलचुरींचा प्रदेश एकसारखा हाताखालीं घालीत चालला होता. त्यानें कलचुरी व त्यांच्या मागून चालुक्य या दोन्ही सत्तांचा इ. स. १२०० च्या अंदाजें निकाल लावला. त्यास प्रतिस्पर्धी होयसळ वीर बल्लाळ असून दोघांच्या सैन्यांची गांठ धारवाड जिल्ह्यांत मलप्रभा व कृष्णा या दोन नद्यांपाशीं पडली. त्या दोघांच्या लढाया हनगळ, कुरुगोडू गुत्तिवोलल, गदगजवळ सोराटूर ( Soratur ) व येलबुर्गे येथें झाल्या. वीर बल्लाळानें गदग घेतलें व धारवाड जिल्ह्यांतील लक्कुंडीचा किल्लाहि त्याच्या हातीं पडला. त्याबरोबर युद्धाचा शेवट होऊन उभयतांत तह झाला. त्या तहान्वयें यादव व होयसळ यांच्या राज्यांमधील मलप्रभा ही सीमा ठरली. या घटकेपासून वीर बल्लाळ मांडलिकत्व झुगारून स्वतंत्रतेनें नांदू लागला. ( His. Ins. of S. India P. 125 ).

चालुक्य सोमेश्वर चवथा केव्हां निवर्तला हें समजत नाहीं. त्याचें राज्य व अधिराज्य अनंतपूर, बनवासी, धारवाड व बेळगांव जिल्ह्याचा कांहीं भाग यांवर इ. स. १२०० पर्यंत होतें. त्यानंतर त्याचा मागमूस लागत नाहीं. तथापि रत्नागिरी जिल्ह्यांत संगमेश्वर येथें बपदेवराय नांवाचा चालुक्यराजा शक ११८१ (इ. स. १२५९ ) त राज्य करीत होता. तो आपणास कल्याणच्या चालुक्यांपैकीं म्हणवितो ( आठल्ये घराण्याचा इतिहास ). बप-

देवरायानें संगमेश्वराहून असरवाडें हा गांव ताम्रपटद्वारा ब्राह्मण भोजनार्थ दान केला आहे. कुंतल विषयांतून ( बेळगांव जिल्हा ) हकालपट्टी झाल्या-वर सोमेश्वरानें दक्षिण कोंकणांत लहानसें राज्य स्थापलें असावें. त्याचाच बपदेवराय हा वंशज दिसतो.

## उपसंहार

कलचुरींचा सुवर्णवृषभध्वज असून त्यांचें आगमन डमरू वाजवून सूचित करण्यांत येत असे. बदामीचे चालुक्य, मालखेडचे राष्ट्रकूट व कल्याणचे चालुक्य या तीनहि राजघराण्यापुढें कलचूरींचा दर्जा अगदींच कनिष्ठ ठरतो. त्याजकडे सत्ता अवघी पन्नास वर्षेंहि टिकली नाहीं. कलचूरींचा संस्थापक विज्जल हा पराक्रमी व समर्थ होता तरी त्याला आपल्या हयातींत आपलें राज्य निष्कंटक करण्याचें साधलें नाहीं. त्याच्याबरोबरीचे मांडलिक राजे त्यास वश झाले नाहींत. इतकेंच नव्हे तर त्यांनीं शक्य त्या उपायांनीं आपली चालुक्यनिष्ठा दर्शविण्यास कमी केलें नाहीं. याच सर्वांनीं एकजुटीनें विज्जलाच्या हातून सत्ता काढून घेऊन चालुक्य घराण्याकडे परत देण्याचा प्रयत्नच केला नाहीं. इतके संघटना चातुर्य व धडाडी असलेला मांडलिक त्यावेळीं कोणी नव्हता हेंच खरें. मात्र विज्जलानें स्वामिद्रोह केला आहे ही गोष्ट बहुतेकांना डांचत होती व त्याचा प्रत्यय विज्जलाला पदोपदीं येत होता. विज्जल मेल्यानंतर त्याच्या मागून जे कलचुरी गादीवर बसले, त्यांचा विज्जलाइतका दरारा नव्हता व त्यांना आयुष्यहि अत्यल्प लाभलें. त्या योगानें राज्यांत दुही माजून कलचुरी व चालुक्य यांचे दोन पक्ष राज्यांत उघडपणें वावरूं लागले. त्याचा फायदा यादव व होयसळ या प्रबळ राजांनीं घेऊन कलचुरी सत्ता रसातळास नेली व आपली सत्ता वाढविली.

---

# प्रकरण नववें

## यादव घराणें.

### ( इ. स. ११७८ ते १३१८ )

म्हैसूर संस्थानांतील हळेबीड ऊर्फ द्वारसमुद्र येथील होयसळ राजे पराक्रमी विक्रमादित्य चालुक्याच्या वेळीं बरेच बळावले होते. विक्रमादित्याचें प्राबल्य असह्य होऊन ज्या दक्षिणेकडील राजे लोकांनीं त्यांजविरुद्ध उचल केली त्याचा पुढारी होयसळ राजाच होता. विक्रमादित्यामागून वीस वर्षांनीं चालुक्यांना उतरती कळा लागली. तिचा फायदा घेऊन होयसळ यादवांपैकीं वीर बल्लाळ प्रभृति राजांनीं कर्नाटकांतील बराच मुलूख घेतला. दक्षिणेस होयसळ यादवांची सत्ता वाढली व खुद्द महाराष्ट्रांत महाराष्ट्रीय यादव प्रबल होऊन त्यांनींहि चालुक्याचा व त्यांच्यामागून कलचूरींचा मुलूख घेतला. यादव दक्षिणेंत केव्हां आले, मांडलिक राजांच्या दर्जास केव्हांपासून चढले याची विश्वसनीय माहिती नाहीं. राष्ट्रकूटांच्या राजवटींत ते दक्षिणेंत होते. त्यांच्यांत होयसळ यादव व श्रीनगरचे यादव हीं दोन मुख्य घराणीं दिसतात. श्रीकृष्ण ज्या यादव वंशांत जन्मला त्याच यादव वंशापैकीं हे यादव आपणास म्हणवितात. श्रीकृष्णाच्या आधींपासून यादव वंश मथुरेस राज्य करीत होता. पुढें श्रीकृष्ण जरासंधाच्या त्रासानें मथुरा सोडून द्वारकेस राहावयास गेला. तेथून तो निजधामास गेल्यावर यादवांची पांगापांग झाली, तींत कांहीं यादवांनीं दक्षिणेचा मार्ग धरला त्यापैकीं हे यादव होत. होयसळ यादवांनीं हळेबिडास द्वारसमुद्र हें नांव दिलें, त्यांत त्यांचें द्वारकेंत राहाणाऱ्या पूर्वजांचें स्मरण व्यक्त होतें. ते आपणास यदूचे वंशज समजून यादवकुलतिलक, यादवकुलांबरद्युमणि व द्वारावतिपुरवराधीश्वर अशा पदव्या लावीत. त्यांची माहिती शके ९२९ (इ.स.१००७)

पासून पुढची मिळते. त्यांचें राज्य प्रारंभीं कावेरीच्या दक्षिण भागीं होतें. चोलांनीं गंगांचा पाडाव केल्यावर होयसळांना आपलें राज्य वाढविण्यास अधिकच वाव सांपडला. पण पुढें होयसळांना चोलांपासून स्वसंरक्षणाची पाळी आल्यानें त्यांनीं कल्याणच्या चालुक्यांचा आश्रय केला. त्यांच्यांतील एका राजकन्येचा विवाह चालुक्य राजा पहिला सोमेश्वर याजबरोबर झाला. सोमेश्वरानें या शरीरसंबंधाचा फायदा होयसळास देऊन त्यांच्या विनयादित्यास आपला महामंडलेश्वर नेमलें. अर्थात तो चालुक्यांचा मांडलिक बनला. चालुक्यांच्या या कृपेमुळें त्याचें राज्य सावनुरापर्यंत उत्तरेस विस्तार पावलें. त्याचा गुरू शांतिदेव हा जैन होता. विनयादित्यानें बरींच जैनमंदिरें बांधलीं. सोमेश्वर पहिला याजबरोबर होयसळांचा झालेला सलोखा दुसऱ्या सोमेश्वराच्या कारकीर्दीपर्यंत टिकला.

असो. आतां आपण होयसळ यादवांकडून देवगिरीच्या यादवांकडे वळूं. हेमाद्रीच्या व्रतखंडांत देवगिरीच्या यादव घराण्याची माहिती आहे. तीच गॅझीटियरमध्यें उध्दृत केली आहे. तीच त्याजविषयीं मुख्य ऐतिहासिक आधार. त्यांत सुबाहु, दृढप्रहार, सेऊण चन्द्र पहिला, धाडीयप्पा पहिला भिल्लम पहिला, श्रीराज, वड्डिग, धाडियप्पा दुसरा, भिल्लम दुसरा, वेसुगी, भिल्लम तिसरा, सेऊणचन्द्र दुसरा, परम्मदेव, सिंदराज, मालुगी, आमरगांगेय, गोविंदराज, अमरमालुगी, कालीय बल्लाळ, भिल्लम चौथा येणेंप्रमाणें राजांचीं नांवें आलीं आहेत. त्यांपैकीं पहिला यादव जो सुबाहु, याचा काळ माहीत नाहीं. त्याच्यानंतर सातवा यादव वड्डिग हा राष्ट्रकूट राजा कृष्ण तिसरा याचा अनुयायी होता. कृष्ण शक ८९० पूर्वी होऊन गेला. तेव्हांपासून मागच्या यादवाची कारकीर्द प्रत्येकीं १५ वर्षांची धरल्यास सुबाहूचा काळ अंदाजीं शंभर वर्षें आधीं म्हणजे शके ७९० च्या सुमारास धरता येतो. यावेळीं राष्ट्रकूट राजा दुसरा कृष्ण हा राज्य करीत असावा. याचा अर्थ यादव कुळाचा उदय राष्ट्रकुटांच्या कारकिर्दींत झाला. यादव-

राजा भिल्लम तिसरा यानें चालुक्यसम्राट सोमेश्वर पहिला याच्या कन्येशीं लग्न केलें. सोमेश्वर शक ९६२ त होता. त्यावरून तिसरा भिल्लम कल्याणवासी चालुक्यांचा मांडलिक ठरतो. तिसऱ्या भिल्लमाचा आजा दुसरा भिल्लम आपणास महासामंत म्हणवितो. त्याचें राज्य नाशिक, खानदेश औरंगाबाद यांवर होतें. तो इ.स. ११०० त असून चालुक्यांचा मांडलिक व तैलप दुसरा व त्याचा पुत्र सत्याश्रय यांस समकालीन होता. सेऊणचन्द्र दुसरा याचा शिलालेख शक ९९१ (इ. स. १०६९) मधील आहे. त्याच वर्षी चालुक्य राजा सोमेश्वर पहिला यानें जलसमाधि घेतली.

अशा रीतीनें राष्ट्रकूट व कल्याणचे चालुक्य या दोन्ही राजघराण्यांची कारकीर्द यादवांनीं पाहिली होती. वर सांगितलेल्या यादवांची माहिती सगतवार सांपडत नाहीं. त्यांपैकीं पहिला राजा सुबाहु यांचें वृत्त ज्ञात नाहीं. त्याचा वारस दृढप्रहार दक्षिणेंत श्रीनगरांत राहात असल्याचें हेमाद्रीच्या व्रतखंडावरून समजतें. दृढप्रहाराचा पुत्र सेऊणचन्द्र बापामागून गादीवर बसला. त्यानें सेऊणपूर नामक नगर वसविलें. तो ज्या देशावर राज्य करीत होता त्याला सेऊणदेश हे नांव प्राप्त झालें. राजांच्या नांवावरून देशांचीं नांवें पडतात तीं अशीं. नाशीकच्या दक्षिणेस गोदावरी नदीच्या दोन्ही कांठच्या प्रदेशाला सेऊणदेश म्हणत. होयसळ यादवांची कर्नाटकांतील राजधानी हळेबीड ऊर्फ द्वारसमुद्र तशी देवगिरीच्या यादवांची जुनी राजधानी श्रीनगर. याचेंच दुसरें नांव सिंदिनेर. सेऊणचंद्राचा पुत्र धाडियप्पा हा सिंदिनेर येथेंच जन्मला. व पंडित भगवानलाल इन्द्रजी यांच्या मतें सिंदिनेर म्हणजेच सिन्नर. भिल्लम दुसरा याचीहि राजधानी सिंदिनेरच होती. सारांश यादवांची नवी राजधानी देवगिरी होईपर्यंत सिन्नर हीच त्यांची राजधानी असून सिंदिनेर व सिन्नर हीं तिचींच भिन्न नावें होत.

असो. सेऊणचंद्र पहिला या मागून धाडियप्पा पहिला व धाडियप्पामागून भिल्लम पहिला राज्यावर बसला. भिल्लमामागून श्रीराज, वड्डिग वा वाड्डुगी,

धाडियप्पा दुसरा व भिल्लम दुसरा असा क्रम लागतो. भिल्लम दुसरा आपणास महासामन्त म्हणवितो. त्याचें लग्न ठाण्याचा शिलाहार राजा झंझ याची कन्या लक्ष्मी तथा लाछिमव्वा हिच्याशीं झालें. झंझ शक ९१० ते ९३० पर्यंत राज्य करीत होता. भिल्लम हा कल्याणवासी चालुक्य घराण्याचा संस्थापक तैलप वा त्याचा पुत्र सत्याश्रय यांचा समकालीन व मांडलिक होता. ( Bombay Gazetteer Vol. I Part II )

या सिन्दी नगरास राष्ट्रकूटराजा धारावर्ष ध्रुवराज याचा मांडलिक किंवा सामन्त कर्कराज हा शक ६९७ त रहात होता. त्यावरून दुसरा भिल्लम याच्यापूर्वी सुमारें तीनशें वर्षांपासून सिन्दीनगर हेंच त्या भागांतील सामन्तांची राजधानी असल्याचें सिद्ध होतें. विशिष्ट सोयीमुळें एका राजवटींत एखाद्या गांवाला कांहीं महत्व आलें म्हणजे तें पुढें तसेंच टिकतें याचें हें उदाहरण आहे.

असो. दुसऱ्या भिल्लमामागून वेसुगी व वेसुगीमागून तिसरा भिल्लम राजा झाला. तिसरा भिल्लम यानें चालुक्य सम्राट जयसिंह दुसरा याची कन्या ह्म्मा हिला वरलें. तो चालुक्यांचा मांडलिक असून इ. स. १०२५ च्या सुमारांस राज्य करीत होता. तिसऱ्या भिल्लमामागून सेऊणचन्द्र दुसरा गादीवर आला. सेऊणचन्द्राचे शक ९९१ ( इ. स. १०६९ ) मधील शिलालेख उपलब्ध असून ते चाळीसगांवापासून तीन कोसावर वाघळी गांवांतील देवळांत आहेत. सेऊणचन्द्र हा चालुक्य राजा विक्रमादित्य सहावा याचा समकालीन होता. त्यानें एका कठिण प्रसंगीं विक्रमास वांचविल्याचें नमूद आहे. कोल्हापूरचा शिलाहार राजा गण्डरादित्य यानेंहि विक्रमादित्याला अशीच संकटकाळीं मदत केल्याचें नमूद आहे. तो प्रसंग कृष्णा नदीवर जयसिंहानें विक्रमादित्याविरुद्ध बंड उभारलें तेव्हांचा दिसतो. त्याच प्रसंगीं सेऊणचन्द्रहि विक्रमाच्या बाजूनें लढला असल्यास नकळे.

भिल्लमचंद्र दुसरा याच्यानंतर ज्याची माहिती उपलब्ध आहे असा राजा मालुगी ( सूक्तिमुक्तावलि, गायकवाड सीरीज ). हा मालुगी बहुधा अमर मालुगी असावा. त्याचें वारंगळचा काकतीय राजा प्रतापरुद्र दुसरा याजबरोबर युद्ध होऊन त्यांत त्याचा पराभव झाला. त्याच्या वेळेपासून किंबहुना त्याच्या पूर्वी गोविंदराज याच्या वेळेपासूनहि कलचुरी बिज्जल व यादवराजे याचे वारंवार युद्धप्रसंग घडत असत. हे युद्धप्रसंग चालुक्य राजा तैलप याचा पक्ष घेऊन यादवांना आणावे लागत कीं बिज्जल हा यादवांचा प्रतिस्पर्धी म्हणून यादवांना बिज्जलापासून मुलुख जिंकून घेण्याकरितां त्याजबरोबर लढावें लागत असे नकळे. या कामीं यादवांचा करिवाहिनीपति दादा व त्याचे वंशज यांचें यादवांना पिढ्यानुपिढ्या उत्तम सहाय्य मिळत गेलें. दादानें बिज्जल भूप सैन्याची दैना उडविलीच, पण त्याच्या पश्चात त्याचा पुत्र महीधर यानें बिज्जलसेनेचें मंथन मालुगीच्या कारकिर्दीत केलें. महीधराचा पुत्र अनंत व बंधू जल्ह, साम्ब व गंगाधर यांनींहि मालुगीची सेवा निष्ठापूर्वक केली. हे बहुधा सर्व यादवांचे करिवाहिनीपति होते. मालुगीनंतर कालीय बल्लाळ गादीवर बसला. पण त्याच्या पश्चात गादी त्याचा चुलता चौथा भिल्लम याला मिळाली. हा कार्यभाग जल्हाच्या मदतीनें घडून आला. भिल्लमास गादी मिळवून दिल्यावर जल्हानें गुजराथेवर स्वारी नेऊन तेथील राजाचा मोड केला. कालीय बल्लाळानंतर त्याच्या पुत्रास यादव राज्य मिळावयास पाहिजे होतें. त्या ऐवजीं भिल्लम यानें तें बळकावलें यांत कांहीं तरी अन्याय झाला असला पाहिजे; म्हणूनच जल्हानें भिल्लमास राज्य मिळवून दिलें असें सूक्तिमुक्तावलीकारानें म्हटलें आहे. चतुर्वर्गचिंतामणीच्या व्रतखंडांत हेमाद्रीनेंहि कालीय बल्लाळाच्या पुत्रावर यदुवंश लक्ष्मी प्रसन्न न होता भिल्लमाच्या गुणांवर अनुरक्त झाल्याचें लिहिलें आहे त्याचें इंगित तरी हेंच असलें पाहिजे. भिल्लम शक ११०० त ( इ. स. ११७८ ) गादीवर बसला व शक १११३ त मरण पावला. त्यानें इ. स.

११८७ त सार्वभौम राजा या नात्यानें आपणास देवगिरीस राज्याभिषेक करून घेतला. ( Bombay Gazetteer Vol I Part II Page 518 ) भिल्लमापूर्वीच सर्व यादव राजे मांडलिक होते. पण कलचुरींच्या राजवटींत देशांत अस्वस्थता, दुही व बखेडे माजले होते, ती संधि साधून कलचूरी संकम याच्या कारकिर्दींत भिल्लम त्याचा उत्तरेकडील मुलूख आपल्या राज्यांत सामील करून स्वतंत्र झाला. त्यानें कदाचित् कल-चुरींचें सर्व राज्यहि बळकावलें असतें. परंतु त्याला दक्षिणेकडून म्हैसूरचा होयसळ राजा वीर बल्लाल हा प्रतिस्पर्धी भेटला. तोहि भिल्लमाप्रमाणें चालुक्यांचा मांडलिक असून यावेळीं भिल्लमाप्रमाणें राज्यविस्तार करून स्वातंत्र्य संपादण्याचा विचारांत होता. त्याजकडून भिल्लमाच्या आक्रमणास विरोध झाला. यादव व होयसळ यांच्या अनेकवार झटापटी उडाल्या. त्यांचा शेवट धारवाड जिल्ह्यांत लकुंडी गांवीं मागें लिहिल्याप्रमाणें लागून उभय राज्यांची सीमा मलप्रभा ठरली. (Bom Gazetteer vol I part II P. 520 ) या युद्धांत भिल्लमाच्या बाजूनें त्याचा पुत्र जयसिंह तथा जैत्रपाल लढत होता. पण तो तह फार दिवस पाळला न जाऊन वीर बल्लाळ कुंतल देशाचा ( बेळगांव व धारवाड ) मालक शक ११४४ ( सन १२२२ ) त झाला.

भिल्लमानें कल्याण ही आपली राजधानी न करतां देवगिरी हें नवें नगर बसवून ती राजधानी बनविली. श्रीशंकराच्या कृपेनें देवगिरीस दिव्य शक्ति प्राप्त झाली असल्याचें हेमाद्रि लिहितो. कृष्ण ऊर्फ कन्हर यादव याचा शक ११७२ मधील ( इ. स. १२५० ) ताम्रपट उपलब्ध झाला आहे; त्यांत सुरगिरीस ( देवगिरी ) दुर्ग बांधला असें म्हटलें आहे. ‘ सुर-गिरिं स्वदुर्गं व्याधात् ’ व ‘ तस्मात् जैत्रपरंपरा समुदाथि ’ अशीं त्यांत वाक्यें आहेत (ग. ह. खरे भा. इ. सं. मं. त्रैमासिक वर्ष २० वें अंक ४ था).

भिल्लमानें एक प्रचंड मोहीम योजून प्रथम माळव्याचा राजा महाकुमार विन्ध्यवर्मा याच्या मुलुखावर धाड घातली. त्यानंतर गुजराथेचा चौलुक्य राजा भीम दुसरा याचा मुलुख पादाक्रांत करून तो दक्षिण मारवाडात घुसला. पण तेथें त्याच्या आक्रमणास पायबंद बसला. ( History of the Parmar Dynasty by Ganguli & Bombay Gazetteer vol. I Part II, Page 520 ) . यावेळीं त्याचा करिवाहिनीपति जल्ह हा असून त्यानें आपले हत्ती गुर्जर राजाच्या सैन्यांत घुसविले.

होयसळ व यादव यांची सरहद्द मलप्रभा ठरली असली तरी त्याशिवाय उरलेल्या सर्व कलचुरी राज्यावर भिल्लमाची सत्ता अप्रतिहत बसली होती असें दिसत नाहीं. कारण नोळंबवाडींतील गुत्तीचे पाण्डय, सौंदत्तीचे रट्ट, कोल्हापूरचे शिलाहार, हनगल व गोवें येथील कदंब यानीं भिल्लमाचें वर्चस्व कबूल केलें नसल्यामुळें कल्याणवासी चालुक्यांच्या म्हणजे कांहीं अंशीं कलचूरींच्या राज्यांतील मध्य व पश्चिम भाग भिल्लमाच्या साम्राज्यांत समाविष्ट झाला नव्हता असेंच म्हटलें पाहिजे.

भिल्लमाच्या काळीं ( इ. स. ११८९ ) त्याचा महाप्रधान, बाहत्तर नियोगाधिपति, पट्टसाहणाधिपति, व सेनापति पेयीय साहणी हा होता. महामंडलेश्वर बाचण ऊर्फ बाचीदेव म्हणजे भास्कर हा बेळवोलेचा कारभार पाहात असून त्याची राजधानी अण्णीगेरे होती. इ. स. ११९१ त त्याचा मंत्री जैत्रसिंह याच्या विनंतीवरून भिल्लमानें हिरीय हंडीगोळ हा बेळवोले जिल्ह्यांतील गाव, गदगास असता त्रिकुटेश्वर देवास दिला.

## जैत्रपाल

भिल्लमाच्या मृत्यूनंतर जैत्रपाल उर्फ जैतुगी हा सिंहासनावर बसला. होयसळ राजा वीर बल्लाळ दुसरा याजबरोबर भिल्लमाच्या कारकिर्दीत लढलेला व भिल्लमाचा मंत्री असलेला जैत्रसिंह म्हणजेच जैत्रपाल असावा. वीरबल्लाळाशीं यादवांचे युद्धप्रसंग येथून पुढें अनेकवार घडले. तसेंच ते

वारंगळचा काकतीय राजा गणपति याच्याशींहि घडून आले. जैत्रपाळास इ. स. ११९१ त राज्यपद लाभलें. त्यानंतर आठ वर्षांनीं वारंगळच्या गादीवर गणपति बसला. गणपति बराच पराक्रमी निघाला व त्यानें राज्याचा उपभोगहि दीर्घकाळ घेतला. गणपतीनें आपला राज्यविस्तार दक्षिणेस व पूर्वेस पुष्कळ केला. काकतीयाप्रमाणें यादव राजेहि महत्त्वाकांक्षी निघाल्यामुळें त्या उभयतांचे दोन हात अनेकवार झाले. गणपतीचा बाप महादेव याज-बरोबर लढून जैत्रपालानें त्यास जिंकलें व त्याच्या राज्याचा कांहीं भाग आपल्या अमलाखालीं आणिला (His. of Parmar Dynasty by Ganguli). गणपतीचाहि पुढें पराभव करून जैत्रपालानें त्याची गादीवर पुनः स्थापना केली. अशा रीतीनें त्यानें आपला दरारा चौफेर बसवून राज्य वाढविलें. जेतुगीचा महाप्रधान व बाहत्तर नियोगाधिपति पारिसशेट्टी हा होता.

जैत्रपालाचा विद्वानांना आश्रय असून त्यानें प्रसिद्ध ज्योतिषी भास्करा-चार्य याचा पुत्र लक्ष्मीधर यास राजसभेंतील पंडितांत अग्रस्थानीं नेमलें (Bombay Gazetteer Vol. I Part II Page 521). लक्ष्मीधर हा वेद, तर्क व मीमांसा या तीन शास्त्रांत निपुण होता. प्रसिद्ध संतकवि मुकुंदराज यानें 'विवेकसिंधु' या मराठी ग्रंथाची रचना जैत्रपालाच्या कारकिर्दींत केली. तो त्यानें जैत्रपालाकरितां लिहिला असें म्हणतात. राजा ' जैत्रपाल जैत्रपंथाचा असून तो अनेक देश जिंकून आंबे-जोगाईस आला व त्यानें जिनाचारांचा बोध करून लोकांना भ्रष्ट केलें. तेव्हां मुकुंदराजानें त्यास ब्रह्मोपदेश देऊन त्याच्या समाधानासाठीं 'विवेक-सिंधु' हा ग्रंथ लिहिला अशी कथा जोगाई महात्म्यांत आहे. राजा जैत्रपा-लाची गढी, मुकुंदराजानें अश्वारूढ जैत्रपालास ब्रह्मोपदेश केला ती जागा, अश्वदरी, मुकुंद पर्वत इत्यादि अनेक स्मृतिशेष व स्थळें जैत्रपाल व मुकुंद-राज यांचा परस्परसंबंध दर्शविणारीं आंबेजोगाईस दृष्टीस पडतात.' ( विश्वे-

श्वर अंबादास कानोले नांदेड यांचा 'मुकुंदराजांच्या अंबानगरीविषयीं थोडा निर्णायक खुलासा' हा भा. इ. सं. मंडळांत मे १९४३ रोजीं वाचलेला निबंध ).

## सिंघण

जैत्रपाळामागून त्याचा पुत्र सिंघण शक ११३२ त (इ. स. १२१०) गादीवर बसला. दादाच्या घराण्यांतील जनार्दन त्याचा करिवाहिनीपति असून त्यानें त्यास हस्तिविद्या शिकविली होती. सिंघणकालीं यादवांचें सामर्थ्य व राज्य पुष्कळ वाढलें. सिंघणानें तुरुष्कांचा--मुसलमानांचा पराभव केल्याचें नमूद आहे ( History of Parmar Dynasty by Ganguli ). हा युद्ध-प्रसंग बहुधा दिल्लीचा बादशहा शमसुद्दीन अल्तमष यानें माळव्यावर स्वारी करून उज्जयिनी घेतली तेव्हांचा असावा. सिंघणानें माळव्यावर स्वारी केली तेव्हां माळव्याचा राजा अर्जुनवर्मा व लाट देशाचा सिंधुराज हे त्याज-बरोबर लढण्यास उभे राहिले. पण सिंघणापुढें त्यांस हार खावी लागली ( History of Parmar Dynasty by Ganguli ). कोल्हारपुरचा शिला-हार राजा भोज स्वतंत्रपणानें वागून सिंघणास जुमानीनासा झाला होता. म्हणून सिंघणानें त्यास जिंकून त्याचें राज्य आपल्या राज्यास इ. स. १२१८ च्या सुमारास जोडलें (Bom. G azetteer Vol at Part 11 Page 524...)

सिंधुराजामागून शंख हा लाट देशाचा राजा झाला. तो युद्धकलाविशारद असून उत्तरेस चौलुक्याशीं व दक्षिणेस यादवाशीं झगडत असे. त्याच्या देशावर सिंघणाच्या सैन्यानें स्वारी करून नर्मदा नदी गांठली. पण त्याला शंखानें सडकून चोप दिला. ( History of the Parmar Dynasty by Ganguli ) यावेळीं यादवांचा सेनापति खोलेश्वर हा ब्राह्मण होता. त्या-नंतर यादव दुसऱ्या खेपेस लाटावर चालून आले. यावेळीं शंख कैद झाला व त्यास खोलेश्वरानें सिंघणापुढें उभें केलें. पण तह होऊन शंखास सोडून देण्यांत आलें. शंख हा माळव्याच्या देवपालाचा मांडलिक होता. वरील

तहानें शंखाबरोबर देवपालहि यादवांचा मित्र बनून ह्यांच्या सहाय्यानें सिंघणानें गुजराथेवर मोहीम नेली. यावेळीं गुजराथेचा चौलुक्य राजा वीरधवल यानें या मोहिमेस तोंड द्यावयाचें पण तो तुरुष्कांशीं लढण्यांत गुंतला असल्यामुळें त्यानें वस्तुपालास यादवांवर पाठविलें. या स्वारींत सिंघणाच्या सैन्यानें तापी ओलांडली, मही गांठली व भडोच भोंवतालचा प्रदेश उध्वस्त केला. शेवटीं उभयपक्षाचा मित्रत्वाचा तह इ. स. १२३२ च्या सुमारास झाला. यानंतर तिसरी मोहीम खोलेश्वराचा पुत्र रामदेव ऊर्फ रामराज यानें इ. स. १२३७ च्या सुमारास गुजराथेवर नेली. तेव्हां गुजराथेचा विशालदेव राजा होता. या प्रसंगीं उभय पक्षांत नर्मदेवर युद्ध होऊन रामदेव मारला गेला ( History of the Parmar Dynasty and Bombay Gazetteer Vol. I Part II Page 525 ).

बेळगांव जिल्ह्यांतील कुंडि देशांत सौंदत्तीस रट्ट नांवाचे मांडलिक राजे असून त्यास वीरबल्लाळ होयसळानें जिंकलें होतें. त्यामुळें होयसळांची सत्ता मिरजेपर्यंत पोंचली होती व त्याच्या पश्चिमेस गोव्यांत कदंब हे मांडलिक राजे होते. यांतून मार्ग काढून वीरबल्लाळ माळव्यावरहि स्वाऱ्या करूं लागला होता ( History of the Parmar Dyu asty by Gamguti ). याचा अर्थ महाराष्ट्राची पश्चिम बाजू थेट गुजराथ व माळवा येथपर्यंत यादवाच्या पूर्णपणें ताब्यांत नव्हती. बल्लाळाच्या महत्वाकांक्षेस आळा घालून त्यास मार्गें रेटण्याची व पश्चिम महाराष्ट्र व कर्नाटक आपल्या अंमलाखालीं आणण्याची सिंघणास निकड वाटूं लागल्यामुळें त्यानें होयसळांवर शस्त्र धरलें. सिंघणाचा सेनापति बिच्चण यानें सौंदत्तीच्या रट्टांना व गोव्याच्या कदंबांना जिंकलें व नोळंबवाडीच्या पाड्यांनाहि नमविलें. अशा रीतीनें इ. स. १२१३ त गदग, १२१५ त अनंतपूर व कर्नूल, १२१६ त वायव्य म्हैसूर, १२१७ त वनवासी हा प्रदेश व बेळगांवासुद्धां कर्नाटकाचा इतर भाग सिंघणाच्या ताब्यांत आला. वीर बल्लाळ इ. स. १२२० च्या सुमारास मृत्यु पावला.

त्यानें सुमारें ४७ वर्षें राज्य केलें. त्याच्यासारखा अनुभविक, कर्तबगार, महत्वाकांक्षी व वयोवृद्ध राजा मेल्यामुळें सिंघणास दक्षिणेकडे भिण्याजोगा शत्रू उरला नाहीं. बल्लाळामागून नरसिंह दुसरा व त्यानंतर लवकरच म्हणजे वर्ष दीड वर्षाच्या आंत सोमेश्वर गादीवर आला. पण या दोघांत कर्तृत्व बेतावेंच असल्यामुळें अतःपर सिंघणाच्या म्हैसुरावरील मोहिमा संपल्या असें म्हणण्यास हरकत नाहीं. रट्ट, पाण्ड्य, होयसळ इत्यादि राजांचा मोड करून त्यांचा बराच प्रदेश जिंकल्यावर बिचण्णानें गोवेकर कदंबांवर शस्त्र धरलें व तेथील राजा त्रिभुवनमल्ल यास ठार मारून इ. स. १२३७ त गोवें प्रांत यादव राज्यास जोडला. सिंघणाचा शक ११३३ मधील शिलालेख वऱ्हाडांत अमरापूर येथें आढळला. सिंघण राजा झाल्यावर एका वर्षानेंच हा लिहिलेला आहे. अमरापूराचें जुनें नांव अमडापूर. हें खेडें बुलढाण्यापासून २८ मैलांवर आहे. तेथील अंबिकेश्वराच्या देवालयांत हा लेख आहे. यादवांचा वऱ्हाडांतील हा सर्वांत जुना शिलालेख. या लेखावरून सिंघणानें या सुमारास वऱ्हाड आपल्या राज्यास जोडलें असावें. या शिलालेखांत सिंघणाच्या नांवाला प्रतापचक्रवर्ती अशी पदवी लावली आहे ( एपिग्राफिया इंडिका, खंड २१ वा. ).

सिंघणापाशीं दोन मोठे सेनापति होते. त्यांपैकीं बिच्चण दक्षिणेस व खोलेश्वर हा ऋग्वेदी ब्राह्मण सेनापति त्याचें राज्य उत्तरेकडे वाढवीत होता. खोलेश्वराचें गोत्र मुद्गल. त्याला सिंघणाच्या राजसभेंत राजा हा किताब मिळाला. खोलेश्वराचे पूर्वज स्वत्कुलांतील व आजोळचेहि विद्वान व सत्वशील ब्राह्मण दिसतात. त्याच्या बापाचें नांव त्रिविक्रम व आजाचें नांव स्वामिदेव. त्रिविक्रम विप्रश्रेष्ठ तर स्वामिदेव विद्वानांना कल्पतरुच गमला. खोलेश्वराच्या मातुलघरचा निपणजा गोविंद, पणजा वासुदेव, आजा निंबदेव. वासुदेव विद्यासंपन्न व निंबदेव याचकांना कल्पवृक्षासारखा, मृदुल नीति धारण करणारा, शत्रुरूपी हत्तीला सिंहासारखा होता. निंबदेवाची कन्या चन्द्रा व चन्द्रेचा पुत्र खोलेश्वर.

खोलेश्वराची आंब्याच्या जोगाईवर फार भक्ति होती. कदाचित् तो तेथील रहिवासीहि असावा. त्यानें आपल्या लेखांत आंब्याचा वर्णिलेला महिमा चित्ताकर्षक आहे. तो म्हणतो "आंब्यांत—आम्रपुरांत निरनिराळे जनपद आहेत. आराम आहेत. घरांना गच्च्या आहेत. त्यांजवर पताका फडकत आहेत. तेथे (देवदेवतांचे) अनंत आराधक व तपस्वी आहेत. त्यांत केदार, अंबर, माणिक्य, सकलेश व गणेश यांचीं देवालयें आहेत. गणेशाच्या देवालयाचें शिखर गगन-चुंबित आहे. नगरांतील चव्हाट्यावर दमून आलेले पान्थ विश्रान्ति घेतात. स्त्रिया घरातून कुंकुमाचे सडे घालतात व घराच्या दरवाजांना मोत्यें माणकें व रत्नें यांच्या माळा लावतात. प्रफुल्लित कमलांचा वास ज्यांत भरला आहे, असा वायू तेथील स्त्रियांचा काम वाढवीत वाहात असतो. आंब्यांत खोलेश्वरानें मेरु पर्वताच्या शिखराच्या तोडीचें देवालय बांधलें व त्याला सुवर्ण व रत्नें यानीं युक्त असे तीन कळस लावले. त्यानें देवीला ( जोगेश्वरी ) सुवर्ण भूषणें व रत्नालंकार अर्पिले व तेलणी हा गांव इनाम दिला. त्यानें धारूर देशांत सकलेश्वर, विष्णु व गणपति यांचीं देवळें बांधलीं. वरील मजकुरांतील मेरुतुल्य देवालय प्रसिद्ध जोगेश्वरीचें स्पष्ट दिसतें. त्यानें आम्रदेशात ( आंब्याभोंवतीं ) वंजरा नदीच्या कांठीं एक अग्रहारहि वसविला व शेंदुरणीस महादेवाचें देऊळ बांधून देवाचें नांव खोलेश्वरच ठेवलें.

खोलेश्वराचा वऱ्हाडाशीं निकट संबंध होता. त्यानें अचलपुरास (एलिचपुर) विष्णु-मंदिर बांधलें, विहिरी बांधल्या व सत्रें स्थापलीं. पुर्णेच्या कांठीं खोलापूर नांवाचें गांव स्वतःच्या स्मरणार्थ वसविलें. हें गांव उमरावतीच्या पश्चिमेस आहे. सिंघणानें तुरुष्कांना हांकून लावल्याचें खोलेश्वरहि सांगतो. स्वतः खोलेश्वरानें गुर्जरांचा पराभव करून खंबायतच्या आखातावर जयस्तंभ रोवला सिंघण विद्येचा भोक्ता व विद्वानांचा आश्रयदाता असल्यामुळें त्याच्या कार-किर्दींत अनेक ग्रंथकार उदयास आले. सोधल्याचा तनय शृंगारधर यानें गायन

शास्त्रावर 'संगीतरत्नाकर' हा ग्रंथ लिहिला. सिंघणापाशीं अनंतदेव नांवाचा मुख्य ज्योतिषी होता. अनंतदेवाचें घराणें पूर्वीपासून ज्योतिष्यांचें होतें. त्याचा एक पूर्वज महेश्वर यानें शेखर नामक करण ग्रंथ लिहिला. त्याशिवाय प्रतिष्ठा-विधि-दीपिका फलग्रंथ, व लघुजातकावर टीका असेहि त्याचे ग्रंथ आहेत. महेश्वराचा पुत्र श्रीपति, श्रीपतीचा पुत्र गणपति व गणपतीचा पुत्र अनंतदेव अशी अनंतदेवाची कुलपरंपरा आहे. प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य हा श्रीपतीचा भाऊ होता. स्वतः अनंतदेव ज्योतिषाच्या तिन्ही शास्त्रांत निपुण होता. त्यानें वराहमिहिराच्या बृहज्जातकावर टीका लिहिली आहे. खानदेशांत चाळीसगांव तालुक्यांतील बहाळ या गांवीं शक ११४४ त त्यानें भवानी अथवा द्वारजा या देवीचें देऊळ बांधलें ( एप्रिग्राफिया इंडिका, भाग ३ रा. ).

सिंघणाचे प्रमुख अधिकारी व मांडलिक पुढीलप्रमाणें होते. सिंघणाच्या व पूर्व राजवटींत सोंधल नावाचा ब्राह्मण श्रीकरणाधिप या हुद्यावर होता. त्याचा दंडनायक पुरुषोत्तम असून पुरुषोत्तमाचा धाकटा भाऊ जोगदेव हा चमूप ( सेनापति ) होता. त्यानें बेळगांव जिल्ह्यांतील सौंदत्ती तालुक्यांत शिवपुर नांवाची एक शैवांची वसाहत केली व त्या शैव ब्राह्मणांना चार गांवें अग्रहार दिलीं. ज्या देवाच्या आश्रयानें या ब्राम्हणांची त्यानें इ. स. १२२२ त स्थापना केली त्याचें नांव पंचलिंगेश्वर. खोलेश्वर हा जसा महाराष्ट्राच्या उत्तर भागांत सिंघणाचा मातबर सरदार होता, तसा कर्नाटकांत दंडनायक बिचण्ण उर्फ बिची-देव त्याच्या सत्तेचा अधारस्तंभ बनला होता. त्याला महाप्रधान, बहात्तरनियो-गाधिपति व सेनापति अशा पदव्या असून त्याची राजधानी पुलिकरनगर म्हणजे धारवाड जिल्ह्यांतील लक्ष्मेश्वर ही होती. त्याच्या हाताखालीं दंडनायक चिक्कदेव व गुत्त घराण्यांतील महामंडलेश्वर जोयीदेव दुसरा यांस देण्यांत आलें होतें. महापरम विश्वासिन् मायीदेव पंडित याच्या हाताखालीं इ. स. १२१५ त हेमय्यनायक याची वनवासीचा सर्वाधिकारी म्हणून नेमणूक झाली होती. दंडनायक व सर्वाधिकारी जगदळ पुरुषोत्तम हा तोरगलें ६००० वर आपला

भाऊ दंडनायक जोगदेव यासह इ. स. १२१२ त अंमल चालवीत होता. महाप्रधान व बाहत्तर नियोगाधिपति पारिसशेट्टी यास हगरगट्टे ३०० चा सर्वाधिकारी नेमण्यांत आलें होतें. बिचणापूर्वी दक्षिण महीचा (कर्नाटक) महाप्रधान नारायण लक्ष्मीदेव हा दंडनायक असल्याचें दिसून येतें. इ. स. १२४० मध्यें रामदेव उर्फ रामराज हा जोगाई आंब्याचा कारभार पाहात होता. अर्थात् तो खोलेश्वराचा अंकित असला पाहिजे.

## कृष्ण तथा कन्हर

सिंघणामागून त्याचा पुत्र जैत्रपाल उर्फ जेतुगी २ रा यास राजपद प्राप्त झालें. पण राज्यारोहणानंतर तो लवकर निवर्तल्यामुळें जेतुगीचा पुत्र कृष्ण उर्फ कन्हर शक ११६९ (इ. स. १२४७) त राजा झाला (संशोधक, धुळें, पृष्ठ २१५). कृष्णाला कन्हरप्रमाणें कन्हार, कंधर किंवा कंधरराज अशाहि संज्ञा लावीत. कृष्णाचा राजगुरू सोमेश्वरदेव होता. सिंघणाच्या वेळचा दंडनायक बिचा ऊर्फ बिचण हा कृष्णकालीं यादवांचा मंत्री होता. त्याचा दंडनायक बसवीदेव हा शंकरभक्त होता. दादाचा वंशज व जनार्दनाचा पुत्र लक्ष्मीदेव हा कृष्णाचा एक मंत्री व हस्तिवाहिनीपति होता. शत्रूचा नाश करून गादीवर स्थिर बसविण्यास कृष्णास त्याचेंच साहाय्य झालें. लक्ष्मीदेवानंतर त्याचा पुत्र जल्हण व त्याचा धाकटा भाऊ हे कृष्णास मंत्री लाभले. मंत्रिपद व सेनापतिपद अशीं दोन्ही कामें जल्हण (जल्ह) करीत असे. बिचा ऊर्फ बिचण याचा वडील भाऊ मल्ल उर्फ मल्लीशेटी हा अमात्य व कुहुंडी देशाचा सर्वाधिकारी असून रायचुरापाशीं मुद्गल येथें राहात असे. त्यानें कृष्णाच्या अनुज्ञेनें बागेवाडी गांवाच्या जमिनी भिन्न गोत्रांच्या बत्तीस ब्राह्मणांना दान केल्या. त्यात पटवर्धन व घैसास या बहुधा कोंकणस्थ, घळसासी व पाठक या देशस्थ वा यजुर्वेदी व त्रिवेदी या गुजराथी ब्राह्मणांचीं आडनांवें आहेत. मल्लीशेटीनें वेणुग्राम भागांत ताम्रपुरी हा गांवहि वरीलप्रमाणेंच दान केला. मल्लीशेटीचा पुत्र चाउंडीशेटी ऊर्फ चावुंडराज हा कृष्णाचा महामात्य व महाप्रधान होता.

कृष्णानें माळव्यावरील मोहिमांसंबंधानें आजाचेंच धोरण पुढें चालविलें. यावेळीं माळव्याचा राजा जगत्तुंग होता. त्याजवर ताज्या दमाच्या कृष्णानें हल्ला चढवून प्रचंड जय मिळविला. कृष्णाच्या स्वारीनें जगत्तुंगाचें पुष्कळच नुकसान झालें. तें दौर्बल्य ओळखून दिल्लीच्या बादशहाचा सेनापति बल्बन यानें नरवरच्या राजास जिंकून माळव्यांत प्रवेश केला व माळव्याची धूळधाण उडविली. माळव्याप्रमाणें गुजराथ व कोंकण येथील राजांनाहि कृष्णानें कांपावयास लावलें. दक्षिणेस सिंघणानें होयसळापासून जो प्रदेश घेतला होता तो कृष्णानें कायम राखला.

कृष्णाच्या कारकिर्दींत महाराष्ट्र व कर्नाटक या दोन्ही प्रांतांत विद्या व वाङ्मय यांना उत्तेजन मिळालें. त्याचा मंत्री जल्हण याच्या पदरीं भानुपंडित नामक कवी असून त्यानें सूक्तिमुक्तावलि नांवाचा ग्रंथ शक ११७९ त (सन १२५७) रचला. श्रीशंकराचार्यांच्या वेदान्तसूत्रभाष्यावर अमलानंदाची वेदान्तकल्पतरु ही टीका आहे. त्या टीकेवर वाचस्पति मिश्रभामति याची टीका याच वेळीं लिहिली गेली. बेळगांव जिल्ह्यांतील सौंदत्ती तालुक्यांत मुन्नवल्ली येथील कालमुख ब्राह्मणास त्यानें इनाम जमीन दिली. तो ब्राह्मण चार वेद, वेदांत, तर्क, व्याकरण, छंद, काव्य, निघंटु यांत निपुण होता. कृष्णाची राजधानी देवगिरी हिचीहि भरभराट विद्या, कला-कौशल्य व संपत्ति या सर्व दृष्टींनीं पुष्कळ झाली. कृष्णाचा शेवट शक ११८२ त ( इ. स. १२६०) झाला. महानुभाव पंथाचा संस्थापक चक्रधर यास कृष्ण ऊर्फ कन्हरदेव लोणार येथें भेटल्याचा उल्लेख ‘ लीलाचरित्र ’ यांत आहे.

## महादेव

कृष्णामागून त्याचा भाऊ महादेव यास राज्यपद मिळालें. त्यावेळीं काकतीयांचा पराक्रमी, कर्तबगार व वयोवृद्ध राजा गणपति आपल्या ६१ वर्षांच्या कारकिर्दींत राज्यविस्तार फार मोठा करून मरण पावला. त्याला पुत्रसंतान नसल्यामुळें त्याची कन्या रुद्रम्मा ही गादीवर बसली. हिंदू राज्यांत स्त्री गादीवर

बसल्याचीं उदाहरणें फार विरळा. या दृष्टीनें हें वृत्त अपूर्व होय. एवढी मोठी जोखीम तिनें शिरावर घेतली यानेंच तिची पात्रता सिद्ध होते. गणपतीला तिचे गुण माहीत होते म्हणून त्यानेंच ही व्यवस्था आपल्या हयातींत करून ठेवली असली पाहिजे. ती राज्यशकट हांकूं लागल्यावर अनुभवहि तसाच आला. तिचें पौरुष प्रकट झालें तेव्हां तिला पुरुषाप्रमाणें रुद्रदेव व रुद्रमहाराज अशीं नांवें देण्यांत आलीं. पण महादेवाच्या भक्तांनीं त्याचा अर्थ वेगळाच लावला. त्यांनीं त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे. "तो (महादेव) स्त्रीहत्या व बाल-हत्या कधीं करीत नसे व शरणागतास अभय देत असे. त्याचें हें शील ओळखून त्याची भीति बाळगणारे आसपासचे राजे त्याचा फायदा घेत. त्याप्रमाणें आन्ध्रांनीं महादेवापुढें पुरुष राजाचा निभाव लागणार नाहीं असें पाहून अबलेला राज्यावर बसविलें व माळव्यांत बालराजाला गादीवर बसविण्यांत आलें. त्यानें आन्ध्रांवरील स्वारींत हत्ती व पांच वाद्यें हिरावून आणिलीं. पण गादीवर रुद्रम्मा असलेली पाहून तिला धक्का लावला नाहीं." महादेवाच्या कारकिर्दींत माळव्याचा राजा अरुणवर्मा असून त्याजवर महादेवानें स्वारी केली नाहीं. त्याचें कारण अरुणवर्मा बालराजा होता हें नसून दुसरें कोणतें तरी असावें.

महादेवाचा भाऊ कृष्ण यानें दक्षिणेस व म्हैसूरच्या बाजूस जेवढा प्रदेश पूर्वीपासून यादवांच्या ताब्यांत होता त्यांत भर घातली नाहीं. त्याचें लक्ष माळव्यावर होतें तर महादेवाचें म्हैसुरावर होतें. माळव्याच्या वाटेस इतकें लवकर जाणें त्यास श्रेयस्कर वाटलें नसेल. यावेळीं होयसळ राजा नरसिंह तिसरा हा गादीवर होता. इ. स. १२६६ त त्याचा पुत्र सोमेश्वर याशीं लढून महादेवाचा सेनापति बिचण यानें त्याचा बराच मुलूख काबीज केला. तेव्हांपासून पुढें कांहीं दिवस म्हैसूर प्रांतांत अस्वस्थता माजून राहिली होती. ती मोडण्या-करितां यादवसेना तिकडेच राहिली असतां तिनें हनगळचा कदंबराजा कामदेव याजवर जाऊन त्याची बंडाळी बंद पाडली. महादेवानें गुजराथेवर

स्वारी केली ती तेथील गजाला वज्राघातासारखी वाटली असें वर्णन आढळतें. कोल्हापूरच्या शिलाहारांचें राज्य सिंघणानें मागेंच खालसा केलें होतें. आतां फक्त उत्तर कोंकणाचे शिलाहार तेवढे शिल्लक होते. महादेवापूर्वी कृष्णानें शिलाहार सोमेश्वर याचा पराभव केलाच होता. पण आतां महादेवानें त्याचा समूळ उच्छेद योजिला. या वेळीं सोमेश्वर हाच उत्तर कोंकणाचा राजा होता. महादेवाच्या सैन्यांत हस्तिदल मोठें व इतर सैन्यहि अफाट असल्यामुळें त्याजपुढें सोमेश्वराचा टिकाव लागला नाहीं. पण यादवांपाशीं आरमार नसल्याचें पाहून सोमेश्वर जहाजांत बसून पळून जाऊं लागला. तथापि तेथेंहि त्याचें दुर्दैव ओढवून तो इ. स. १२६५ च्या सुमारास बुडून मेला.

एव्हांपासून उत्तर कोंकण यादवांच्या कह्यांत पूर्णपणें गेलें व त्यावर महादेवानें आपल्यातर्फे अच्युत नायक यास सर्वाधिकारी नेमलें. तो चांगला कुलीन ब्राह्मण घराण्यांतील होता. ह्याच्या पूर्वजांनीं यादवांच्या पदरीं मोठीं जबाबदारीचीं कामें केलीं होतीं. तो कृष्णाचा मंत्री व युद्धकर्मविशारद लक्ष्मीदेव याचा पणतू आणि कृष्णाचा सेनापति व मंत्री जल्हण याचा नातू होता. त्यानें साष्टी प्रांतात ववळा हा गांव बत्तीस ब्राह्मणांना शक ११९३ त ( इ. स. १२७२ ) दिला. हा गांव ठाण्याच्या वायव्येस पांच मैलांवर आहे. त्यासंबंधाच्या ताम्रपटांत हेमाद्रीची तारीफ असून त्यास निखिलराज्यधुरीणतम समस्तहास्तिपकाध्यक्ष समस्तकरणाधिपति, झाडीमंडलजेता व मंत्रिचूडामणी म्हटलें आहे. महादेवाचा गोपाळ पंडित हा राजपंडित होता. महादेवाच्या राजवटींत देवगिरीचें वैभव अधिकच वाढलें. देवगिरी ही सेऊण देशांत दण्डकारण्याच्या सीमेवर असल्याचें वर्णन आहे. देवगिरीची पुढीलप्रमाणें स्तुति आढळते. ' तें त्रिभुवन-सौंदर्याचें सारसर्वस्व आहे. तेथील घरें मेरु पर्वताच्या शिखरांशीं स्पर्धा करतात, सेऊण देश अतिसुंदर व मधुर आहे.'

देवगिरीचें वर्णन ज्ञानेश्वरीदर्शनांत पुढीलप्रमाणें आढळतें: 'देवगिरीस मोठमोठे बाजार होते. त्यांना सोनेंबाजार, चांदीबाजार, मोतीबाजार, हिरे-माणकांचा बाजार अशीं नावें होतीं. त्यात सोनार, नकस काम करणारे सराफ, सोनें–चांदी गाळून शुद्ध करणारे, मोत्यांस वेजें पाडणारे, त्यांची परीक्षा करणारे, हिऱ्याला घांसून पैलू पाडणारे, पच्चीचें काम करणारे असे अनेक कारागीर असत.' फिरकीचें फूल, मूद, टिका, कांकणें, सोन्याचे मणी, हातांत मुदीच्या आंगठ्या, पायांत जोडवीं, मोत्यांची एकावली, कुई, कुडीं, बुगड्या, इत्यादि तत्कालीन अलंकारांच्या नांवांवरून कारागिरीची कल्पना येते.

पंढरपुरास शक ११९२ मधील एक शिलालेख आहे. यांत महादेवास 'प्रौढप्रताप चक्रवर्ती' असें म्हटलें आहे. याच्या कारकिर्दीत केशवनामक काश्यप गोत्रज ब्राह्मण अधिकाऱ्यानें आप्तोर्याम यज्ञ केल्याचें वृत्त त्यांत आहे.

महादेव इ. स. १२७१ त मरण पावल्यावर त्याचा पुत्र आमण राजा झाला. पण महादेवाचा पुतण्या व कृष्णाचा पुत्र रामचन्द्र हा गादीचा मालक असल्यानें त्यानें शक ११९३ मध्यें आपणास राज्याभिषेक करविला.

## रामचंद्रदेव

रामचंद्रदेवानें महादेवाच्या धोरणांत थोडा फरक केला. महादेव माळ-व्याच्या वाटेस गेला नव्हता. तें धोरण रामचंद्राच्या राजवटींत बदलून यादव-सेना माळव्यावर चालून गेली. त्यावेळीं माळव्याचा राजा अरुणवर्मा किंवा अर्जुनवर्मा असावा. या स्वारींत यादवांनीं मालवनृपतीचा मोड केला. राम-चंद्राचें दुसरें युद्ध वारंगळची काकतीय राणी रुद्रम्मा इजबरोबर झालें. तिसरें मोठें युद्ध होयसळ यादव नरसिंह तिसरा याच्याशीं जुंपलें व तें बरींच वर्षें चालू होतें. त्याला सुरुवात इ. स. १२७६ त करण्यांत आली. या युद्धांत होयसळ घराणें धुळीस मिळविण्याचा रामचंद्राचा निश्चय होता. या मोहिमे-

वर रामचंद्रानें आपला जांवई हरपालदेव व सेनापति साळुव टिक्कमा यांची रवानगी केली. ते म्हैसूरच्या उत्तर भागांत शिरून होयसळांची राजधानी द्वारसमुद्र ऊर्फ हळेबीड हिजवर चालून गेले. यादवांच्या पक्षास बरेच राजे-रजवाडे मिळाले असून त्यांत इरुंगोळ चोल दुसरा हाहि होता. होयसळ सेनेचें अधिपत्य नरसिंहाचा पुत्र बल्लाळ याजकडे होतें. दोन्ही सेना हसन जिल्ह्यांत हळेबिडापाशीं बेळवाडी येथें भिडल्या. या युद्धांत यादवांचा पराभव होऊन त्यांस डुम्मी ( Dummi ) नदीच्या पलीकडे हांकून लावण्यांत आलें. त्या प्रसंगीं यादव सेनेची कत्तल बरीच झाली. ( His. Ins. of S. India, P. 163. )

रामचंद्र या पराभवानें निराश झाला नाहीं. त्यानें आपला सेनापति साळूव टिक्कमदेव यास सैन्य देऊन पुनः होयसळ राज्यांत पाठविलें. या प्रसंगीं टिक्कमानें होयसळांचा धुव्वा उडवून द्वारसमुद्र ही त्याची राजधानी लुटली. १२८४ त म्हैसुरावर तिसरी स्वारी नेऊन यादवांनीं कुप्पे या नगरास वेढा घातला. इ. स. १२८६ त त्यांची चौथी स्वारी झाली. १२८८ त यादव सैन्य पांचव्या खेपेस होयसळांच्या राज्यांत शिरलें. १२९४ त अल्लाउद्दिन खिल्जीनें देवगिरीवर येऊन रामचंद्राचा नाश केलेला पाहून होयसळ राजा बल्लाळ तिसरा याला उमेद चढली. त्यानें इ. स. १३०५ त यादवांवर उलट स्वारी केली. पण तिचा शेवट काय झाला हें समजत नाहीं.

रामदेवाच्या कारकिर्दीत वर सांगितलेला साळूव टिक्कमदेव हा महा-मंडलेश्वर व मानेयसमस्तसैन्याधिपति ( Commander of all the house-hold troops ) म्हणजे खाजगीकडील सेनापति होता. महादेवकालीन अच्युतनायक हाच याहि वेळीं ( इ. स. १२७२ मध्यें ) सासष्टीवर महाप्रधान होता.

प्रसिद्ध हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत हा महादेवाप्रमाणें रामचंद्राचाहि प्रधान होता. त्याला श्रीकरणाधिप किंवा श्रीकरणप्रभु असा हुद्दा होता. कृष्णनायक भारद्वाज गोत्री ब्राह्मण त्याचा एक सामंत होता. माणदेशावर श्रीजोईदेव हा सर्वाधिकारी असून त्याच्या हाताखालीं ब्रह्मदेवराणा होता. पैठणास रामचंद्राचा शक ११९३ मधील (इ.स. १२७१) एक ताम्रपट सांपडला आहे. त्यात ५७ ब्राह्मणांना तीन खेडीं दान केल्याचा उल्लेख आहे. ताम्रपटांत पुढील अटी आहेत. 'त्या ब्राह्मणांनीं वंशपरंपरेनें ह्या गांवीं राहावें. आपल्या जमिनी गहाण टेवूं नयेत. आपल्या गांवीं वेश्यांची वस्ती होऊं देऊं नये. जुगारीस प्रतिबंध असावा. शस्त्रें वापरूं नयेत व त्यांनीं आपला काळ सत्कृत्यांत घालवावा.' खऱ्या ब्राह्मणाचें ध्येय व वर्तन कसें असावें याचा हा आदर्श आहे.

रामचंद्र हा दक्षिणेंतील शेवटचा स्वतंत्र हिंदू राजा. त्याच्या पूर्वी शंभर वर्षे दिल्लीस मुसलमानाची सत्ता स्थापन झाली होती. त्यापूर्वी दोनशें वर्षे मुसलमानांचें उत्तरेवर आक्रमण सुरू होतें. गझनीच्या महंमदाचा नातू मसूद पहिला यानें आपला पुत्र महमूद यास इ. स. १०७५ त हिंदुस्थानात जिंकलेल्या मुलुखाचा सुभेदार नेमलें होतें. त्यानें आग्रा घेतला व माळव्यावर स्वारी केली. तिच्यांत परमार राजा लक्ष्मणदेव याचा प्रथम पराभव झाला. कुतुबुद्दिन ऐबक यानें गुजराथेचा चौलुक्य राजा भीम दुसरा यास पळावयास लावलें. दिल्लीचा बादशहा अलतमष यानें इ. स. १२३२ च्या सुमारास माळवा पादाक्रांत केला. खुद्द यादव राजानींहि माळव्यावर स्वाऱ्या केल्या असून सिंघणानें मुसलमानांचा एकवार पराभव केला होता. बल्लनानें नरवरच्या राजास जिंकून माळव्याची धूळधाण उडविली होती. चव्हाण राजा हंमीर हा अल्लाउद्दिन खिलजीशीं लढत असतां त्याच्या स्त्रियांनीं जोहार केला व हंमीरासारख्या नरवीरास हताश होऊन स्वतःचा शिरच्छेद करून घ्यावा लागला. शेवटीं अल्लाउद्दिनानें माळव्याचा परमार राजा महालक देव यास पळावयास लावून त्याचा प्रांत आपल्या राज्यास जोडला.

इतके सारे प्रकार घडलेले माहीत घडत असतां परमारामागून यादवांची पाळी येणार हें रामदेवरावास आगाऊ समजावयास पाहिजे होतें; व त्यानें भोव-तालच्या हिंदु राजांची जूट जमवून अल्लाउद्दिनाच्या नाशाची आधींपासून तयारी करावयास पाहिजे होती. पण ती न करतां रामदेव गाफील राहिला हें त्यास शोभलें नाहीं. अल्लाउद्दिन शक १२१६ त (इ. स. १२९४) आठ हजार सैन्य घेऊन दाक्षिणेंत यावयास निघाला. तो सरळ एलिच-पुरास पोंचला व तेथून देवगिरीपुढें दत्त म्हणून उभा राहिला. रामचंद्र-देवाला हें सगळें अनपेक्षित होतें. त्यानें चार हजारांपर्यंत घाईनें फौज जमविली व तो शत्रूला तोंड देण्यास उभा राहिला. पण अल्लाउद्दिनाच्या मोठ्या सैन्यापुढें निभाव लागेनासा झाला तेव्हां तो देवगिरीच्या किल्ल्यांत जाऊन राहिला. इकडे अल्लाउद्दिनानें सारें शहर लुटून देवगिरीला वेढा घातला. अल्लाउद्दिन साधा मनुष्य नव्हता. शत्रूला फसविणें, हुलकावणें इत्यादि कुटिल युद्धशास्त्रांतील डावपेंच त्याला पूर्णपणें अवगत होते. दक्षिणेसारख्या पर-मुलुखांत आठ हजार फौजेवर आपला फार दिवस निभाव लागणार नाहीं हें जाणून त्यानें आपली फौज केवळ आघाडीची आहे, बादशहाची मुख्य फौज मागून येत आहे अशी आवई उठवून दिली. त्या बातमीच्या खरेपणावर विश्वासून रामचंद्रदेवास आपण अल्लाउद्दिनाचा हल्ला परतवूं अशी खात्री वाटेना, म्हणून तो तहास कबूल झाला. अल्लाउद्दिनाला अंदरकी बात ठाऊक होतीच. त्यानें रामचंद्रदेव आपणास खूप सोनें देत असेल तर वेढा उठविण्याचें मान्य केलें. या वाटाघाटी चालत आहेत अशा सुमारास रामचंद्र-देवाचा पुत्र शंकरदेव मोठें सैन्य जमवून देवगिरीच्या बचावासाठीं निघाला. अल्लाउद्दिन वेढ्याच्या कामावर एक हजार माणूस ठेवून शंकरदेवास सामना देण्यास चालता झाला. शंकरदेवाच्या फार मोठ्या सैन्यापुढें अल्लाउद्दिनाच्या फौजेला मागें हटावें लागलें. इतक्यांत अल्लाउद्दिनानें टेहळणीकरितां ठेवलेली सैन्याची तुकडी त्यास येऊन मिळाली. शंकरदेवाच्या सैनिकांना वाटलें कीं,

दिल्लीहून येणारें मोठें सैन्य हेंच असावें; या समजुतीनें त्याच्या सैन्यांत गोंधळ माजून त्याचा पराभव झाला.

शंकरदेवाचीहि आपल्यासारखीच स्थिति पाहून रामचंद्रदेवानें अल्लाउद्दिनाशीं पुनः तहाचें बोलणें सुरू केलें. पण आतां पूर्वीचा रंग बदलला. अल्लाउद्दिनानें शत्रूचें अवसान पुरतें ओळखलें व आपली खंडणीची किंमत वाढविली. रामचंद्रदेवाच्या संकटसमयीं त्यास सहाय्य करण्यास त्याचे सहाय्य करण्यास त्याचे मित्रराजे येत होते. पण देवगिरींत कोंडलेल्या रामचंद्रदेवानें आपणापाशीं जी धान्याची म्हणून बेगमी केली होती तिच्यांत धान्याऐवजीं गफलतीनें मिठाचीं पोतीं भरलीं गेलीं होतीं. बाकीचें धान्य अर्थातच अपुरें पडून रामचंद्रदेवाच्या सैन्याची उपासमार सुरू झाली. तेव्हां त्याला अल्लाउद्दिन म्हणेल तें कबूल करण्याशिवाय दुसरा उपायच राहिला नाहीं. म्हणून तो अल्लाउद्दिनास सहाशें मण सोनें, सात मण मोती, दोन मण रत्नें, एक हजार मण रुपें, चार हजार रेशमी वस्त्रें इत्यादि देण्यास राजी झाला. त्याशिवाय एलिचपूर व त्याच्या भोंवतालचा प्रदेश सोडावा व दरसाल दिल्लीस खंडणी पोंचवावी या शर्ती त्यास घालण्यांत आल्या. इतकें झाल्यावर अल्लाउद्दिन दिल्लीस जावयास निघाला.

अल्लाउद्दिनानें परत गेल्यावर आपला चुलता जलालउद्दिन यास मारून राज्य बळकावलें. रामदेवरावानें अल्लाउद्दिन गेल्यावर कित्येक वर्षांत कबूल केलेली खंडणी त्याजकडे भरली नाहीं. म्हणून अल्लाउद्दिनानें आपला सेनापति मलीककाफर यास तीस हजार स्वारांनिशीं रामचंद्रदेवावर पाठविलें. मलिककाफर शक १२२८ त ( मार्च इ. स. १३०७ ) देवगिरीस आला. उभयपक्षांत लढाई होऊन रामदेवराव कैद झाला. रामदेवरावास दिल्लीस पाठविण्यांत आल्यावर त्यास सहा महिने तेथें ठेवून घेऊन सन्मानपूर्वक सोडण्यांत आलें. तेव्हांपासून तो खंडणी नियमितपणें देऊं लागला. शक

१२३१ त ( इ. स. १३०९ ) मलिककाफर तेलंगण जिंकण्यास दक्षिणेंत आला. त्याची रामचंद्रदेवानें वाटेंत देवगिरीस चांगली सरबराई ठेवली.

## महाराष्ट्रांतील धांवपळ

रामदेवराव यादवावर दिल्लीचा सुल्तान अल्लाउद्दिन खिल्जी यानें चाल केली त्यावेळीं महाराष्ट्रांतील जनतेची कशी तारांबळ उडाली याचें वर्णन महानुभावीय वाङ्मयांत कित्येक ठिकाणीं आढळतें. स्मृतिस्थळ हा महानुभावीय सांप्रदायाचा संस्थापक चक्रधर याच्या चरित्राचा एक भाग आहे; तो त्याच्या काळांतच लिहिला असल्यानें विशेष विश्वसनीय आहे. त्यांतील वर्णनाचा आशय पुढील शब्दांनीं सांगतां येईल.

चक्रधराचा शिष्य नागदेवाचार्य याची आई योगिनी नागांबिका ऊर्फ बाईसा, भाऊ वैजोबा व पुत्र महेश्वरपंडित हीं चार माणसें अल्लाउद्दिनाच्या परचक्रांत सांपडलीं. तीं देवगिरीच्या आसपास राहात होतीं. सुलतानाची स्वारी होतांच अवघें मंडळ हललें त्यावेळीं नागदेव ऊर्फ भटोबा यास आपल्या भवितव्याविषयीं चिंता उत्पन्न झाली. त्याची आई बाईसा ही वृद्ध असल्यामुळें तिला भटोबानें आपला भाऊ जो वंजोबा त्याच्या गावीं राहावयास सांगितलें. त्यानंतर तीं सर्व मंडळी बरोबर शेंकडों गुढे ( पळपुटे ) घेऊन परळीवैजनाथ या देवस्थानाच्या रोंखानें जावयास निघाली. अखेर ती मंडळी परळीस पोंचली. इतक्यांत तुरुक ( मुसलमान ) लोक मागून त्यांना गांठीत आले. भटोबाची आई बाईसा हिजबरोबर बाया-बापड्या होत्या. त्यांना तिनें देवळांत घातलें. आपण देवळाचे दाराशीं काठी घेऊन बसली. इतक्यांत तुरुक देवळापाशीं पोंचले. त्यांनीं विचारिलें, 'येथ कोण आहाती' साधे ( बाईसा ) म्हणती 'येथ मी श्रीचक्रधररायाची दासी येल्हो असे' तिनें असें उत्तर दिल्यावर त्यांनीं आंत डोकावून पाहिलें व पुढें चालते झाले. अशा रीतीनें बाईसा व तिच्या बरोबरची दुर्बल माणसें बचावलीं. नंतर बाईसा व तिचा पुत्र वैजोबा यांनीं परळी सोडली. त्यांजबरोबर भटोबाचा मुलगा महेश्वरपंडित हाही होता. वैजोबा

व बाईसा ही एका गाडींत बसलीं व महेश्वरपंडित हा गाड्यांत बसला. गाडी व गाडा पळत सुटले. पळतां पळतां महेश्वरपंडिताचा गाडा वाटेंत मोडला. त्याला मागून येऊन तुरुकांनीं गांठलें. तेव्हां त्यांनीं महेश्वरपंडितास व त्याच्या बरोबरचे लोकांस ' कुठले ? काय ? ' असे प्रश्न विचारिले. त्यांनीं सांगितलें ' आमच्या बरोबरचीं माणसें पुढें गेलीं आहेत व आम्ही गाडा मोडल्यामुळें येथेंच पडून राहिलों आहों. ' हा खुलासा मुसलमानांना पटून ते पुढें निघून गेले. पुढें गेलेल्या माणसांची गांठ पडल्यावर ' गाड्या बरोबरची मंडळी तुमची आहेत काय ' अशी त्यांनीं त्यांजपाशीं चौकशी केली. त्यावर त्यांनीं कानांवर हात ठेवून सांगितलें कीं, ' ये मागिलांची '. याचा अर्थ असा कीं, ' ते कोण आम्हांस माहित नाहीं, मागून येणाऱ्या टोळींपैकीं कोणी असतील. ' येणेंप्रमाणें हीं निरपराधी माणसें अकल्पित रीतीनें वांचलीं.

भटोबा व बाईसा यांचें पूर्वीं ठरल्याप्रमाणें बाईसाला सोडून भटोबा आधींच घांटावर गेले होते. त्यांना हा मागें घडलेला प्रकार आंतरदृष्टीनें समजला. तेव्हां 'हें ज्ञान तुम्हांला कसें झालें' असें बरोबरच्या शिष्यांनीं विचारिलें असतां भटोबा म्हणाले "हां गा श्रीचक्रधराचे णी प्रसादें मी इतकेंही नेणें". हें उत्तर ऐकून सर्वजण आश्चर्यचकित झाले. एके दिवशीं भटोबांनीं शिष्यगणास आंतरज्ञानानें सांगितलें "रामदेवो रावो तेही धरिला."

शिष्य म्हणाले, "त्याचें पुढें काय होणार ?" भटोबांनीं उत्तर दिलें "रामदेवो धरीला परी सुटेल. मी वर्तें तवं मऱ्हाठे वर्तेल." म्हणजे आम्ही साधुसंत या राज्यांत जोंपर्यंत नांदत आहों तोंपर्यंत हें राज्य बुडण्याची भीति नाहीं. यावर असा प्रश्न विचारण्यांत आला कीं असें आहे तर ' रामदेवराव पकडला गेला कसा ? ' या शंकेचें समाधान भटोबांनीं पुढील शब्दांनीं केलें "आणि धरीला तो संतमहंताचिया वोखरेया प्रवर्तला म्हणौनि: परी हे हातवणी. जेवण तें पुढा उरलेंची असे" म्हणजे रामदेवरावानें साधुसंताना उपद्रव

दिला म्हणून तो पकडला गेला. पण हा कुठें चंचुप्रवेश आहे. मुसलप्रवेश अजून पुढें व्हावयाचा आहे. हीं अर्थात् यादव साम्राज्याच्या लयाचीं दुश्चिन्हें होत.

वरील वर्णन माणसांच्या धांवपळीचें झालें. तसलाच आणखी एक प्रकार पण किंचित् निराळ्या स्वरूपाचा पुढील प्रमाणें वर्णितां येतो. मुसलमानांची ही धामधूम बरीच वर्षें चालू होती. अधूनमधून स्वस्थतेचा काळ येऊन लोक आपआपल्या व्यवसायास लागत. इतरांप्रमाणें चक्रधराचे अनुयायी शांततेच्या काळांत व्यवसायास लागले. यावेळीं चक्रधरस्वामी बदरीकेदराकडे गेले होते व त्यांचे शिष्य नागदेवाचार्य बाईसा व महिंद्रभट हे वऱ्हाडांत ऋद्धिपुरीं चक्रधरस्वामींचे गुरु श्रीगोविंद प्रभु यांजपाशी सेवा करीत राहिले. त्यांच्या संभाषणांत चक्रधरांचें चरित्र म्हणजे लीलाचरित्र भटोबांनीं रचावें असें ठरलें. त्याप्रमाणें भटोबा वाजेश्वरीच्या देवळांत एक प्रहर चरित्र सांगत व तें महिंद्रभट लेखन करीत. नंतर नगरांत ते दोघे भिक्षा मागत व उरल्या वेळांत गोविंदप्रभूची सेवा करीत. अशा रीतीनें चरित्र लिहिलें गेलें व तें सर्व शिष्यांनीं मुखोद्गत केलें. चरित्राची प्रत येत येत एक शिष्य कवीश्वर बा यांचे हातीं आली. अशा सुमारास दिल्लीचा सुल्तान फिरून महाराष्ट्रांत चालून आला. तत्क्षणीं कवीश्वर हे परशराम आदि करून आपल्या सहकाऱ्यांसह कोंकणांत जावयास निघाले. कोंकणांत जातांना वाटेंत चोर उठले. त्यांनीं शिष्यवर्ग घांट उतरत असतां त्यास नागविलें. पोथीची झोळी परशरामापाशीं होती. तिच्यांतून परशरामानें एक पुस्तक काढलें व तें दूर फेंकून दिलें. हें पाहातांच परशरामावर चोरांनीं झडप घालून झोळींतील सर्व पोथ्या लांबविल्या. अशी नागवणूक झाल्यावर कवीश्वर कसेबसे कोंकणांत उतरले. मग कांहीं काळानें राजक शमलें. देश सुभिक्ष झाला. तेव्हां ते माघारी गंगातीरीं राहावयास आले.

रामदेवराव शक १२३१ त मरून शंकरदेव राजा झाला. त्यानें दिल्लीस खंडणी पाठविण्याचें बंद केल्यामुळें अलाउद्दिनानें मलिककाफर यास शक

१२३४ त (इ. स. १३१२) पुनः त्याजवर दाक्षिणेंत धाडलें. त्यानें शंकरदेवास ठार करून त्याचा मुलुख लुटला व देवागिरीस ठाणें दिलें.

अल्लाउद्दिनाच्या उत्तर काळांत मलिककाफरानें त्याजवर आपलें बसविलेलें जबरदस्त वजन डोळ्यावर येऊन अल्लाउद्दिनाच्या उमरावांनीं त्याजविरुद्ध बंड केलें. दरम्यान अल्लाउद्दिन मरून त्याचा तिसरा पुत्र मुबारिक गादीवर बसला. ही घडामोड आपल्यावरील मुसलमानांची सत्ता झुगारून देण्यास अनुकूल वाटून रामचंद्रदेवाचा जांवई हरपालदेव यानें मुसलमानांच्या दक्षिणेंतील अधिकाऱ्यांना घालवून दिलें. तेव्हां शक १२४० त (इ. स. १३१८) मुबारिक बंड मोडण्यास स्वतः दाक्षिणेंत आला. त्यानें हरपालाच्या अंगाचें जिवंतपणीं कातडें सोलून काढलें. अशा रीतीनें त्याचा अंत झाला आणि देवागिरीचें राज्य कायमचें बुडालें.

देवगिरीचें हिंदूराज्य मुसलमानांनीं बुडविलें यापासून बरेंच शिकण्यासारखें आहे. रामचंद्रदेव मोठा शूर व विजेता होता. त्यानें कोंकण, तेलंगण, म्हैसूर, माळवा इत्यादि प्रांतांच्या राजांना जिंकलें, त्यावरून तो भोंवतालच्या हिंदू राजांहून श्रेष्ठ व प्रबल असल्याचें सिद्ध होतें. मुसलमानांशीं त्याची गांठ पडली नसती तर तो दिसला याहूनही अधिक मोठा सम्राट ठरला असता. परंतु त्याची गांठ स्वदेशीयांच्या सत्तेशीं न पडतां परकीय सत्तेशीं पडली व तिला परतवून लावण्याचें किंवा मोडून काढण्याचें बळ त्याच्या अंगीं आढळलें नाहीं. मुसल्मानांनंतर परकीय इंग्रजीसत्तेपुढें जशी हिंदु व मुसलमान या उभयतांचीं राज्यें भराभर ढांसळत चाललीं तोच प्रकार मुसल्मानांच्या पहिल्या आक्रमणाच्या वेळीं अनुभवास आला.

कदाचित् अल्लाउद्दिन प्रथम अकस्मात् आला तेव्हां रामदेवराव गाफिल असेल; पण अल्लाउद्दिन व त्याचा सेनापति मलिककाफर यांजबरोबर त्याचा व त्याचा पुत्र शंकरदेव यांचा संबंध कांहीं एकदांच आला नाहीं. शक १२१६ पासून शक १२३४ पर्यंत आठरा वर्षांत त्यांचे अनेकवार प्रसंग

घडले. खंडणी न भरून कांहीं प्रसंग पितापुत्रांनीं मुद्दाम ओढवूनहि घेतले. तें दिल्लीपतींना त्यांचें आव्हानच होतें. अर्थात त्यासाठीं त्यांनीं आपली तयारी चांगलीच ठेवली असेल. असें असतांहि एकाहि युद्धांत यादवांना जय मिळाला नाहीं. यावरून शरीरसामर्थ्य, शौर्य, धैर्य, धर्मावेश, युद्धशास्त्र, शस्त्रास्त्रें यांपैकीं सर्वांत किंवा कांहीं बाबतींत यादव फार कमी पडल्यामुळेंच त्यांचा पराभव झाला हें कबूल करावें लागतें. इतकेंच नव्हे तर अल्लाउद्दिन मेल्यावर मुबारिक आला तेव्हांहि हरपालदेव त्याजपुढें हरला. यावरूनहि त्याकाळीं सर्व-सामान्य मुसलमानाबरोबर सर्वसामान्य हिंदूंची तुलना केली असतां हिंदू युद्ध-नीतींत कमीच ठरतो. तथापि याचा अर्थ महाराष्ट्रीयांचें बलवर्धन व शिपाई-गिरी यांकडे लक्ष नव्हतें असें कोणीं समजूं नये. कारण त्या काळीं गांवोगांवीं तालमी असून त्यांत तरुण माणसें कुस्ती, मल्लखांब, दांडपट्टा इत्यादिकांचें शिक्षण घेऊन शरीरें कमावीत होतीं. युद्धकलेंतहि प्रगति होत असून उल्हाट-शक्ती नांवाचीं तोफेसारखीं आयुधेंहि वापरण्यांत येत असत.

## उपसंहार

यादव घराणें दक्षिणेंतील फार प्राचीन राजघराण्यांपैकीं होतें. राष्ट्रकूट व त्यानंतरचे कल्याणवासी चालुक्य यांच्या काळीं त्यांचे मांडलिक या नात्यानें ते वागत असत. शिलाहार राजांचा कोंकणांत व देशावरच्या कांहीं भागांत जो दर्जा, त्याहून वरिष्ठ प्रतीचा दर्जा यादवांचा सेऊण देशांत होता. राष्ट्रकूट, शिलाहार व चालुक्य या राजघराण्यांशीं त्यांचे शरीरसंबंध झाले होते. यावरून क्षत्रियवर्णांत ते कोणाहि दक्षिणेंतील राजघराण्या-पेक्षां उणे नव्हते. त्यांचीं कांहीं नांवें कानडी पद्धतीचीं आहेत व त्यांच्या पदरचे कित्येक सेनापतीहि कानडीच होते. याचा अर्थ देवगिरीचे यादव कर्नाटकांतून महाराष्ट्रांत आले असा नव्हे. ते राष्ट्रकूटांप्रमाणें अस्सल महाराष्ट्रीयच होते. दक्षिणेंत महाराष्ट्रीयांपेक्षां द्रविड देशांतील राजघराणीं पुष्कळ अधिक. त्यांच्याशीं यादवांची सोयरीक होत असल्यामुळें तिकडील पद्धतीच्या नांवांचा शिरकाव स्त्रियांमार्फत वा अन्यरीतीनें त्यांच्यांत

व्हावा हें स्वाभाविक होय. यादवाच्या राज्यांत महाराष्ट्रासह कर्नाटक व तैलंगण हाहि प्रदेश समाविष्ट होताच. म्हणून तिकडील अधिकारी महाराष्ट्रीयासारखेच सेवेंत शिरले व त्यामुळेंच हेमाद्रि, खोलेश्वर यांच्याबरोबरीनें बचणा, मल्लीशेट अशींहि नांवें अधिकारी वर्गात झळकूं लागलीं.

अधिकाऱ्यांप्रमाणेंच शास्त्रीपंडितांतहि मराठी, कानडी, तेलंगी व गुजराथी शास्त्रीपंडित येऊन त्याचा दरबार संमिश्र बनला. चालुक्य व राष्ट्रकूट राजांचे शिलालेख व ताम्रपट कानडीपेक्षां संस्कृतांत अधिक आहेत. पण यादवांच्या शिलालेखांत व ताम्रपटांत संस्कृत भाषेचें प्रमाण कमी पडत जाऊन मराठी व कानडी या भाषांचें प्रमाण वाढलें. मराठीला हा मान प्रथम यादवकाळांत मिळाला असेंहि म्हणण्यास हरकत नाहीं. याचा अर्थ असा कीं संस्कृत भाषा कमी वापरण्यांत येऊं लागली व प्राकृत भाषांचा दर्जा वाढून त्या संस्कृत भाषेचें व्यवहारांतील स्थान काबीज करीत चालल्या.

राष्ट्रकूट व चालुक्य यांजप्रमाणें यादवांच्या राजवटींतहि राज्यकारभाराचा व राज्यरक्षणाचा मुख्य बोजा क्षत्रियांवरच होता. सामंत, मांडलिक, सेनापति, मुलकी अधिकारी व सैनिक क्षत्रियच असत. क्षत्रियवर्ण सर्वत्र बाहुल्यानें आढळून येत असून आपली कामगिरी पार पाडण्यास समर्थ होता. एकंदर शासनसंस्थेंत ते अग्रेसर होते व त्यांच्या खालोखाल ब्राह्मणवर्ण दृष्टोत्पत्तीस येत होता. ब्राह्मणांचें आद्यकर्तव्य विद्यार्जन, विद्यादान व धर्मकार्य हें असलें तरी राज्य कारभारांत व सैन्यांतहि जेथें त्यांना घेणें अपरिहार्य असें तेथें ते घेतले जात. यादवांच्या मंत्रिमंडळांत ब्राह्मण विशेषत्वानें चमकत होते. भारद्वाज गोत्री कृष्ण व खोलेश्वर यांना सामंत व सेनापति नेमण्यांत आलें असून हेमाद्रि हा तर श्रीकरणाधिपच होता. विद्वत्ता, ग्रंथकर्तृत्व, दातृत्व व रसिकत्व यांहीं करून तो कीर्तिमान झाला. जसा काहीं स्वतंत्र राजाच असें त्याचें कर्तृत्व, दानशूरत्व व लोकसंग्रहाकत्व विराजलें. चतुर्वर्गचिंतामणी हा त्याचा मोठा ग्रंथ. वाग्भटावरील आयुर्वेद


गुजराथ
चौलुक्य राज्य
माळवा
नर्मदा नदी
एलिचपूर
नाशिक
खोलापूर
उमरावती
सिन्नर
पैठण
जुन्नर
मुंबई
पूणक
मोणदेश
गोदावरी नदी
शिरबळ
सातारा
वारंगळ
शिलाहार राज्य
पंढरपूर
मंगळवेढे
काकतीय राज्य
कोल्हापूर
कल्याण
कृष्णा नदी
वेंगुर्ले
वेलुग्राम
कुंतल देश
सौंदत्ती
गोवे
हनगल
कदंब राज्य
द्वारसमुद्र होयसळ
मद्रास
नोळंबवाडी
कावेरी नदी
तंजावर
मदुरा
चोलराज्य
सिंहलद्वीप
देवगिरीचे यादव
व
इतर राज्यें

रसायन व वैष्णव पंथाचा मुक्ताफळ हे ग्रंथ त्याच्या नांवावरच मोडतात. हेमाद्रि हा स्वतः ग्रंथ लिहीत होता व उत्तेजनानें इतरांकडूनहि ग्रंथ लिहवीत होता. बोपदेवाकडून हरिलीला व भागवताचें सार त्यानें लिहविलें. बोपदेवाचा पिता केशव हा वरदा नदीच्या कांठीं सार्थ नांवाच्या गांवीं रहात असे. म्हणजे बोपदेव हा विदर्भनिवासी. मुग्धबोध या व्याकरणावरील ग्रंथाचें कर्तृत्व त्याजकडेच जातें. वैद्यकावरहि त्याचीं कांहीं पुस्तकें आहेत. हेमाद्रीचें नांव महाराष्ट्रांत आजहि विशिष्ट घाटाच्या मंदिराचा व मोडीलिपीचा जनक म्हणून आबालवृद्धांना मशहूर आहे. चुना-माती न घालतां काटकोनत्रिकोणछेद पद्धतीनें भिंती व गाभारे रचणें यास हेमाडपंती घाट म्हणतात. मोडी लिपी त्यानें लंकेतून आणिली अशी प्रसिद्धि आहे. श्रीकरणाधिप या नात्यानें वसुली खात्याचें काम करूं लागल्यावर पत्रव्यवहारांत लिपीची अडचण भासल्यामुळें त्यानें मोडीलिपीस उत्तेजन व राजमान्यता मिळवून दिली असावी.

दादा नामक ब्राह्मणाच्या वंशांत यादवांचें मंत्रिपद व करिवाहिनीपद पिढ्यानुपिढ्या चालू होतें. त्याला प्रारंभ गोविंदराजापासून झाला व त्याचा शेवट यादवसत्तेबरोबरच झाला. दादा व त्यानंतर दादाचे पुत्र महीधर, जल्ह, साम्ब व गंगाधर हे यादवांपाशीं मंत्री किंवा मोठे अधिकारी होते. महीधराचा पुत्र अनंत व त्याचा भाऊ गंगाधर याचा पुत्र जनार्दन हे करिवाहिनीश असून त्यांचीच परंपरा पुढें जनार्दनसुत लक्ष्मदेव व लक्ष्मदेवसुत जल्हण यांनीं चालविली. जनार्दनानें तर हस्तिविद्या सिंघण राजालाच शिकविली. यावरून कित्येक ब्राह्मण घराण्यांत युद्धकर्म कसें परंपरेनें चालत होतें व युद्धकलेंत शास्त्रीय पद्धतीनें ते कसे निपुण होते हें दिसून येतें. जल्हण हा कृष्णराजाचा करिवाहिनीपति झाला व त्याच्या मागून महादेवाच्या कारकिर्दीत तें पद त्याचा पुत्र मुधगी याजकडे गेलें. मुधगीचा पुत्र अच्युत नायक यास महादेवानें उत्तर कोंकण

जिंकल्यावर त्याचा सामंत नेमलें व त्याच्या मृत्यूनंतर रामदेवरावाच्या कारकिर्दींत अच्युत त्याच जागेवर कायम झाला. हे सर्व मंत्री वेद व शास्त्रें यांत पारंगत होते ही तितकीच महत्वाची गोष्ट आहे. त्याचा अर्थ असा कीं, राजकारणांत पडल्यामुळें त्यांचें विद्येकडे दुर्लक्ष झालें नाहीं. हें मंत्री घराणें यादवांना साम्राज्यपद मिळण्याच्या आधींपासून यादवांच्या पदरीं होतें. या घराण्यानें यादवांची सेवा सुमारें दीडशें वर्षें सतत केली. त्यामुळें या घराण्यांत सत्ता, गर्भश्रीमंती, विद्वत्ता व श्रेष्ठ दर्जा तितकींच वर्षें नादून त्यांतील पुरुषांत रसिकता, सौंदर्यप्रीति व अभिजातपणा इत्यादि गुण उत्पन्न झाले. अशा स्थितींत बागबगीचे, इमारती व इतर उच्च प्रतीचीं कार्यें त्यांच्या हातून घडलीं. त्यांपैकीं जल्हण यानें एक उद्यान निर्मिलें असून त्यास पाणी पुरवण्याकरितां एक सुंदर व विस्तीर्ण तडाग बांधला. त्यांत नानाविध फळझाडें व फुलझाडें लावण्यात आलीं. त्यांच्या गारव्याला मयूरादि वैचित्र्यपूर्ण पक्षी राहावयास आले. त्या उद्यानाची थोरवी इतकी कीं, त्यांत वृक्षावर उकललेलीं डाळिंबें जणूं काय नंदनवनास तुच्छतेनें हंसत असत. तेथील तडागानें आपल्या विस्तीर्णपणानें सागरासहि लाजविलें. त्या उद्यानास उद्देशून सूक्तिमुक्तावलीकार वैद्य भानुपंडित म्हणतो,

यद्रचितोद्यानश्रीः परिपाकस्फुटितदाडिमव्याजात् ।
विहसत्यनेकरम्भाप्रकटितदशनेव नन्दनं विपिनम् ॥

यादव सम्राटांच्या पदरीं जसे अनेक गुणी विद्वान व कलावान जन असत तसे यादवांच्या सामंतांपाशींहि ठेवण्यांत येत. त्यांपैकींच वरील वैद्य भानुपंडित असून त्यास जल्हणानें आश्रय दिला होता. सर्व संस्कृत नाटकें, काव्यें हीं सर्वांना त्या काळीं मुद्रणकलेच्या अभावीं उपलब्ध नसत. ही अडचण लक्षांत घेऊन भानुपंडितानें नवनीताच्या धर्तीवर उत्कृष्ट ग्रंथकारांचे निवडक वेंचे घेऊन सूक्तिमुक्तावलीची रचना केली. वैद्य भानुपंडित हा स्वतःही वरिष्ठ दर्जाचा कवि होता.

यादवांच्या ताब्यांत मराठी, गुजराथी, कानडी, तेलंगी भाषा बोलणारे प्रांत होते. त्या त्या प्रांतांतील ब्राह्मणांना यादवांचा आश्रय मिळाला व दान करतांना ज्या ब्राह्मणांची विद्वत्तेवरून निवड करण्यांत येई ते ब्राह्मण प्रसंगानें सर्व प्रांतांतील असत. म्हणूनच बागेवाडीस इनाम मिळालेल्या बत्तीस ब्राह्मणांत कोंकणस्थ, देशस्थ, यजुर्वेदी व गुजराथी ब्राह्मण होते. वर नमूद केलेल्या प्रांतांशिवाय इतर प्रांतांतील ब्राह्मण दक्षिणेंत तुरळक येत. त्यांपैकीं दुसऱ्या चालुक्य घराण्यांतील विक्रमादित्याजवळचा कवि बिल्हण हा एक होय. तो काश्मिरी ब्राह्मण होता. यादवकाळीं भास्कर नामक ब्राह्मण असाच काश्मीरांतून आला. त्याचा पुत्र सोढल यादवराज्यांत श्रीकरणाधिपाच्या पदवीवर चढला. सोढलाचा पुत्र शृंगारधर यानें गायनशास्त्रावर 'संगीतरत्नाकर' नांवाचा ग्रंथ लिहिला. अशा रीतीनें विद्वत्ता, शिपाईगिरी, मुत्सद्दीपणा, ग्रंथकर्तृत्व इत्यादि निरनिराळ्या दिशांनीं ब्राह्मण पुढें येत होते.

यादवांच्या काळांत श्रीज्ञानेश्वरी ही श्रीमद्भगवद्गीतेवरील टीका भावार्थ दीपिका या नांवानें प्रवरातीरीं नेवासें गांवीं एका देवालयांत बसून ज्ञानदेवांनीं रचिली. यादवांची राजधानी व हेमाद्रीचें निवासस्थान जी देवगिरी, तिजपासून नेवासें सुमारें पंधरा कोस आहे. आपल्या ग्रंथांत ज्ञानेश्वरांनीं रामदेवरावाचा 'सकळकळानिवास, यदुवंशविलास, न्यायातें पोषणारा क्षितीश' इत्यादि विशेषणांनीं गौरवपूर्वक उल्लेख केला आहे.

वरील विवरणांतून प्रमेय निघतें तें असें कीं, यादवकाळ—विशेषत: रामचंद्ररायाचा काळ—हा आधुनिक महाराष्ट्राच्या स्थापनेचा काळ होय. यांत मराठी भाषा, संस्कृति व परंपरा यांचा उदय झाला. देवगिरी ही नगरी, दुसऱ्या चालुक्यांचें कल्याण, राष्ट्रकूटांचें मालखेड व पहिल्या चालुक्यांची बदामी याजपासून पुष्कळच उत्तरेला आहे. द्रविड देशाची मर्यादा तुंगभद्रा व आर्यावर्ताची मर्यादा नर्मदा यांच्या मध्यावर देवगिरी

असल्यामुळें आर्यभाषा व आर्यसंस्कृति आणि द्राविडी भाषा व द्राविडी संस्कृति यांचा संगम तेथें समप्रमाणांत झाला. महाराष्ट्राच्या उत्तरेस पश्चिम समुद्रापासून तों पूर्वेस नागपुरापर्यंत संस्कृतोद्भव अशी गुजराथी व हिंदी या दोन भाषांची तरफ लागली आहे. त्या भाषा थेट संस्कृतापासून उत्पन्न न होतां संस्कृताच्या अलीकडच्या ज्या प्राकृत भाषा, त्यांपासून उद्भवल्या आहेत. उत्तरेकडून गुजराथ, माळवा, जबलपूर या प्रदेशांतून शेती, व्यापार, राज्यकारभार व धर्मप्रसार या निमित्तानें असंख्य माणसें सावकाश महाराष्ट्रांत उतरलीं व त्यांचीच संमिश्र बोली महाराष्ट्रांत कांहीं फरकानें फैलावली. तीच महाराष्ट्रीय भाषा—तिच्यांतच दक्षिणेकडून येऊन अंमल चालविणारे चालुक्य व राष्ट्रकूट राजे आणि त्यांचे कारभारी, मंत्री, सेनापति, पंडित यांच्या बोलींची भर पडून सध्यांच्या मराठी भाषेचा पाया घालण्यांत आला. या घडामोडीची पुढील तयारी देवगिरीस होऊन तिला हेमाद्रि, बोपदेव प्रभृति कार्यकर्ते, अधिकारी, ग्रंथकार व पंडित कारण झाले. त्यांचे ग्रंथ संस्कृतांत असले तरी त्यांची बोली प्राकृत भाषा व द्राविडी भाषा यांच्या संमिश्रणानें बनलेली मराठी हीच होती. ती इतकी कीं राज्यकारभारांतहि तिचा प्रवेश टाळणें अपरिहार्य झाल्यामुळें सरकारी दप्तराकरितां हेमाद्रीस मोडी ही नवी सुकर लिपी बनवावी लागली.

देशोदेशींचे देवगिरीस राहावयास आलेले पंडित व महाराष्ट्रांत गांवोगांवी उत्पन्नें देऊन स्थापन केलेले पंडित यांची घरची बोली कानडी, तामीळ, तेलंगी, गुजराथी अगर काश्मिरी यांऐवजीं क्रमाक्रमानें मराठी बनल्यावर त्यांच्या बायकामुलांचें व त्यांचें सदर भाषेवर प्रेम जडून तिच्यांतील व्यवहार वाढविणें त्यांना जरूरीचें वाटूं लागलें. म्हणूनच यादवकाळांतील कांहीं ताम्रपट कानडीप्रमाणें मराठींतहि आहेत. अशा रीतीनें मराठीला राजमान्यता व त्यानंतर विद्वन्मान्यता मिळत चालली. तथापि पंडितांनीं स्वतः मराठींतून ग्रंथरचना केली नसली

तरी यादवकाळीं ग्रंथरचना करण्याइतकी मराठी प्रगल्भ झाली होती यांत शंका नाहीं. अखिल भरतखंडांत आपली कीर्ति व्हावी, आपला ग्रंथ वाचला जावा व विद्वानांत आपला मान राहावा या हेतूनें, संस्कृत भाषेच्या अभिमानानें व मराठीविषयीं वाटणाऱ्या हीनत्वानें पंडितांचे ग्रंथ जरी संस्कृतांत रचले गेले तरी वरिष्ठ वर्णांत ज्यांना पतितत्वामुळें मान राहिला नाहीं पण प्राकृत जनांत मात्र असाधारण मान मिळूं लागला, अशीं जीं ज्ञानेश्वरादि भावंडें व महानुभावपंथीय संत त्यांना प्राकृत जनांना समजण्याकरितां मराठी ग्रंथरचना हा एकच मार्ग शिल्लक राहिल्यामुळें मराठीला ग्रांथिक भाषेचा मान यादवकालापासून लाभला.

यादवांना शक ११०० पासून म्हणजे चवथ्या भिल्लमाच्या कारकिर्दींत साम्राज्यप्राप्ति झाली. त्यांचें साम्राज्य खऱ्या अर्थानें शक १२१६ (इ.स. १२९४) पर्यंत चाललें. त्यावर्षी रामदेवरावाला अल्लाउद्दिनानें जिंकल्यापासून यादवांचें स्वातंत्र्य नष्ट झालें. त्यापुढें शक १२४० (इ.स. १३१८) पावेतों सुमारें बावीस वर्षे अपमानास्पद स्थितींत ते राज्य रखडून राहिले. म्हणजे, यादवांच्या साम्राज्याला सव्वाशें वर्षांचीहि हयात लाभली नाहीं. याचें कारण यादवांत कर्तबगार व पराक्रमी पुरुषांची परंपरा संपली हें नव्हे. त्यांचा शेवटचा राजा रामचंद्रदेव हा यादव घराण्यांतील पहिल्या प्रतीच्या सम्राटांपैकींच होता. तरी तो साम्राज्य गमावून बसला. त्याचा मुसलमानांशीं युद्धप्रसंग आला नसता तर यादव साम्राज्य आणखी कित्येक वर्षे सहज टिकलें असतें, असें रामचंद्रदेवाचा पुत्र शंकरदेव व जांवई हरपालदेव यांच्या चिकाटीवरून म्हणतां येतें. चौथ्या भिल्लमापासून रामदेवरावापर्यंतचे सर्वच राजे आपआपल्या परीनें लायक होते. यादवांनीं त्रिकलिंग तथा आन्ध्र, माळवा, गुजराथ, दक्षिण महाराष्ट्र, चोल, कोंकण, कर्नाटक, लाट येथील राजांना जिंकलें. अर्थात् चालुक्य व राष्ट्रकूट यांच्या इतकी त्यांजकडून मुलुखगिरी

झाली नाहीं. माळव्याच्या पलीकडे उत्तरेंत मुसलमान हा नवा प्रबल शत्रू असल्यामुळें यादवांनीं तितकी मजल मारली नसावी. कोकणचे राजे देशावरील राजसत्तेचे मांडलिक असत. तथापि वारंवार स्वतंत्र होण्याचा प्रयत्न करावा व त्यांना मध्यवर्ती सत्तेनें जिंकावें हा मागील राजघराण्यांतील शिरस्ता यादव कालांतहि बंद पडला नव्हता. पूर्वीच्या राजघराण्यांचें अधिष्ठान कर्नाटक असल्यानें कर्नाटक वेगळा जिंकण्याचा प्रश्न दोन्ही चालुक्य घराण्यांत उद्भवला नव्हता, तो महाराष्ट्रांतील देवगिरी नगरींतून राज्य करणाऱ्या यादवांच्या अमदानींत राष्ट्रकूटांनंतर पहिल्यानेंच उद्भवला, आणि कर्नाटक प्रांत हा होयसळ यादव व देवगिरीचे यादव यांजमध्यें वांटला गेला. दक्षिण महाराष्ट्रांत रट्ट व गोंवें प्रांतांत कदंब हीं यादवकाळीं मांडलिक घराणीं होतीं. राष्ट्रकूट चालुक्य यांच्या कारकिर्दींत शिलाहार राजघराणीं कोकण व कोल्हापूर येथें मांडलिकत्व पत्करून होतीं. तीं दोन्ही घराणीं व गोव्याचें कदंब घराणें हीं यादवांनीं कायमचीं बुडविलीं.

राष्ट्रकूट व चालुक्य यांजप्रमाणें यादव राजेहि सनातन धर्माचे अभिमानी व यज्ञयाग करणारे होते. त्यांची नीतिमत्ताहि श्रेष्ठ प्रतीची होती. आर्यपरंपरेप्रमाणें स्त्रियांशीं पुरुषांनीं लढणें अधार्मिक समजलें जातें, म्हणून यादवांनीं तेलंगणाचें राज्य बुडवितां येण्यासारखें असतां त्याची स्वामिनी स्त्री असल्याचें कळल्यावर तिच्या वाटेस न जाण्याचें ठरविलें म्हणतात. ब्राह्मणानीं आपल्या श्रेष्ठ धर्माप्रमाणें वागावें यावर यादव राजांचा विशेष कटाक्ष होता. पैठणाजवळचीं तीन खेडीं ब्राह्मणांना रामदेवरावानें शक ११९१ त दान केलीं. त्याच सालीं रामदेवरावास राज्याभिषेक झाला. सबब वरील दान राज्याभिषेक समारंभास अनुलक्षून असावें. त्यांतील अटी रामदेवरावानें ब्राह्मण मंत्री व पुरोहित यांच्या सल्ल्यानेंच घातल्या असल्या पाहिजेत. त्या फार विचारपूर्वक घातल्या आहेत. ब्राह्मणांनीं वंशपरंपरेनें त्या गांवीं राहावें, आपल्या जमिनी गहाण ठेवूं नयेत, आपल्य गांवीं वेश्यांची वस्ती होऊं देऊं नये,

जुगारीस प्रतिबंध असावा, ब्राह्मणांनीं शस्त्रें वापरूं नयेत व आपला काळ सत्कर्मांत घालवावा. या अटी ब्राह्मण निर्व्यसनी, मितव्ययी, सात्विक आणि स्वधर्म व स्वविद्या रक्षून राहावे अशा उद्देशानें स्पष्टपणें घातलेल्या दिसतात.

---

# प्रकरण दहावें

## शिलाहार राजघराणें

### ( दक्षिण कोंकण )

### ( इ.स. ७६५ ते १०२० )

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील अनेक प्रांतांपैकीं कोंकण हा एक प्रांत आहे. कोंकणाचें फार प्राचीन नांव अपरान्त. अपरान्ताचा उल्लेख रामायण व महाभारत या ग्रंथांत सांपडतो. महाकवि कालिदास आपल्या काव्यांत कोंकणाला अपरान्त म्हणतो. कौटिल्याच्या अर्थशास्त्रांत वनवासीच्या उत्तरेस व सुरतेच्या दक्षिणेस असलेल्या देशास अपरान्त म्हटलें आहे. कोंकण शब्द पांचव्या शतकांतील वात्सायनाच्या कामसूत्रांत आला आहे, तसाच वराहमिहिरानेंहि शक ४२७ मधील बृहत्संहितेंत त्याचा निर्देश केला आहे. हें एकच कोंकण नसून अशीं सात कोंकणें सह्याद्रि खंडांत सांगितलीं आहेत. त्यांचीं नावें केरळ, तुलुंभ, गोराष्ट्र, कोंकण, केरठ, वरलाट व बर्बेरा अशीं आहेत. कोंकणांतील प्रसिद्ध प्राचीन नगर शूर्पारक हें व तसेंच सुराष्ट्र, दंडक, केरळ व वनवासी सहदेवानें घेतल्याचें वर्णन महाभारताच्या सभापर्वांत आहे. इ.स.च्या पहिल्या शतकांतील एका ग्रीक ग्रंथकाराच्या पुस्तकांत भडोच, चौल, वैजयन्ती व सोपारें हीं गांवें निर्देशिलीं आहेत.

हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याचा व्यापार ग्रीस, रोम, मिसर ( इजिप्त ) यांजबरोबर फार प्राचीन काळापासून चालत आला आहे. हिंदुस्थानचा

व्यापार बाबिलोन बरोबर असल्याचें जुन्या करारांत नमूद आहे. ख्रि. पू. ६ व्या शतकापासून बाबिलोन व इतर पश्चिमेकडील देश यांजबरोबर हिंदुस्थानचें व्यापारी दळणवळण होतें हें बौद्ध जातकांना मान्य आहे. दक्षिण हिंदुस्थानांत रोमन नाणीं सांपडलीं आहेत त्यावरून ऑगस्टस ते नेरोच्या काळापर्यंत रोम व हिंदुस्थान यांजमध्यें मोठा व्यापार चालत असल्याचें सिद्ध होतें. अर्थात् त्या व्यापाराचा कांहीं भाग विद्यमान कोंकणाच्या वांट्यास आला असलाच पाहिजे. कोंकणावरील राज्यांत सर्वांत जुनें राज्य अशोकीय मौर्यांचें. त्यांच्या मागून शातवाहन, क्षत्रप, अभीर, त्रिकूटक व दुसरे मौर्य यांचीं राज्यें झालीं.

वनवासीचे कदंब हें फार जुनें घराणें. त्यांच्या राजवटीला सुरुवात इ. स. ३०४ पासून होऊन त्यांचें राज्य बहुतेक सर्व कर्नाटकावर थेट पश्चिम समुद्रापर्यंत विस्तारलें होतें. बदामीकर चालुक्य राज्याच्या प्रारंभीं चालुक्यांना कदंबांशीं झगडून आपली सत्ता वाढवावी लागली. दुसरा पुलकेशी चालुक्य याच्या कारकिर्दीत पश्चिम समुद्राचा दक्षिणेकडील किनारा कदंबांच्या ताब्यांत होता व त्याला लागून उत्तरेस मौर्यांचें राज्य होतें. कदंब व मौर्य या दोघांवरहि चालुक्यांनीं वारंवार स्वाऱ्या करून त्यांना जिंकलें व पुलकेशीनें दक्षिण कोंकणांत आपला पुत्र चंद्रादित्य यास सामंत नेमलें. हाच चंद्रादित्य तेथें राजाप्रमाणें नांदूं लागला. त्याची नेमणूक कोंकणांत इ. स. ६३० च्या सुमारास झाली. त्यानें चन्द्रपूर ही आपली राजधानी केली. चन्द्रपूर हेंच गोमांतकांतील सध्याचें चांदोर. राष्ट्रकूटकाळीं कृष्णराज पहिला यानें इ. स. ७६५ च्या सुमारास दक्षिण कोंकण शिलाहारांच्या ताब्यांत दिलें. शिलाहारांनीं आपली राजधानी गोमांतकांतच बलीपट्टण येथें केली. त्यावेळीं चंद्रपुरास चालुक्यांचें लहानसें राज्य अवशिष्ट होतें. दक्षिण कोंकणावर शिलाहारांची स्थापना झाली तेव्हां गोमांतक, कानडा इत्यादि समुद्रकांठच्या प्रदेशांवर राष्ट्रकूटांचें अधिराज्य असून कदंबसत्ता

लुप्तप्राय झाली होती. त्या कारणानें गोमांतकावर प्रत्यक्ष अंमल चन्द्रपूरचे चालुक्य व वलीपट्टणचे शिलाहार या उभयतांचा होता. अर्थात् उदयोन्मुख शिलाहार व पराजित चालुक्य असा या उभयतांचा संबंध होता.

शिलाहारांना बऱ्याच ताम्रपटांतून शिलार, सिलार, शियलार, सेलारहि म्हटलें आहे. महाराष्ट्रांत शेलार आडनांवाचे मराठे सांप्रत आहेत व देहूजवळचें शेलारवाडी हें गांव स्टेशनामुळें प्रसिद्ध आहे. या आधारानें सध्याचे शेलार व जुने शिलाहार वा शिलार एकच दिसतात. शिलाहारांचीं सह्याद्रीचा पूर्व व पश्चिम भाग यांत तीन तरी भिन्न घराणीं वेगवेगळीं राज्यें करीत होतीं. एकाच घराण्यांतून तीं भिन्न काळीं फुटून निघून त्यांनीं पृथक् राज्यें स्थापलीं असावीं. तीं सर्व जीमूतकेतूचा पुत्र जीमूतवाहन यास आपला मूळ पुरुष समजतात. जीमूतकेतू हा विद्याधरांचा राजा होता. तगरपुराधीश्वर अशी पदवी कोल्हापूर व उत्तर कोंकण येथील शिलाहार लावतात. तगरपूर म्हणजे बार्शीजवळचें तेरढोकें गांव. प्रसिद्ध साधु गोरा कुंभार या तेरढोक्यांतच पुढें होऊन गेला. कोंकण व मावळ यात राज्य करण्यास जाण्यापूर्वी शिलाहार एक वेळ तगरपुरास राहात असावे व ते तगरपूरचे अधिपतिहि असावे. राष्ट्रकूट राजे प्रथम लटलूर ऊर्फ लातूर येथील अधिकारी होते. लातूर व तेरढोकें यांजमधील अंतर फार नाहीं. राष्ट्रकूटांच्या काळींच शिलाहारांची सत्ता महाराष्ट्राच्या पश्चिम भागांत स्थापन झाली, त्या अर्थी राष्ट्रकूट घराणें सम्राटपदीं चढल्यावर त्यानें आपल्या परिचयाच्या व विश्वासाच्या शिलाहार घराण्यास हात देऊन त्यास पश्चिम महाराष्ट्रांत आपल्यातर्फें महामंडलेश्वर नेमलें असावे. दाक्षिण कोंकणांतील शिलाहार राजा रट्ट यानें खारेपाटण येथील आपल्या ताम्रपटात आपला पूर्वज सणफुल्ल हा राष्ट्रकूट राजा पहिला कृष्ण याचा लाडका होता असें म्हटलें आहे, त्यावरून वरील अनुमानास बळकटी येते.

रट्ट राजानें खारेपाटण ताम्रपटांत आपल्या घराण्याचें पूर्ववृत्त सांगितलें आहे. त्यांत आपलें घराणें सिंहलद्वीपांतील राज्यकर्त्यांत प्रमुख असल्याचें प्रतिपादिलें आहे. तगरपुरास येण्यापूर्वी शिलाहार कदाचित् सिंहलद्वीपांत राज्य करीत असतील; कारण दक्षिणेंतील अनेक राजघराण्याचा दाट संबंध सिंहलद्वीपाशीं होता.

शिलाहार, शिलार, सिलार, शियलार, सेलार इतक्या पांच नांवांपैकीं शिलाहार हें नांव संस्कृत आहे. तें कसें पडलें याची आख्यायिका पुढीलप्रमाणें आहे. शिलाहारांचा पूर्वज जीमूतवाहन एके दिवशीं फिरत असतां त्याला एका टेंकडीवर हाडांचा मोठा ढीग दिसला. चौकशी करतां असें समजलें कीं तो ढीग सापांच्या हाडांचा आहे. गरुड व साप यांजमधील कराराप्रमाणें साप आपणांपैकीं एकाला दररोज गरुडाकडे पाठवून देत. तो साप टेंकडीवरील नियोजित शिलेवर बसे. गरुड तेथें येऊन त्यावर झडप घालून त्यास खात असे व उरलेलीं हाडें तेथें फेंकीत असे. जीमूतवाहन चौकशी करीत असतां शंखचूड नावाचा साप गरुडाच्या भक्षस्थानीं पडण्यासाठीं आला; त्याजबरोबर त्याची आई त्यास निरोप देण्यास आली होती. दोघेंहि मोठ्यानें रडत होतीं. जीमूतवाहनास त्यांची फार दया येऊन तो शंखचूडाकरितां मरण्यास तयार झाला. शंखचूड नको म्हणत असतांहि तो शिलेवर बसला व गरुडानें झडप घालून त्यास मटकावलें. शंखचूडानें जीमूतवाहनाविषयीं गरुडास खरी हकीकत सांगितली, तेव्हां त्यास फार पश्चात्ताप झाला. इतक्यांत तेथें शोध करीत जीमूतवाहनाचे आईबाप व भार्या हीं आलीं. भार्या मलयवती हिनें पतीला उठविण्यासाठीं गौरीची प्रार्थना केली. व गौरीनें प्रसन्न होऊन अमृतवृष्टीनें जीमूतवाहनास जिवंत केलें. दुसऱ्याचा जीव वांचविण्याकरितां ज्यानें वध्यशिलेवर बसून स्वतःस गरुडाचा आहार बनूं दिलें त्याचे आपण वंशज म्हणून शिलाहार हें नांव शिलाहारवंशज राजांनीं

धारण केलें. यामुळेंच कीं काय, तिन्ही शिलाहार घराण्यांचे ध्वज गरुड-चिन्हांकित असत.

खारेपाटणच्या ताम्रपटांतील रट्टराज हा दक्षिण कोंकणामधील शिलाहार राजांचा शेवटचा पुरुष दिसतो. त्याच्यापूर्वी नऊ पिढ्या होऊन गेल्या होत्या. रट्टराजाचा वरील ताम्रपट शक ९३० सालचा आहे. तोच काय तो या घराण्याच्या इतिहासाचा आधार असून त्यावरच त्याची उभारणी करण्यांत आली आहे. ती अशी —

सणफुल्लानें राष्ट्रकूट राजा पहिला कृष्ण याच्या कारकिर्दींत कोंकणांत समुद्रापासून सह्याद्रीपर्यंतचा प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणिला. सणफुल्लाचा पुत्र धम्मयिर यानें वलीपट्टणाचा किल्ला बांधला. हें वलीपट्टण गोंव्याच्या उत्तरेस बंदर होतें. धम्मयिर याला ऐयपराज हा पुत्र झाला. त्याच्या राज्याभिषेकाचें वर्णन खारेपाटण—ताम्रपटात मुद्दाम करण्यांत आलें आहे. त्यानें चालुक्यांवर विजय मिळवून चन्द्रपुरापाशीं नारळाच्या पाण्यानें अभिषेक करून घेतला. ऐयपराजाचा पुत्र अवसर पहिला शूर व राजनीति-विशारद निपजला. ऐयपराजामागून तोच गादीवर बसला. पण त्याच्या कारकिर्दींत संस्मरणीय असें कांहीं घडलें नाहीं.

अवसराचा पुत्र आदित्यवर्मा यानें चेमुल्य व चन्द्रपूर येथील राजांना मदत केली. यावेळीं उत्तर कोंकणावर दुसरा कपर्दी शिलाहार हा राज्य करीत होता. त्याचें आक्रमण आपल्या राज्यावर होऊं नये म्हणून आदित्य-वर्म्यानें उभयतांच्या सीमेवरील चेमुल्य येथील संस्थानिकास मदत केली असली पाहिजे. तोच हेतु चन्द्रपूरच्या चालुक्यांना सहाय्य करण्यांतहि त्याचा असावा. कारण तेथील चालुक्य सत्तेस आतां कदंबांकडून उपद्रव होऊं लागला होता. ही चालुक्यसत्ता जर बुडाली असती तर कदंबांपासून शिला-हारांनाही भय उत्पन्न झालें असतें. अखेर तसेंच घडलें. आदित्यवर्म्यामागून त्याचा पुत्र अवसर दुसरा गादीवर आला. तेव्हांहि उत्तर शिलाहारांविरुद्ध

चेमुल्याच्या राजाला व कदंबांविरुद्ध चन्द्रपूरच्या चालुक्यांना मदत देणें अवसरासहि भाग पडलें. पण चालुक्यांच्या बाबतींत अवसराला यश आलेलें दिसत नाहीं. कारण या युद्धांत चालुक्यराज्य बुडवून कंटकाचार्य कदंब यानें कदंब सत्ता स्थापन केली. या सुमारास गोमांतकाचा तिसवाडी व बारदेश हा प्रदेश अवसराच्या ताब्यांत होता आणि चन्द्रपुराभोंवतालच्या प्रदेशावर कंटकाचार्य ऊर्फ षष्ठदेव आपली सत्ता गाजवीत होता. अवसराच्या मदतीनें चेमूल्य तात्पुरतें बचावलें तरी अवसराच्या पश्चात् उत्तर शिलाहार झंझ यानें चेमूल्य जिंकून आपली सीमा दक्षिण शिलाहारांच्या राज्यास भिडविली. अवसरामागून त्याचा पुत्र भीम, भीमानंतर त्याचा पुत्र तिसरा अवसर व तिसऱ्या अवसरामागून रट्टराज गादीवर आला. तो या घराण्यांतील, आज मिळत असलेल्या माहितीप्रमाणें, शेवटचा राजा होय. त्याच्या वेळीं कदंबांनीं दक्षिण कोंकण व त्याचा गोंवें भाग शिलाहारांपासून जिंकून घेतला.

वरील राजांचे काळ डॉ. अळतेकर यांनीं तर्कानें बसविले असून त्यास त्यांनीं रट्टराजानें आपला ताम्रपट शक ९३० म्हणजे सन १००८त दिला, त्याचा आधार घेतला आहे. त्यांच्या हिशेबाप्रमाणें सणफुल्लाचा काळ इ. स. ७६५ ते ७९५ ठरतो. सणफुल्ल हा राष्ट्रकूट राजा पहिला कृष्ण याचा लाडका होता, असें खारेपाटण येथील ताम्रपटांत म्हटलें असून कृष्णराज इ. स. ७५८ ते ७७० पर्यंत दक्षिणेंत आपलें साम्राज्य वाढवीत होता.

रट्टराज हा आपणास शिलाहाराऐवजीं शिलार म्हणवितो. त्याच्या वेळीं कल्याणच्या चालुक्य राजांपैकीं सत्याश्रय गादीवर होता. त्या सत्याश्रयदेवाचें आपण चिंतन करीत असल्याचें रट्टराज लिहितो. अर्थात् तो चालुक्यांचा मांडलिक होता. त्यानें शक ९३० मध्यें ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस अव्वेश्वर देवाकरितां दान दिलें. तें दानपत्र ऐतिहासिक महत्त्वाचें आहे. या दानांतून अव्वेश्वर देवाची पंचोपचार पूजा करावी, देऊळ दुरुस्त स्थितींत ठेवावें,

देवळांत राहाणाऱ्या संन्याशांना वस्त्रें द्यावीं आणि विद्याभ्यासास असलेल्या विद्यार्थ्यांचा व अभ्यागतांचा परामर्श घ्यावा. ही सर्व व्यवस्था विद्वान् उपाध्याय अत्रेय यांनीं ठेवावी. त्यासाठीं कुष्माण्डी, आसनवीर, वाड्डगुळ व देवलक्ष्मी हीं गांवें देण्यांत आलीं. या गांवांशिवाय इतर कांहीं हक्क अत्रेय ब्राह्मणास मिळाले. त्यानें परदेशाहून येणाऱ्या प्रत्येक जहाजापासून गद्यान नांवाचें एक सोन्याचें नाणें कर घ्यावा. चेमुल्य व चन्द्रपूरखेरीज करून स्वदेशांतील बंदरांतून जीं जहाजें येतील त्यांजपासून धरण नांवाची सुवर्ण मुद्रा कर वसूल करावा. या करांतून चेमुल्य व चन्द्रपूर हीं दोन बंदरें वगळलीं आहेत. याचें कारण तीं बंदरें शिलाहारांच्या मित्रांचीं असावीं हेंच दिसतें.

अत्रेय ब्राह्मणास आणखी एक हक्क प्राप्त झाला तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. त्यानें अव्वेश्वराचें देऊळ व त्यांतील राहिवासी यांची सर्व बरदास्त राखावयाची म्हणतांच कितीतरी कामें डोळ्यांसमोर येतात. देवालयांतील झाड-लोटीचें काम दासीजनांनीं करावें; देवापुढें तेल-वात व नंदादीप एका तेल्याच्या कुटुंबानें ठेवावा; माळ्याच्या कुटुंबानें तुळशी, बेल, फुलें पुरवावीं; कुंभाराच्या कुटुंबानें मातीचे कुंभ व पणत्या द्याव्या आणि धोब्यानें कपडे धुवावे. एकंदरींत रट्टराजानें अव्वेश्वराचें एक व्यवस्थित देवस्थान स्थापन केलें व सदर देवस्थान कोंकणपट्टींत समुद्रकिनाऱ्यापाशीं असावें.

या घराण्याच्या ताब्यांत कोंकण नऊशें म्हणजे हल्लींच्या गोंवें प्रांताचा कांहीं भाग, सावंतवाडी संस्थान व रत्नागिरी जिल्हा असावा. रट्टराजानंतर कांहीं वर्षांनीं दक्षिण-शिलाहारांची सत्ता संपुष्टांत येऊन उत्तर कोंकणचा राजा अरिकेसरी शक ९३९ (इ. स. १०१७) मध्यें दक्षिण कोंकणावर राज्य करूं लागला. दक्षिण शिलाहारांची राजधानी वलीपट्टण ही असावी.

---

# प्रकरण अकरावें

## शिलाहार घराणें

### ( उत्तर कोंकण )

### ( इ. स. ८२५–१२६५ )

दक्षिण शिलाहारांहून कमी प्राचीन घराणें उत्तर कोंकणाचें. या शिलाहारांनींहि आपणास 'तगरपुरपरमेश्वर' ही पदवी वंशपरंपरा घेतली होती. त्यांचा सुवर्णगरुड-ध्वज होता. त्यांचा वंशवेल येणेंप्रमाणें (यांत त्यांच्या कारकिर्दींचीं जीं वर्षें येथें दिलीं आहेत, तीं अंदाजीं आहेत).—पहिला कपर्दी ( इ. स. ८२५–८५० ), पुल्लशक्ति ( ८५०–८७५ ), दुसरा कपर्दी ( ८७५–९०० ), वप्पुवन ( ९००–९३० ), झंझ ( ९३०–९५० ), गोग्गी ( ९५०–९६० ), पहिला वज्जड ( ९६०–९७५ ), अपराजित मृगांक ( ९७५–१०१० ). दुसरा वज्जड ( इ. स. १०१०–१०१५ ), अरिकेसरी ऊर्फ केशिदेव (१०१५–१०२५), छित्तराज (१०२५-१०४०), नागार्जुन मुंमुणी (१०४०–१०७०), अनंतदेव किंवा अनंतपाल (१०७०–१११० ), अपरादित्य ऊर्फ अपरार्क पहिला ( १११०–११४० ), हरपालदेव ( ११४०–११५५ ), मल्लिकार्जुन ( ११५५–११७० ), अपरादित्य ऊर्फ अपरार्क दुसरा ( ११७०–११९५ ), केशिराज (११९५–१२४०), सोमेश्वर ( १२४०–१२६५ ).

वरील राजांपैकीं कांहीं राजांची माहिती तुरळक सांपडते. दक्षिण कोंकणच्या शिलाहारांप्रमाणें हेंहि घराणें राष्ट्रकूटांचें मांडलिक होतें व अखेरपर्यंत त्यांच्याशीं राजनिष्ठ राहिलें. त्याचा आरंभ दक्षिण कोंकणच्या शिलाहारामागून सुमारें साठ वर्षांनीं व कोल्हापूरच्या शिलाहारापूर्वीं सुमारें सव्वाशें वर्षांनीं झाला. त्यांची स्थापना मौर्य राज्य बुडवून राष्ट्रकूटांनीं केली असावी. त्याचा संस्थापक कपर्दी हा पराक्रमी पुरुष निघाला. त्यानें बहुधा त्यावेळचा राष्ट्रकूट सम्राट् अमोघवर्ष पहिला याच्या साम्राज्यविस्तारास मदत केल्यावरून त्यानें त्यास उत्तर कोंकणाचा मांडलिक नेमलें असावें. त्या काळीं उत्तर कोंकणास

कपर्दिकाद्वीप किंवा कवडीद्वीप म्हणत असत. हें नांव त्यास कपर्दीच्या नांवावरून पडलें असल्यास नकळे. त्याच्या ताब्यांत वसई, मुंबई, कुलाबा, जंजिरा व रत्नागिरी जिल्ह्याचा उत्तर भाग होता. त्याच्या राज्यांत सुपारी, नारळ व आंबा यांचें उत्पन्न मोठें होतें. कपर्दीचा पुत्र महासामंत पुल्लशक्ति याचा कान्हेरीच्या लेण्यांत एक शिलालेख असून त्यांत तो आपणास कोंकणाचा अधिपति म्हणवितो. पुल्लशक्तीचा मंत्री विष्णु यानें कृष्णगिरी ऊर्फ कान्हेरी येथील बौद्ध भिक्षूंना लेण्यांची डागडुजी, त्यांचीं वस्त्रें व पुस्तकें यांकरितां देणगी दिली. त्यावरून कान्हेरीच्या लेण्यांत त्याच्या कारकिर्दींत बौद्धभिक्षू राहात असत. पुल्लशक्तीची राजधानी पुरी होती.

पुल्लशक्ति व कपर्दी दुसरा यांच्या वेळचे दोन लेख—एक इ. स. ८५३ चा व दुसरा ८७७ चा—कान्हेरी लेण्यांत आहेत. त्यास लघु कपर्दी असेंहि नांव दिलेलें कांहीं ताम्रपटांत आढळतें. तो लहानपणींच गादीवर आला असावा. त्याच्या कारकिर्दींत अमोघवर्ष पहिला हाच राष्ट्रकूट सम्राट होता. दुसऱ्या कपर्दीमागून त्याचा पुत्र वप्पुवन्न हा राजा झाला. व वप्पुवन्नानंतर गादीवर बसलेला त्याचा ज्येष्ठ पुत्र झंझ मोठा शिवभक्त निघाला. खारेपाटण येथील इ. स. १०९५ च्या ताम्रपटांत त्यानें शंकराचीं बारा देवालयें बांधल्याचें वर्णन आहे. झंझाची मुलगी लच्छियव्वा ही भिल्लम दुसरा यास दिली होती; व तिची आई राष्ट्रकूट घराण्यांतील होती. झंझाचा भाऊ गोग्गीराज याची कन्या श्रीनाथीयल्लदेवी ही भिल्लमाची पट्टराणी होती ( भिल्लम तिसरा याचा, शक ९७४ चा देवळाली ताम्रपट ). यावरून दुसऱ्या भिल्लमानें दोघां चुलत बहिणींशीं लग्नें केलीं असल्याचें दिसून येतें. झंझ इ.स.९५० च्या सुमारास मरण पावल्यावर त्याचा भाऊ गोग्गी याजकडे राज्याधिकार आला. गोग्गी हें गोविंद शब्दाचें लाडकें रूपांतर आहे. गोग्गीराज भीष्म-द्रोणाप्रमाणें शूर असल्याचें व त्यानें आपल्या घराण्याची कीर्ति वाढविल्याचें ताम्रपटांत वर्णिलें आहे. गोग्गीनंतरचा शिलाहार राजा पहिला

वज्जड याच्या कारकिर्दीत (इ. स. ९६०–९७५) राष्ट्रकूट साम्राज्य मोडून कल्याणच्या चालुक्य साम्राज्याची स्थापना झाली. पण वज्जड व त्याचा पुत्र अपराजित यांनीं राष्ट्रकूटांविरुद्ध झालेल्या उठावणींत सामील न होतां चालुक्यांचें अधिराज्य कबूल करण्याचें टाळलें.

वज्जडानंतरचा राजा अपराजित यानें शक ९१९ (इ. स. ९९७) मध्यें दिलेला एक ताम्रपट खारेपाटण येथें सांपडला आहे. त्यांत त्याला महासामंताधिपति व महामंडलेश्वर या पदव्या आहेत. तरीपण तो त्यांत स्वतःस चालुक्यांचा मांडलिक म्हणवून न घेतां राष्ट्रकूट साम्राज्य लयास गेल्याबद्दल दुःख प्रदर्शित करतो. यावरून असें दिसतें कीं अपराजितानें बराच काळपर्यंत चालुक्यांच्या अधिराज्यापुढें मान वांकविण्याचें नाकारलें असावें. खारेपाटण येथील इ. स १०९५ मधील अनंतदेवाच्या ताम्रपटांत अपराजित राजानें गोपराजास मदत केली, ऐयपदेव नामक राजास पुनः राज्य मिळवून दिलें व भिल्लमराजास अभय दिलें, असें लिहिलें आहे. त्यावरून चालुक्यांना न जुमानतां स्वतः सम्राट होण्याचें अपराजिताचें कारस्थान असावें. चालुक्य सम्राट दुसरा तैल (तैलप) इ. स. ९९७ त मरण पावला, तोंपर्यंत तरी अपराजितानें चालुक्यांचें अधिराज्य कबूल केलें नव्हतें. तैला-नंतर त्याचा पुत्र सत्याश्रय गादीवर आला. त्याजवर दक्षिण कोंकणचा रट्टराज याची भक्ति होती. अर्थात् तो सत्याश्रयाचा मांडलिक होता, यांत नवल नाहीं. त्याच सत्याश्रयानें अपराजितास शरण आणण्याकरितां त्याजवर स्वारी केली. तिच्यांत अपराजिताचा पराभव झाला असावा असें रण्ण नांवाच्या कानडी कवीनें आपल्या ग्रंथांत या स्वारीचें वर्णन केलें आहे त्यावरून वाटतें. तो लिहितो, 'सत्याश्रयानें कोंकणाधीश अपराजित याचा पराभव केला, तेव्हां तो समुद्राकडील राजधानी पुरी येथें पळून गेला. एकीकडून खरा समुद्र व दुसरीकडून सत्याश्रयाचा सेनासमुद्र यांच्या कचाटींत सांपडलेल्या अपरा-जिताची स्थिति दोन्ही टोकांनीं जळत असणाऱ्या काडीवरील किड्या-

प्रमाणें झाली.’ अपराजितानें एकवीस हत्तींची खंडणी देऊन त्याचें अधिराज्य कबूल केलें. ही गोष्ट इ. स. १००५ च्या सुमारास घडली असावी ( शिलाहारांचा इतिहास, ले. डॉ. अ. स. आळतेकर ). तिजवरून उत्तर-शिलाहारांची राजधानी यावेळींहि पुरी असल्याचें दिसून येतें.

अपराजितानें भिवंडी तालुक्यांतील भडाणें हा गांव एका ब्राह्मणास दिल्याचा ताम्रपट शक ९१९ ( इ. स. ९९७ ) मधील सांपडला आहे. त्या दानसमयीं अपराजिताचा मुक्काम स्थानक येथें होता. स्थानक ही अपराजिताची दुसरी राजधानी असावी. अपराजिताचे दोन ताम्रपट शक ९१५ मधील प्रसिद्ध झाले आहेत ( Important Inscriptions from the Baroda State, Vol. I, 1943 ), त्यांतहि पुरी हीच आपली राजधानी असल्याचें त्यानें नमूद केलें आहे. त्याखेरीज सदर ताम्रपटांवरून अपराजिताच्या राज्यविस्ताराचीहि कल्पना येते. त्यांत म्हटलें आहे त्याप्रमाणें त्याच्या राज्यांत संयानभूमि ( संजान ), पूणकदेश, चिपुलणविषय व संगमेश्वर असून त्याचें राज्य उत्तरेस लाट देशापासून दक्षिणेस चंद्रपुरापर्यंत पसरलें होतें. त्याशिवाय कोंकणास लागून देशावरचा मावळ वगैरे भागहि त्याच्या राज्यांत होता. कारण, सदर ताम्रपटाप्रमाणें त्याचें राज्य भिल्लमीय देशाला म्हणजे यादव राज्याला भिडलें होतें. पूणकदेश देशावर असल्यामुळें त्यासुद्धां मावळादि पश्चिम भाग अपराजिताच्या ताब्यांत होता. पुण्यांतील पाताळेश्वराचें लेणें शिलाहारांनीं जोगेश्वरी, मंडलेश्वर, घारापुरी येथील लेण्यांप्रमाणें खोदलें असावें या अनुमानास वरील ताम्रपटांतील मजकुरानें पुष्टि मिळते. अपराजिताचे आमण्णा, केशपार्य, संगलय्या, हे महामात्य, सिंहपय्या हा परराष्ट्रमंत्री व झंझ हा संधिविग्रह करणारा अमात्य होता.

सत्याश्रयानें केलेल्या वरील पराभवानंतर अपराजित लवकरच मरण पावला. अपराजितास वज्जड व अरिकेसरी असे दोन पुत्र होते. पैकीं वज्जड

हा इ. स. १०१० ते १०१५ पर्यंत राज्य करून कालवश झाला. वज्जड मेल्यावर त्याचा पुत्र छित्तराज अल्पवयी असल्यामुळे त्याचा चुलता अरिकेसरी राज्यकारभार पाहात होता व दानपत्रें देत होता. त्यानें दक्षिण कोंकणाचा कांहीं भाग आपल्या राज्यास जोडला. छित्तराज सज्ञान झाल्यावर त्यानें १०२५ च्या सुमारास राज्यकारभार स्वतःच्या हातीं घेतला. त्यानें आपणास महासामंताधिपति व महामंडलेश्वर अशा पदव्या लावल्या, त्या तो चालुक्यांचा मांडलिक असल्याचें दर्शवितात. त्यावेळीं छित्तराजाची राजधानी पुरी हीच असून तो ताम्रपटात आपल्या राज्याचें वर्णन ‘ पुरीप्रमुखचतुर्दशसतिसमन्वितसमस्तकोंकणभुवम् ’ असें करतो.

छित्तराज हा भिल्लम तिसरा ( यादव ) याचा समकालीन होता. छित्तराजाच्या ताम्रपटांतील गांवांकडे पाहातां त्याच्या ताब्यांत स्थानक, शूर्पारक व चेमुली हीं गावें होतीं. छित्तराजानें भांडूप येथील ताम्रपटांत ब्राह्मणांना दिलेलें शेत नौरा गावांत व सासष्टी प्रांतांत होतें. त्याच्या मंत्रिमडळांत श्रीकरण या हुद्याचा एक मंत्री होता. छित्तराजास आपला राज्यशकट फार संकटांतून हांकावा लागला. त्यावेळीं कल्याणचे चालुक्य आणि धारेचे परमार याचें हाडवैर माजलें असून त्यांच्या आपसांत वारंवार लढाया चालत. त्यांजमधील झगड्यांत आपण कोणाचा पक्ष घ्यावा हा शिलाहारांना पेंच पडला. अपराजितानें चालुक्यांचें अधिराज्य पूर्वीच कबूल केलें असल्यामुळें त्यांचा पक्ष धरण्याशिवाय छित्तराजास गत्यंतरच नव्हतें. त्या योगानें परमार राजा भोज याचा रोष छित्तराजास ओढवून घ्यावा लागला. त्या रागांत भोजानें इ. स. १०१९ त उत्तर कोंकणावर स्वारी करून त्यावर आपलें वर्चस्व बसविलें.

छित्तराजामागून त्याचा भाऊ मावणी किंवा मुंमुणी ( इ. स. १०४०—७० ) राज्यपदावर चढला. त्याच्या काळांत माळव्याचे परमार कांहीं दिवस कमजोर होऊन दक्षिणेकडील गोंवें प्रांतांतील कदंब बळावले. त्यांचा राजा

पाष्टिदेव दुसरा हा महत्वाकांक्षी व नाविक दळांत प्रबळ होता. परमारांच्या आक्रमणानें दुर्बल झालेलें शिलाहार राज्य बुडविण्यास त्याला ही संधि योग्य वाटली. म्हणून त्यानें उत्तर शिलाहारांनीं नवीन जिंकलेलें कोंकण नऊशें त्यांजपासून छिनावून घेतलें. पण तेवढ्यावर संतुष्ट न होतां त्यानें कपर्दिकाद्वीप म्हणजे उत्तर कोंकणहि जिंकीत आणलें असावें असें वाटतें. म्हणून मुंमुणीनें त्याच्याशीं तह करून व आपल्या मुलीचें लग्न ठाण्यास त्याजबरोबर थाटांत लावून कपर्दिकाद्वीपावरील आपलें राज्य राखलें.

छित्तराजानें अंबरनाथाचें प्रसिद्ध देवालय आपल्या कारकीर्दींत बांधलें होतें, तें मुंमुणीनें दुरुस्त केलें. छित्तराज व मुंमुणी हे दोघे भाऊ निपुत्रिक असावे. कारण मुंमुणी इ. स. १०७० च्या सुमारास मेल्यावर त्याचा तिसरा भाऊ नागार्जुन याचा पुत्र अनंतदेव किंवा अनंतपाल गादीवर बसला. त्याचा एक ताम्रपट रत्नागिरी जिल्ह्यांतील खारेपाटण येथें सांपडला असून तो शक १०१६ ( इ. स. १०९४ ) मधील आहे. त्यांत त्यास महासामंताधिपति, महामंडलेश्वराधिपति व पश्चिमसमुद्राधिपति म्हटलें आहे. कोंकण चौदाशेंमधील स्थानक ऊर्फ ठाणें, नागपुरा ऊर्फ नागांव, शूर्पारक ऊर्फ सोपारें व चेमुली ऊर्फ चेऊल इत्यादि बंदरांत येणाऱ्या गाड्यांना जकातीची माफी दिल्याचा मजकूर या ताम्रपटांत आहे. यावरून अनंतदेवाच्या कारकिर्दींत उत्तर कोंकणांतून कदंबसत्ता संपली असल्याचें सिद्ध होतें.

अनंतदेव मरण पावल्यावर त्याचा पुत्र अपरादित्य ऊर्फ अपरार्क पहिला ( ११,१०–४० ) गादीवर आल्यानंतर गोंव्याचा कदंबराजा जयकेशिन् दुसरा यानें अपरार्कावर स्वारी करून त्याचा पुरा मोड केला. त्यायोगानें उत्तर शिलाहारांचा बराच मुलुख कदंबांच्या ताब्यांत गेला. या काळांत अपरार्काची स्थिति फार कष्टप्रद झाली. त्याचे मंत्री शत्रूला मिळाले. बरेंच

सैन्य लढाईंत मेलें व खजिना रिता पडला. तरी त्यानें सैन्याची पुनः जुळवा-जुळव केली व आपल्या बाहुबळानें इ. स. ११२६ त जयकेशीचा पराभव करून कदंबांना कोंकणांतून घालवून दिलें. या कामीं त्यास कोल्हापुरच्या शिलाहारांचें चांगलेंच सहाय्य मिळालें. सन ११२६ सालीं त्यानें दिलेल्या ताम्रपटांत या विजयाचें रसभरित वर्णन आहे. या अपरादित्याचा अनंत पै प्रभु हा गौडसारस्वत ब्राह्मण मुख्य प्रधान असल्याचें ' सारस्वत ब्राह्मणांचा इतिहास ' या पुस्तकाचे कर्ते रा. रामचन्द्र नाहर मोहनी, वकील, गड-हिंग्लज, यांनीं म्हटलें असून त्याला आधार बाँबे रॉयल एशियाटिक सोसाय-टीचें वृत्त, पुस्तक १२, अंक ३४, पृष्ठ ३३४, याचा दिला आहे.

कदंबांचा पराभव केल्यावर अपरार्कानें आपलें आसन चांगलें स्थिर करून निरनिराळ्या राजदरबारीं आपले वकील पाठविले. काश्मीरांत सांपडलेल्या एका ग्रंथावरून अपरार्कराजाचा तेजकंठ नांवाचा वकील तेथील दरबारांतहि इ. स. ११३५ च्या सुमारास होता. दूरच्या काश्मीरांत जर त्यानें आपला वकील पाठविला होता तर जवळच्या राज्यांतहि त्याचे वकील असतीलच. याज्ञवल्क्य स्मृतीवर अपरार्काची टीका आहे; ती विद्याधरवंशीय जीमूतवाह-नाच्या कुळांत उत्पन्न झालेल्या शिलाहार अपरार्कानें लिहिली असें तिच्या शेवटीं म्हटलें आहे. तो आपरार्क हाच असला पाहिजे. अपरार्काच्या वकिलानें ही टीका आपल्याबरोबर काश्मीरांत नेली व तेथें ती लोकप्रिय झाली. काश्मी-रांत अद्यापिहि अपरार्कटीकेसच मानतात. अपरार्क हा शूर कर्तबगार व विद्वान् राजा इ. स. ११४० च्या सुमारास मरण पावला.

अपरार्कामागून हरपालदेव व हरपालदेवामागून मल्लिकार्जुन हे राजे झाले. हरपालदेवाचीं तीन दानपत्रें सन ११४९ । ११५० । ११५३ चीं टाणें जिल्ह्यांत सांपडलीं आहेत. हरपालदेव व अपरार्क यांचें नातें माहित नाहीं. मल्लिकार्जुन हा हरपालदेवाच्या महानंद नामक भावाचा पुत्र असावा. त्याचा काळ ११५५ ते ११७० पर्यंत धरला जातो. याच्या कारकिर्दींत गोंव्याच्या

कदंबांचें म्हैसूराकडील होयसळांशीं निकराचें युद्ध सुरू होतें. त्यामुळें मल्लिकार्जुनास दक्षिणेकडून भीति नव्हती. पण त्याच्या उत्तरेस गुजराथेंत चौलुक्य वंशाचा कुमारपाल नामें पराक्रमी राजा राज्य करीत होता. त्याचें व मल्लिकार्जुनाचें कांहीं क्षुल्लक कारणावरून बिनसलें व दोघांत युद्ध जुंपलें. या युद्धातील पहिल्या लढाईत मल्लिकार्जुनास विजय मिळाला. कुमारपालाचा सेनापती आंबड यास पळून जावें लागलें. पण कुमारपालाकडून त्यास अधिक मदत मिळाल्यावर आंबड लढाईस पुनः आला व तींत मल्लिकार्जुन मारला गेला. या पराभवानें शिलाहारांना कांहीं काळ गुजराथेच्या कुमारपालाचें मांडलिकत्व पत्करावें लागलें.

मल्लिकार्जुनामागून दुसरा अपरादित्य राजा झाला. त्याचें व मल्लिकार्जुनाचें परस्पर नातें समजत नाहीं. मुंबईच्या परेळ भागांत त्याचा इ. स. ११८७ मधील एक शिलालेख सांपडला आहे. त्यांत त्यास महाराजाधिराज व कोंकणचक्रवर्ती अशा पदव्या आहेत. यावरून गुजराथेच्या चौलुक्यांचें अधिराज्य कोंकणावर फार काळ टिकलें नाहीं असें दिसतें. अपरादित्यानें कुमारपालाचा पराभव केल्यावर वरील सम्राटपददर्शक पदव्या घेतल्या असाव्या.

अपरादित्यानंतर त्याचा पुत्र केशीराज ( इ. स. ११९५–१२४० ) यास गादी मिळाली. वसईजवळ त्याचे दोन शिलालेख इ. स. १२०३ व १२३८ मधील सांपडले आहेत. त्यावरून त्यानें बरींच वर्षें राज्य केलें असावें. केशीराज मरण पावल्यावर सोमेश्वराकडे ( इ. स. १२४०–१२६५ ) राज्यपद आलें. सोमेश्वर केशीराजाचा पुत्र असावा. त्याचीं इ. स. १२४९ व १२६० चीं दोन दानपत्रें सांपडलीं आहेत. सोमेश्वरानंतर कोणाहि शिलाहाराचा उल्लेख आढळत नाहीं. इ. स. १२७० च्या पुढील ठाण्याकडे जे शिलालेख मिळाले आहेत त्यावरून देवगिरीचे यादव राजे तेव्हां तिकडे राज्य करीत असलेले दिसतात. यादवांपैकीं महादेवानें कोंकणच्या सोम

नांवाच्या राजाचा पराभव करून त्यास मारल्याचें विधान हेमाद्रीच्या ग्रंथांत आहे. तो सोमराजा म्हणजेच सोमेश्वर असावा. महादेवानें सोमेश्वराचा पराभव केल्यावर तो जहाजांतून पळून जात असतां त्याचें जहाज बुडून तोहि बुडाला व महादेवानें त्याचें राज्य खालसा करून त्यावर आपले अधिकारी नेमले.

उत्तर कोंकणच्या शिलाहारांची राजधानी म्हणून ठाणें, राजपुरी व घारापुरी या तीन स्थळांचीं नांवें पुढें आलीं आहेत. पैकीं ठाणें तथा स्थानक या राजधानीविषयीं प्रश्नच नाहीं. त्याशिवाय पुरी नांवाची आणखी एक राजधानी ठाण्यापूर्वी होती, ती राजपुरी कीं घारापुरी अशी शंका उद्भवते. राजपुरी म्हणजे जंजिरा संस्थानांतील दण्डा राजपुरी व घारापुरी म्हणजे मुंबई-जवळचें एलेफंटा हें बेट. बदामीचा चालुक्यराजा दुसरा पुलकेशी यानें कोंकणच्या मौर्यांवर स्वारी केली तेव्हां त्यांची राजधानी पुरी होती. तो काळ शक ५३२ अर्थात् इ. स. ६१० च्या सुमाराचा. कल्याणचा चालुक्यराजा सत्याश्रय यानें इ. स. १००५ च्या सुमारास कोंकणच्या शिलाहारांवर स्वारी केली. तेव्हां अपराजित शिलाहार याची राजधानी पुरी असून तेथें सत्याश्रय गेला. त्या प्रसंगाचें कन्नडकवि रण्ण यानें एकीकडून खरा समुद्र व दुसरीकडून सत्याश्रयाचा सेनासमुद्र यांच्या कचाटींत अपराजित सांपडल्याचें वर्णन केलें आहे. तें विचारांत घेतां पुरी हें घारापुरीप्रमाणें बेट नसून राजपुरीप्रमाणें बंदर असल्याचें दिसून येतें. म्हणून पुरी म्हणजे राजपुरी व तीच मौर्यकालापासून शिलाहारकाळांत बरींच वर्षें राजधानी होती असें म्हणावें लागतें.

आतां पुरीशिवाय कांहीं काळानें शिलाहारांनीं ठाणें ही आपली दुसरी राजधानी केली व हळू हळू पुरी सोडून देऊन ठाण्यास ते कायमचे राहूं लागले; याचें कारण असें कीं, कदंबांनीं दक्षिण कोंकण उत्तर शिलाहारांपासून जिंकून घेतल्यावर कवडीद्वीपाच्या टोंकाला असलेल्या पुरीचें राजकीय

दृष्टया महत्व नाहींसें होऊन कवडीद्वीपास मध्यवर्ति असणारें ठाणेंच त्यांना सोयीचें वाटलें. राजपुरीनंतर शिलाहार ठाण्यास राहूं लागल्यानंतर बहुधा त्यांनीं घारापुरी, मंडपेश्वर व जोगेश्वरी येथील शिवलेणीं कोरलीं असावीं. कारण, उत्तर कोंकणचे शिलाहार राजे शिवभक्त असून त्यांजपैकीं झंझ यानें शंकराचीं बारा देवालयें बांधल्याचें वर्णन इ. स. १०९५ च्या ताम्रपटांत आहे. अंबरनाथचें शिवालय छित्तराज किंवा मुम्मुणी यानें इ. स. १०३० च्या सुमारास दुरुस्त केलें. शिवाय राष्ट्रकूट कृष्णराज यानें वेरूळास अनेक शिवलेणीं कोरलीं असल्यामुळें त्यासारखीं लेणीं आपल्या राज्यांतही असावीं असें राष्ट्रकुटांचे मांडलिक शिलाहार यांना वाटलें असल्यास तें स्वाभाविक होय.

शिलाहारांनीं वरील लेणीं कोरल्यानंतर त्यांजपैकीं ठाण्यापासून समुद्रांत अवघे पांच मैल असलेल्या घारापुरीस ते उन्हाळ्यांत श्रीसन्निध कांहीं काल राहात असतील. घारापुरीच्या टांक्यांत एक रांजण सांपडला असून त्याजवर श्रीपुरी अशीं अक्षरें आहेत. तीं श्रीची म्हणजे देवाची पुरी या अर्थानें समर्पक आहेत. शिवाय पांच मैलांच्या अंतरांत दोन राजधान्यांचें प्रयोजन नाहीं हेंहि विसरतां कामा नये. सारांश शिलाहारांची दण्डाराजपुरी ही जुनी राजधानी, ठाणें ही नवी राजधानी आणि घारापुरी हें त्यांचें हवा खाण्याचें व श्रीसन्निध राहाण्याचें स्थळ असें ओघानेंच ठरतें.

# प्रकरण बारावें

## शिलाहार घराणें

## ( कोल्हापूर )

## ( इ. स. ११०९-१२१८ )

शिलाहारांचें तिसरें घराणें कोल्हापूर, मिरज, कऱ्हाड व कोंकणाचा कांहीं भाग यावर राज्य करीत होतें. उत्तर कोंकणच्या शिलाहारांप्रमाणें यांचाहि सुवर्णगरुडध्वज होता. त्यांचा पहिला ज्ञात पुरुष जतिग पहिला, दुसरा पुरुष त्याचा पुत्र नायिम्म किंवा न्यायवर्मा, तिसरा पुरुष चन्द्र आणि चौथा पुरुष चन्द्राचा पुत्र जतिग दुसरा. या चौघांपैकीं पहिले तिघे संस्थानिकाच्या दर्जाचे तरी असतील कीं नाहीं याविषयीं शंका आहे. त्यांची माहितीहि तशी उपलब्ध नाहीं. या वंशांत पुढें शक १०३७ च्या सुमारास गण्डरादित्य नांवाचा राजा झाला. त्याचा शक १०३७ मधील ताम्रपट उपलब्ध असून त्यांत त्या सर्वांचें पुढीलप्रमाणें वर्णन आढळतें. ' जतिग हा प्रतापाचें आश्रयस्थान व कानडी स्त्रीच्या कुंकुमानें ज्याचें शरीर लांच्छित झालें आहे असा होता. त्यास विद्याधराचा स्वामी शोभणारा नायिमांक नांवाचा पुत्र झाला. नायिमांकाचा पुत्र चन्द्र यानें राज्यलक्ष्मी वाढविली व पुण्य सांठविलें. चन्द्राचा पुत्र जतिग दुसरा याचें सैन्य फार मोठें होतें. जतिगाला शत्रुरूपी पर्वतांना वज्रासमान असे गोंकल व गूवल या नांवाचे दोन पुत्र झाले. गोंकलाच्या पोटीं शत्रुरूपी हत्तींना सिंहाप्रमाणें, विख्यातकीर्ति व पंडितांना प्रिय असा मारसिंह हा पुत्र आला. मारसिंहाचा पुत्र गूवल हा जगदेकवीर व राजश्रेष्ठ होता. गूवलाचा धाकटा भाऊ भोज पहिला यानें कदंबवंशांतील शातर याच्या शिरकमलानें चालुक्य चक्रवर्ति विक्रमादित्य याच्या पायांची

पूजा केली. त्यानें बेळगांव जाळलें, कोंकण ताब्यांत आणिलें व बाहुबलानें भिल्लमाची मुक्तता केली. त्याच्या मागून सूर्यासारखा पराक्रमी, इंद्रासारखा ऐश्वर्यवान्, सर्व लक्ष्मीचें निवासस्थान, शत्रूचा मदभंग केलेला असा गण्डरादित्य राजा झाला. याच्या साहाय्यानें चालुक्य विक्रमादित्य यानें निःशंकमल्ल ही पदवी धारण केली. त्याच्या तलवारीच्या तीव्र आघातानें भ्यालेला कुंडिदेशाचा राजा दण्डब्रह्म हा अतिशय रम्य राष्ट्र व स्वहस्तानें मिळविलेलें ऐश्वर्य टाकून देवाच्या घरीं गेला !

असो. आतां या ताम्रपटांतील राजांपैकीं ज्यांची थोडीबहुत माहिती मिळते त्यांचा विचार करूं. वरील घराण्यांतील पहिला पुरुष जतिग याच्या कारकिर्दीत म्हैसुराकडे गंग राजे राज्य करीत होते. त्यांजवर जतिगानें शक ८८० ते ९०० यांच्या दरम्यान स्वारी करून त्यांचा गोमन्थ किल्ला घेतला. त्याचा उल्लेख ताम्रपटांत सांपडतो. नाय्यिम व चन्द्र यांच्यानंतर जतिग दुसरा याचा काळ, डॉ. आळतेकर यांनीं अंदाजीं इ. स. १००० ते १०२० धरला आहे. जतिगास त्याचा नातू मारसिंह यानें आपल्या एका लेखांत पर्णालदुर्गाद्रिसिंह असें वर्णिलें आहे. त्याचा अर्थ पन्हाळगडावरील सिंह. त्यावरून जतिग पन्हाळा किल्ल्यावर राहात असल्याचें स्पष्ट दिसतें. जतिगाचा निश्चित काल माहीत नाहीं. ज्यापक्षीं त्याचा नातू मारसिंह इ. स. १०५८ त राज्य करीत होता त्यापक्षीं, जतिगाचा काळ इ. स. १००० ते १०२० पर्यंतचा असावा असा आळतेकरांचा अंदाज आहे. इ. स. १०२४ च्या सुमारास चालुक्य राजा जयसिंह यानें कोल्हापूर काबीज करून तेथें आपल्या सैन्याचा तळ दिला. हें वृत्त जतिगाच्या कारकिर्दीच्या शेवटीं व त्याचा पुत्र गोंक याच्या कारकिर्दीच्या प्रारंभीं घडलें असावें. तेव्हां शिलाहारांनीं जयसिंहाचें मांडलिकत्व स्वीकारलें असलें पाहिजे.

जतिगामागून त्याचा पुत्र गोंक ( गोंकल्ल ) याची कारकीर्द सुरू झाली ( इ. स. १०२० ते १०५५ ). तो पराक्रमी असल्याचें वर्णन ताम्रपटाच्या वरील उताऱ्यांत आहेच. त्याच्या वेळीं कोल्हापुराशिवाय मिरज व कऱ्हाड यांवरहि शिलाहारांची सत्ता स्थापन झाली होती; व दक्षिण कोंकणांतील शिलाहार घराणें नष्ट झालें होतें. त्या घराण्याच्या राज्याचा कांहीं भाग गोंकानें चालुक्यांच्या अनुमतीनें आपल्या राज्यास जोडला असावा. गोंकानंतर त्याचा पुत्र मारसिंह गादीचा मालक झाला. त्याच्या इ. स. १०५८ तील ताम्रपटावरून त्यानें इ. स. १०५५ ते १०७० पर्यंत राज्य केलें असावें. त्याची राजधानी किलगिल दुर्गांत होती. हा कागलचा दुर्ग. त्यानें मिरजेपासून पांच मैलांवर कृष्णाकांठीं वसलेलें कुंटवाड गांव ( खुटवाड ) ब्राह्मणांना दान दिल्याचा उल्लेख त्याच्या एका ताम्रपटांत आहे. मारसिंहास गुबल ( गुवल ), गंगदेव, बल्लाळ, भोज व गण्डरादित्य असे पांच पुत्र होते. त्यांतील गुबल सर्वांत वडील; त्यानें सुमारें १०७५ ते १०८६ पर्यंत राज्य केलें. गुबल मेल्यावर त्याचा भाऊ बल्लाळ १०८६ त राजा झाला. बेळगांव जिल्ह्यांत हवेरी गांवीं सिद्धेश्वराच्या देवालयांत इ. स. १०८७ मधील लेख सांपडला आहे. त्यांत तो लेख बल्लाळाच्या कारकिर्दीच्या दुसऱ्या वर्षी लिहिला असें विधान आहे. त्या आधारें त्याच्या कारकिर्दीचा प्रारंभ ठरवितां येतो. त्याच्या मागून त्याचा धाकटा भाऊ भोज इ. स. १०९५ च्या सुमारास गादीवर बसला. भोजाचा राज्य-कारभार त्याचा धाकटा भाऊ गण्डरादित्य पाहात होता. येलबुर्ग ( निजामशाही ) येथें सिंद नामक घराणें यावेळीं राज्य करीत होतें. त्याचें व भोजराजाचें कांहीं कारणानें युद्ध जुंपून त्यांत भोजाचा पराभव झाला असें सिंद घराण्यांतील ताम्रपटांत म्हटलें आहे. ते खरें असल्यास शिलाहारांच्या राज्यविस्ताराची कल्पना येऊन सदर राज्य पूर्वेस विजापुरापर्यंत पसरलें असावें असें अनुमान सहज निघतें.

## गण्डरादित्य

इ.स. ११०८ च्या एका लेखांत भोज व गन्डरादित्य या दोघांचाहि राजे म्हणून उल्लेख आहे. पण १११० पासून पुढच्या लेखांत एकट्या गण्डरादित्याचेंच नांव असल्यामुळें या सुमारास भोज मरून गन्डरादित्य खरा राजा झाला असावा. त्या दृष्टीनें गन्डरादित्यानें इ. स. १११० ते इ. स. ११४० पर्यंत राज्य केलें. गन्डरादित्याचे लेख इ. स. ११३५ पर्यंत आढळतात. तीन भावांनीं मिळून सुमारें ३५ वर्षें राज्य केल्यावरहि गण्डरादित्यास राज्योपभोग २५ वर्षें वेगळा लाभला. त्यापक्षीं तो बराच म्हातारा होऊन मेला असावा.

गण्डरादित्याचे वेळीं चालुक्यराजा सहावा विक्रमादित्य हा सम्राट असून शिलाहार त्याचे मांडलिक होते. विक्रमादित्य शक ९९८ ते १०४८ पर्यंत सत्ताधीश होता (इ. स. १०७६—११२६). म्हणजे त्याची कारकीर्द ५० वर्षांची झाली. त्याचा धाकटा भाऊ जयसिंह वनवासी देशाचा कारभार पाहात होता. त्याला भोज शिलाहाराची मदत मिळून त्यानें वरील ताम्रपटांत म्हटल्याप्रमाणें कदंबवंशांतील शांतरास ठार मारलें असावें व चालुक्यांच्या वतीनें दक्षिण कोंकणाचा ताबा घेतला असावा. हनगलच्या कदंबराजांपैकीं शान्तिवर्मा दुसरा उर्फ शांति उर्फ शांतय हा दिसतो. पुढें जयसिंहानें विक्रमादित्याविरुद्धहि बंड उभारलें व तो विक्रमादित्याशीं सामना देण्यास उभा राहिला, तेव्हां विक्रमादित्याच्या बाजूनें लढणारांत व त्यास यश मिळवून देणारांत गण्डरादित्य असून विक्रमादित्यानें आपणास निःशंकमल्ल ही पदवी घेतल्याचें गण्डरादित्य आपल्या ताम्रपटांत म्हणतो. यायोगें त्याचें शौर्य स्पष्ट होतें. त्यानें आपल्या एका लेखांतहि कोंकणप्रांत स्वतःच्या ताब्यांत असल्याचें म्हटलें आहे. गोंव्याच्या कदंबराजांनीं उत्तर शिलाहारांचा पराभव करून कोंकणप्रांत कदंब राज्यास जोडला होता, असें कदंब ताम्रपटांत लिहिलें आहे. भोज व गण्डरादित्य यांनीं संपादलेला भाग त्यांतील कांहीं असावा. तो शिलाहारांनीं घेतल्यावरहि कदंबांकडे कोंकणाचा कांहीं भाग शिल्लक

राहिलाच. गण्डरादित्यानें आपल्या एका ताम्रपटांत आपलें स्थिर शिबिर वळवडें येथें असल्याचें व आपणास महालक्ष्मीचा प्रसाद मिळाल्याचें लिहिलें आहे. त्यावरून वळवडें ही त्याची राजधानी होती व कोल्हापूरची महालक्ष्मी तेव्हां प्रसिद्ध होती असें दिसून येतें. गण्डरादित्यानें शक १०३७ त मिरज-विषयांतील अक्कलखोप ( अंकुलगोवी), आंबेवाडी व अदगी हीं गांवें आपल्या मर्जीतील नोळंब सामंतास दिलीं; तसेंच कुंडी देशाच्या रट्टराजांपैकीं दण्डब्रह्मास लढाईंत ठार केलें.

गण्डरादित्याची वैदिक व जैन या दोन्ही मार्गांवर भक्ति होती. त्यानें दहा हजार ब्राह्मणांना प्रयागास भोजन घातलें. कोल्हापुरापासून वर तीनचार मैलांवर पंचगंगेचा संगम आहे. त्या स्थळास प्रयाग म्हणतात. तेंच हें प्रयाग असावें. त्यानें अजिरगे येथें जैन मंदिर बांधलें. आजिरगे हा गांव गडहिंग्लज-पाशीं आहे. मिरज प्रांतीं इरुकुडी नामक गांवीं त्यानें गण्डसमुद्र नांवाचा मोठा तलाव बांधून त्याजवळ बुद्ध, जिन व शंकर यांचीं देवालयें बांधलीं व त्यांच्या पूजाअर्चेकरितां इनाम जमिनी दिल्या. गण्डरादित्याची भक्ति जैनमतावर होती, याचें दुसरें प्रत्यंतर म्हणजे त्यानें नोळंब सामंतास (सावंत) तीन गांवें दिलीं. कारण नोळंबाचें वर्णन करतांना त्याचा बाप नायिम हा जिनमतरूपी समुद्राला चन्द्राप्रमाणें झाला, अशी त्याची गण्डरादित्यानें प्रस्तुत ताम्रपटांत स्तुति केली आहे. ( श्रीनायिमो जिनमतांबुधिचन्द्र येषः ) नोळंब सावंतास हीं गांवें केवळ तो सत्कुलांत जन्मलेला, ज्याचे पूर्वज कीर्तिमान होऊन गेले असा व सर्वगुणसंपन्न म्हणून त्यावर खूष झालेल्या गण्डरादित्यानें दिलीं.

गण्डरादित्याच्या ताब्यांत मिरिंज देश, सप्तखोल्ल ( सात खोरीं ) म्हणजे मावळी भाग व कोंकणाचा कांहीं प्रदेश होता, असें शक १०३१ च्या ताम्रपटांत म्हटलें असल्याचें कोल्हापूर गॅझीटियरमध्यें विधान आहे.

## विजयादित्य

गण्डरादित्यामागून त्याचा पुत्र विजयादित्य तथा विजयार्क राजा झाला. त्याचे शिलालेख कोल्हापूर, मिरज, कागलपाशीं बामणी व बेळगांव जिल्ह्यांत शेडबाळ तेथें सांपडले आहेत. त्याचा पुत्र भोज दुसरा हा आपल्या एका ताम्रपटांत स्थानक (ठाणें) व गोंवें येथील राजांना विजयादित्यानें गादीवर पुनः बसविल्याचें सांगतो. ठाण्याचा अपरार्क राजा हा इ. स. ११२७ च्या सुमारास गादीवर आला. त्या कामीं त्यास विजयादित्यानें मदत केली असावी. परंतु त्या वेळीं विजयादित्य युवराज असावा, राजा नसावा. उलटपक्षीं विजयादित्यानें अपरार्कांचा शत्रू जो गोंव्याचा राजा जयकेशिन् दुसरा यालाही गोंव्याचें राज्य मिळविण्यास मदत केली. हे दोन्ही प्रसंग भिन्न कालीन समजले पाहिजेत. ही मदत सिंदराज अचुगी दुसरा यानें गोंवें घेतलें त्यानंतर जयकेशिन् यास विजयादित्यानें केली असावी.

विजयादित्य इ. स. ११४० ते ११७५ पर्यंत राज्यावर होता असें म्हणतां येतें. तोहि बापाप्रमाणेंच वळवडें येथेंच राहात असे. त्याचाहि बापाप्रमाणेंच वैदिकधर्म व जैनमत या दोन्हींस आश्रय मिळाला. त्याच्या दोन शिलालेखांपैकीं शक १०६५ मधील शिलालेख कोल्हापुरास शुक्रवार वेशीजवळ जैन मंदिरासमोर आहे. त्याची लिपी जुनी कानडी आणि भाषा निम्मी संस्कृत व निम्मी जुनी कानडी आहे. त्यानें अजिरगें खोल्ल (खोरें) या विषयांतील हाविना हेरिलगे या खेड्यांत पारसनाथाच्या पूजेकरितां माघ शुद्ध पौर्णिमेस चन्द्रग्रहणाच्या पर्वणीस एक शेत दिलें. विजयादित्याचा दुसरा शिलालेख कागलपासून नैॠत्येस पांच मैलांवरील बामणी गांवीं जैन मंदिराच्या दरवाजांत आहे. त्यांत विजयादित्यानें आपला मामा लक्ष्मण सामंत याच्या विनंतीवरून त्याच पारसनाथाच्या पूजेकरितां भाद्रपद महिन्यांत सूर्यग्रहणाच्या पर्वणीस कुंडी देशांत एक शेत दिलें.

## भोज दुसरा

विजयार्कामागून त्याचा पुत्र दुसरा भोज गादीवर आला. त्यानें दिलेल्या ताम्रपटांत तो स्वतःस महामंडलेश्वर वीर भोज म्हणवितो. त्याच्या कारकिर्दीतील शिलालेखहि आढळतात. त्यांत कोल्हापूर, वळवडें व पन्हाळा यांचा राजधान्या म्हणून उल्लेख आहे. भोजाचे मनांत स्वतंत्र होण्याची महत्त्वाकांक्षा बळावली. त्याकारणानें त्यानें एका दानपत्रांत स्वतःस महामंडलेश्वर वीर भोजदेव असें म्हटलें असलें तरी इतरत्र त्यानें आपणास राजाधिराज, परमेश्वर, परमभट्टारक वगैरे पदव्या लावलेल्या दृष्टीस पडतात. त्याच्या दानाचा एक शिलालेख कोल्हापुरास अंबाबाईच्या देवळांत असून त्याची लिपी नागरी व भाषा संस्कृत आहे. लेखाच्या एका भागात कोपरवाडाजवळचें एक शेत आणि दुसऱ्या भागांत पावा नांवाचें गांव अग्रहार दिलें आहे. हीं दोन्ही दानें ब्राह्मणांना आणि उमामहेश्वर व महालक्ष्मी या देवतांच्या पूजाअर्चेसाठीं दिलीं आहेत.

'भोज हा कोल्हापूर शिलाहारांत फार मोठा राजा होऊन गेला. त्याचें राज्य उत्तरेस शंभू-महादेवाच्या डोंगरापासून ते कोल्हापूरच्या दक्षिणेकडील हिरण्यकेशी नदीपर्यंत विस्तारलें होतें अशी परंपरागत समजूत आहे. दक्षिण कोंकणाचा सदाशिवगड किंवा कारवार येथपर्यंतचा मुलूख त्याच्या ताब्यांत होता. त्यानेंच बावडा, भदरगड, खेळणा ऊर्फ विशाळगड, पन्हाळा, पावनगड, सामानगड इत्यादि पंधरा किल्ले बांधल्याविषयीं ख्याति आहे.' (बांबे गॅझीटियर, कोल्हापूर.). 'सातारा जिल्ह्यांत वाईजवळ पाडवगड आहे. तो किल्ला भोजराजानें बांधला. तसेंच सातारा रेल्वे-स्टेशनाजवळचा नांदगिरी ऊर्फ कल्याणगड हाहि किल्ला त्यानेंच बांधला असें म्हणतात' (सातारा जिल्हा गॅझीटियर). या व वरील हकीकतीवरून हल्लींचें कोल्हापुर संस्थान, सातारा जिल्हा व त्या दोहोंच्या मधलीं पटवर्धनी संस्थानें हा देशावरचा सारा प्रदेश भोजराजाच्या अंमलाखालीं असल्याचें आढळून येतें.

कलचूरी घराणें शक १११० त नाश पावून यादवराजा चौथा भिल्लम सम्राट बनला. त्या राज्यक्रांतींतील धामधुमीची संधि साधून एकवेळ आपल्या बरोबरीचे असलेल्या यादवांना न जुमानतां भोज कोल्हापुरास स्वतंत्रपणें वागूं लागला. भिल्लम शक १११३ त मरण पावला. त्याच्यामागून जैत्रपाल व जैत्रपालानंतर सिंघण शक ११३२ त सिंहासनावर बसला. त्यानेंच भोजास जिंकून कोल्हापूरचें राज्य शक ११४० च्या सुमारास खालसा केलें. सिंघणाच्या एका पुत्रानें कोल्हापूर येथील अंबाबाईच्या देवळाचा एक दरवाजा बांधल्याचा उल्लेख इ. स. १२१८ च्या ताम्रपटांत आहे.

यादवांच्या लेखांत पन्हाळा पर्वतावरील भोजराजरूप सर्पाला हांकलून लावणारा गरुड अशी सिंघणराजास उपमा दिली आहे. तिजमधून, कोल्हापूर प्रांतावर शिलाहारांना मांडलिक म्हणूनहि सिंघणानें राज्य करूं दिलें नाहीं असा ध्वनि निघतो. भोजास गण्डरादित्य नांवाचा एक पुत्र होता. पण त्यास बापाचें राज्य मिळालें नाहीं. भोजानंतर कोणाहि शिलाहार राजाचें नाव अगर लेख सांपडत नसल्यामुळें भोजाबरोबर शिलाहारांचें राज्य लयास गेलें हें सिद्ध होतें (आळतेकर).

दुसऱ्या भोजानें शक १११३ आषाढ शुद्ध ४ या दिवशीं कशेळी हा गांव दक्षिणायन संक्रमण पर्वानिमित्त गोविंदभट्ट यास कुमार गण्डरादित्य याच्या विनंतीवरून दिला. त्यानेंच कार्तिक वद्य ३० शके १११३ या दिवशीं राजापुराजवळ कुंतापूर या गांवीं तीनशें निवर्तन जमीन त्याच गोविंदभट्टास दिली (आठले घराण्याचा इतिहास). कशेळी हाहि गांव राजापुर तालुक्यांतच आहे. त्यावरून इ. स. १०२० च्या सुमारास गोंकाच्या कारकिर्दीत दक्षिण कोंकणाच्या कांहीं भागांत कोल्हापूर शिलाहारांचा अंमल बसला तो अखेरपर्यंत टिकला असें दिसून येतें.

## उपसंहार

शिलाहारांच्या अमदानींत जैन मतास राजाश्रय अनेक रीतींनीं मिळून जैन समाजाची उन्नति बरीच झाली. त्यांत कित्येक पंडितहि निपजले. त्यांपैकीं सोमदेव नामक पंडितानें शक ११२७ त पूज्यपादाच्या संस्कृत व्याकरणावर शब्दार्णव-चंद्रिका नांवाची टीका लिहिली. तिच्या शेवटींहि भोज दुसरा यास राजाधिराज परमेश्वर, परमभट्टारक, पश्चिमचक्रवर्ती अशा पदव्या लावल्या आहेत.

वरील विवेचनांत कोल्हापुरवासी शिलाहारांच्या राजधान्यांचीं वेगवेगळीं नांवें आलीं आहेत. त्या सर्वांत पन्हाळा, वळवडें व कोल्हापूर यांचा उल्लेख प्रमुखत्वानें आढळतो. पन्हाळा हें डोंगरी स्थळ संकटकाळीं संरक्षणास सोयीचें म्हणून शिलाहारांनीं त्याची गणना राजधानींत करावी यांत नवल नाहीं. वळवडें नांवाचीं दोन खेडीं कोल्हापूर संस्थानांत आहेत. त्यांपैकीं एक वळवडें अगदीं कोल्हापुराजवळ असल्यानें ती राजधानी संभवत नाहीं. दुसरें वळवडें कोल्हापुरापासून पश्चिमेस वीस मैलांवर असून त्याची अलीकडे राधानगरी बनविण्यांत आली आहे. कोल्हापुरवासी शिलाहारांच्या कोंकणांतील राज्यावर देखरेख ठेवण्यास अशा घाटमाथ्यावरील राजधानीची निर्विवाद जरूरी होती. त्याशिवाय कोल्हापूर ही तर त्यांची सर्वमान्य राजधानी. या दृष्टीनें कोल्हापुरवासी शिलाहारांच्या तीन राजधान्या संभवतात. शिवाय कागल हीहि कांहीं काळ राजधानी होतीच.

आतां प्रत्यक्ष पुराव्यावरून काय दिसून येतें याचा विचार करूं. जतिग दुसरा याची राजधानी (इ. स. १०००–१०२०) पन्हाळ्यास होती. चालुक्य राजा जयसिंह यानें (शक ९४६ त) इ. स. १०२४ च्या सुमारास कोल्हापूर काबीज करून तेथें आपल्या सैन्याचा तळ दिला. मारसिंह याची राजधानी (इ. स. १०५५–७०) किलगिल दुर्गांत (कागल) होती. गण्डरादित्याची राजधानी प्रथम शिरोळ पेट्यांत तिरोड येथें व नंतर

वळवडें येथें इ. स. १११५ त होती. गण्डरादित्य आपणास महालक्ष्मीचा प्रसाद असल्याचें ताम्रपटांत लिहितो. विजयादित्य ( ११४०–११७५ ) वळवडें येथें राहात होता. दुसरा भोज हा शेवटचा शिलाहार राजा पन्हाळा, वळवडें व कोल्हापूर या तिन्ही स्थळांचा राजधानी म्हणून उल्लेख करतो. गोंव्याच्या कदंब कुळांतील राजा षष्ठदेव (षष्ठीदेव) दुसरा याच्या शक ९३२ ( इ. स. १०१० ) च्या ताम्रपटांत ' श्रीकोल्लापुरमेत्य येन च श्रीमहालक्ष्मी समाराधिता ' असें वर्णन आहे ( ग. ह. खरे, सह्याद्रि, नोव्हेंबर १९३६ ). कदंब षष्ठ राजा हा शिलाहार राजा जतिग दुसरा याच्या कारकिर्दींत कोल्हापुरास आला असून त्यावेळीं कोल्हापूर हें स्थळ व त्यांतील महालक्ष्मी ही देवी प्रसिद्ध होती. कोल्हापूरचें महत्व त्याच काळांत सिद्ध झालें असल्या-मुळें तेव्हांपासून, किंबहुना शिलाहारांच्या राजवटीच्या प्रारंभापासून कोल्हापूर हीच त्याची प्रमुख राजधानी होती असें अनुमान निघतें. मग कोल्हापुराचा राजधानी म्हणून निर्देश दुसऱ्या भोजाच्या, म्हणजे शिलाहार राजवटीच्या शेवटीं आला असला तरी हरकत नाहीं. दुसऱ्या भोजानें पन्हाळा, वळवडें व कोल्हापूर या तिन्हींला राजधानी म्हटलें आहे. त्याचा अर्थ हा कीं, वळवडें व कोल्हापूर या दोन स्थळीं तो आलटून पालटून राहात असून केव्हां पन्हाळयास व केव्हां वळवड्यास राहात होता. कागलचा राजधानी म्हणून उल्लेख फक्त मारसिंहाच्या कारकिर्दींत आला असल्यानें तो विशेष प्रसंगानें कांहीं दिवस तेथें राहावयास गेला होता याहून अधिक महत्व त्या गोष्टीचें नाहीं.

## कोल्हापूरची अंबाबाई

यानंतर कोल्हापूरच्या अंबाबाईचा विचार कर्तव्य आहे. गोंव्याचा कदंब राजा षष्ठदेव दुसरा यानें कोल्हापुरास येऊन महालक्ष्मीची म्हणजे अंबाबाई-ची पूजा शक ९३२ (इ. स. १०१० ) पूर्वींच केली होती. त्यावरून बहुधा

शिलाहार कोल्हापूरचे राजे होण्यापूर्वीच तेथील महालक्ष्मीची स्थापना झाली असल्याचें दिसून येतें. कोल्हापुरास शिलाहार राज्य करण्यास आल्यावर ही महालक्ष्मी त्यांची सहजच कुलदेवता बनली व त्यावेळीं त्या देवस्थानाची स्वाभाविकच सुस्थिति असल्यामुळें शिलाहारांना उत्पन्नादिकांची व्यवस्था निकडीनें करण्याची जरूरी वाटली नसेल. कारण देवीच्या त्रिकाळ-नैवेद्या-करितां उत्पन्न दिलें तें दुसऱ्या भोजानेंच. ही गोष्ट शक १११४ मध्यें घडली. त्यावर्षी भोजानें कोपरवाडाजवळ एक शेत या कामासाठीं ब्राह्मणास दान केलें असून तद्विषयक शिलालेख अंबाबाईच्या देवळांतच आहे. देवगिरीचा यादवराजा सिंघण यानें शक ११४० त (इ. स. १२१८) तिला उत्तम भूषणें अर्पिलीं व त्याचा चाकर तैलप यानें तिजपुढें मोठें व सुंदर तोरण बांधलें. शक ७९३ चा राष्ट्रकूट अमोघवर्ष याचा ताम्रपट सांपडला आहे त्यांत वीर नारायणानें महालक्ष्मीस डाव्या हाताचें बोट अर्पिलें असें वर्णन आहे. ती महालक्ष्मी कदाचित् कोल्हापूरचीहि असूं शकेल.

---

# प्रकरण तेरावें

## गोंव्याचें कदंब घराणें

### (इ. स. १०००–१२३७)

वनवासी, हनगल व गोंवें येथील कदंब हे एकाच वंशांतील. त्याशिवाय बवलनाड, बेलूर, नगरखंड, बंकापूर इत्यादि ठिकाणींही कदंबांचीं घराणीं होतीं. गोंव्याचे कदंब हे हनगलच्या कदंबांप्रमाणेंच आपणांस 'वनवासी-पुरवराधीश्वर' म्हणवीत. सिंह हें त्यांचें लांछन होतें. त्यांच्या ध्वजावर वानर असे. पेरमट्टी हें त्यांचें वाद्य, सप्तकोटीश्वर म्हणजे शिव हें त्यांचें कुलदैवत. त्यांच्यासंबंधीं जुने लेख बेळगांव जिल्ह्यांतील खानापूर व संपगांव या तालुक्यांत आणि धारवाड जिल्ह्याच्या उत्तर व वायव्य भागांत सांपडतात.

पुलकेशी चालुक्य दुसरा यानें इ. स. ६१२ च्या सुमारास वनवासी येथील कदंबांचा पराभव केला. तेव्हांपासून इ. स. ९७५ पर्यंत कदंब नामशेष झाले. त्यांच्याऐवजीं वनवासीस अलुप राजे राज्य करूं लागले. त्यांपैकीं पहिला राजा गंगासागर. पुढें बदामीच्या चालुक्यांचें राज्य बुडाल्यानंतर अलुपांवर राष्ट्रकूटांचें अधिराज्य झालें. राष्ट्रकूटांस बुडविणारा तैलप चालुक्य यास कदंबानीं मदत केल्यामुळें वनवासी १२००० चें राज्य त्यानें इ. स. ९८६ च्या सुमारास कदंबांना दिलें. त्याचें नांव इरिवेदांगदेव. हाच हनगल येथील कदंबांचा संस्थापक.

गोंव्याच्या कदंबांचा ज्ञातपुरुष कंटकाचार्य. त्याचा पुत्र व उत्तराधिकारी नागवर्मा हा वेद व राजनीति यांत निपुण होता. त्याचा पुत्र षष्ठ तथा षष्ठी हा हनगल घराण्याच्या संस्थापकाचा समकालीन होता. गोंवें प्रांताचें संस्कृत नांव गोपकद्वीप ( गोपकपूर ). कदंबाचें राज्य प्रथम गोंवें नगराच्या दक्षिणेस सह्याद्रीपर्यंत पसरलें होतें. त्यांची राजधानी चंद्रपूर होती. ती चंद्रादित्य चालुक्यानें स्थापिली असावी. षष्ठ याचें दुसरें नांव चतुर्भुज असावें. त्याची पत्नी अक्कादेवी व त्यांचा पुत्र गुहल्लदेव. गुहल्लानें पल्लवांना मदत केली. त्यानें सोरटी-सोमनाथाची यात्रा केली होती. सोमनाथाच्या यात्रेस समुद्रांतून जात असतां वाटेंत त्याच्या जहाजाचें शीड मोडलें व त्यामुळें त्याला गोंव्याच्या बंदरांत उतरावें लागलें. तेथें महंमद हा श्रीमंत मुसलमान व्यापारी राहात होता. त्यानें त्यास मदत केली. त्यासंबंधीं पुढील लेख आढळतो. “ ताजी ( अरब ) वंशांतला महंमद हा दर्यावर्दी व्यापारी अत्यंत श्रीमान् असून मोठा शहाणा होता. त्यानें राजा गुहल्लदेव याला मदत केली. ” त्यानें राजाला खूप पैसा दिला. यावरून त्यावेळीं अरब व्यापारी गोंव्यास राहावयास आले असून ते पश्चिमेकडील देशांशीं व्यापार करीत. गोंवें हें दक्षिण शिलाहारांच्या ताब्यांत असावें. गुहल्लदेव यास व्याघ्रमारिन् म्हणजे वाघमारे अशी पदवी होती.

## षष्ठीदेव दुसरा

हा इ. स. १००७ च्या सुमारास गादीवर बसला. त्यानें बापाचें धोरण पुढें चालवून सबंध कोंकण जिंकलें. या कामीं त्याला उत्तर व दक्षिण शिलाहारांतील भांडणाचा फायदा मिळाला. या भांडणांतच प्रारंभीं उत्तर शिलाहार अरिकेसरी यानें सबंध कोंकण जिंकलें होतें. रट्टराज हा शेवटचा दक्षिण शिलाहार. तो अरिकेसरीचा समकालीन होता.

षष्ठीदेवानें कोंकणावर स्वारी करून सबंध कोंकण जिंकण्याचा बेत योजला. षष्ठीदेवाच्या आरमाराच्या मानानें शिलाहाराचें आरमार कमजोर असल्यामुळें त्याला हा बेत सिद्धीस नेता आला. यावेळीं अरिकेसरी व त्याचा पुतण्या छित्तराज मरून छित्तराजाचा भाऊ मुम्मुणी हा गादीवर होता. षष्ठीदेवानें चंद्रपुराहून निघून प्रथम कोंकण नऊशें घेतलें व नंतर कवडीद्वीप म्हणजे उत्तर कोंकणहि काबीज केलें. पण कवडीद्वीप हा उत्तर शिलाहाराचा खास प्रदेश कायमचा जिंकून त्यांस देशोधडीस लावण्याचा निष्ठुरपणा षष्ठीदेवानें न करतां मुम्मुणी शरण येतांच त्यास सहानुभूतीनें वागविलें. मुम्मुणी आपली कन्या त्यास देण्यास कबूल झाला. हा लग्नसमारंभ मुम्मुणीनें आपली राजधानी ठाणें येथें मोठ्या थाटानें पार पाडला. त्यानें षष्ठीदेवास टाण्यास बोलावून आपल्या वाड्यांत आणिलें व त्यास पांच लक्ष सुवर्ण हुंडा देऊन आपली कन्या अर्पिली.

षष्ठीदेवाचें वैभव वाढत गेल्यावर त्याला यात्रेस जाण्याची इच्छा झाली. त्यानें गोकर्णास जाऊन तेथील महाबळेश्वराचें दर्शन घेतलें व कोल्हापुरास जाऊन तेथील महालक्ष्मीपुढें आपला माथा नमविला. या यात्रा जवळच्या, पण त्याहून दूरची यात्रा सौराष्ट्रांतील सोमनाथाची. त्या यात्रेस तो आपल्या बापाप्रमाणें समुद्रांतून निघाला, यावरून त्याचें नाविक सामर्थ्य फार मोठें असलें पाहिजे. प्रस्तुत प्रवासाचें वर्णन पुढीलप्रमाणें आढळतें.

वाटेंत 'गोंव्यावरून जातांना तेथील चुनेगच्ची वाडे, रस्ते, पागा, बाजार-पेठा, वारयोषितांचा मोहल्ला व तलाव नेत्रांना संतोष देत होते. त्यांकडे दृष्टी फेंकीत षष्ठीदेव मजेनें समुद्रांतून जात होता." षष्ठदेवास राज्योपभोग दीर्घकाळ लाभला. तो चालुक्यसम्राट जयसिंह दुसरा याचा महामंडलेश्वर असून इ. स. १०५० च्या सुमारास मरण पावला.

## जयकेशी पहिला

षष्ठदेव ऊर्फ षष्ठीदेव याच्यामागून त्याचा पुत्र जयकेशी पहिला हा गादीवर बसला. त्यानें गोपकपट्टण म्हणजे गोंवें ही आपली राजधानी केली. त्याचें आरमार प्रबळ असून तो स्वतः नौकानयनांत कुशल होता. यामुळें आसपासचीं बेटें व बंदरें यांतील राजे व अधिकारी त्याजपुढें नमून असत. जयकेशी हा चालुक्यराजा सोमेश्वर याचा मांडलिक होता. तो आपणास कोंकणाधिपति म्हणवूं लागला. त्यानें कपर्दिकाद्वीपाच्या राजास मारलें, चोलांचा नाश केला, कदंबांची जूट जमविली, चालुक्यांना राज्य मिळवून दिलें व अलुपांना जिंकलें असें वर्णन आढळतें. कपर्दिकाद्वीपाच्या ज्या राजास जयकेशीनें ठार मारलें तो राजा मुम्मुणी असावा. इ. स. १०५९ च्या सुमारास कोंकणचे राजे आपणांवर मोठें संकट आल्याचें कबूल करतात. कारण इ. स. १०९५ मधील एका लेखांत अनंतदेव शिलाहार यानें पापराशीच्या ( कदंब ) रक्तानें विटाळलेली तलवार समुद्रांत टाकली असा उल्लेख आहे. चोल व चालुक्य यांजमधील लढ्यांत जयकेशीनें चालुक्यांना मदत करून तो चोलांच्या पराभवास कारण झाला व म्हणून चालुक्यराजाची गादी त्यानें राखली असा वरील वर्णनाचा भावार्थ दिसतो. चालुक्य व कदंब यांची मैत्री या प्रसंगानें जमली.

जयकेशीच्या कारकिर्दीत गोंवें नगर चांगलेंच भरभराटलें. देगवें येथील शिवाचित्ताच्या लेखांत जयकेशीच्या अमदानींत गोंव्याचें वर्णन येणेंप्रमाणें केलें आहे. 'त्याच्या राजधानींतील मार्ग ज्यांत पंडित विराजमान झाले आहेत

अशा पालख्यांनीं फुलून गेले होते. 'पालख्यांना पेलून धरावयाच्या काठ्या रत्नखचित होत्या व पंडितांच्या कानांत सुवर्णकुंडलें झळकत होतीं.' नंदनवनाचें वैभव गोंव्यास प्राप्त झाल्याचेंहि वर्णन एके ठिकाणीं आढळतें. सिंहलद्वीप, चौल, झांजिबार, पांड्य, केरळ, बंगाल, गुजराथ, लाट, गोदावरी नदीजवळचें पिष्ठापूर, चन्द्रपूर यांजबरोबर गोंव्याचा मोठा व्यापार चालत असे. यावेळीं गोंव्यास महमदाचा नातू सदानो (Sadano) विद्यमान असून त्यास जयकेशीनें कोंकणचा प्रधान (Governor) नेमलें होतें. तो दूरदर्शी, न्यायी, उदार, गणितज्ञ व कला (four recourses & seven solicitudes) यांत निपुण होता. त्यानें आपल्या शहाणपणाच्या कारभारानें व नमुनेदार वर्तनानें राज्यांतील तंटे-बखेडे मोडून टाकले व शत्रूंना शासन केलें. या गुणांनीं सदानो अतिशय लोकप्रिय झाला. त्याचें राजकारण-पटुत्व पाहून जयकेशीच्या इतर प्रधानांनीं आपल्या खात्यांतूनहि त्यास हवी ती ढवळाढवळ करूं दिली. सारांश सदानो गोंव्याच्या राज्यांत सर्वाधिकारीच बनला. त्यानें शक ९७५ वैशाख तृतीया शुक्रवार या दिवशीं (इ. स. १०५३) गोंव्यांत एक लंगरखाना (मुसलमानी पद्धतीचा) उघडला. त्यांत दीन, अनाथ, पंगू यांच्या अन्नआच्छादनाची व्यवस्था करण्यांत आली. त्यासाठीं सदानो यानें बंदरांत येणाऱ्या जहाजांवर व व्यापाऱ्यांवर धर्मादायपट्टी बसविली. कोणी निपुत्रिक मरण पावल्यास त्याची मालमत्ता या लंगरखान्याकडे जमा करण्यांत येऊं लागली. त्यांतून बेवारसी मृतांच्या मूठमातीचीहि व्यवस्था होत असे.

## गुहल्लदेव तिसरा

जयकेशी पहिला याच्या मृत्यूनंतर शक १००३ (इ. स. १०८२) त त्याचा पुत्र गुहल्लदेव तिसरा गादीवर बसला. त्याची अनंतपाल शिलाहार याजबरोबर लढाई होऊन तींत कवडीद्वीप कदंबांच्या ताब्यांतून गेलें. ही गोष्ट शक १०१६ त (इ. स. १०९४) घडली.

## विजयादित्य

गुहल्लदेवामागून त्याचा भाऊ विजयादित्य यास गादी मिळाली. विजयादित्याच्या भार्येचें नांव चत्तलदेवी. तिला जयकेशी दुसरा व विज्जलादेवी अशीं दोन जुळीं मुलें झालीं.

## जयकेशी दुसरा

जयकेशी दुसरा इ. स. ११०४ मध्यें राजपदावर चढला. त्याच्या कारकिर्दीत गोंवेंकर कदंबांची सत्ता कळसास पोंचली. त्यानें कारकिर्दीच्या प्रारंभीं चालुक्यांचें वर्चस्व झुगारण्याचा प्रयत्न केला. होयसळ राजा विष्णुवर्धनहि त्याच उद्योगांत होता. त्यानें चालुक्यांच्या मुलुखावर स्वारीच केली. विष्णुवर्धन कृष्णानदीपर्यंत चालून आला. त्याचा सेनापति (दंडनायक) गंगराज यानें चालुक्य सम्राट विक्रमादित्य सहावा हा कन्नेगल येथें तळ देऊन असतां त्याच्या सैन्यास खडे चारले. चालुक्यांच्या या पराभवाबरोबर बरेच मांडलिक राजे चालुक्यांवर उठले व त्यांत जयकेशीनें सामील होऊन कोंकणचक्रवर्ती अशी स्वातंत्र्यनिदर्शक पदवी घेतली. विक्रम या संकटानें मुळींच डगमगला नाहीं. त्यानें आपला विश्वासू मांडलिक सिंदराजा अचुगी दुसरा, यास वरील मांडलिक राजांविरुद्ध पाठविलें. त्यानें विष्णुवर्धनाचा मोड करून गोंवें घेतलें. जयकेशीचा सेनापति लक्ष्म यास पळवून लावलें, पाण्ड्यांचा पाठलाग केला, मलपांस दाही दिशांना उडविलें व कोंकण घेतलें. इतकेंच नव्हे, तर गोंवें व उप्पिनकट्टी या गांवांना आगीहि लावून दिल्या. पण विक्रमानें हा बिघाड विकोपास जाऊं न देतां जयकेशीस आपल्या अंकित आणून त्यास आपली कन्या दिली.

अशा रीतीनें सम्राटाचा जांवई झालेला जयकेशी प्रबल झाला व त्यानें राज्यविस्तारहि बराच केला. त्याच्या राज्यांत हनगळ ५००, वेळुग्राम ७०, हैवे ५००, कोंकण १। लाख, कोंकण ९०० व पळसिगे १२००० यांचा समावेश झाल्याचें वर्णन आढळतें. जयकेशी हा आपला राज्य-

कारभार इ. स. ११३५ त शहाणपणानें चालवीत असल्याचें दिसून येतें. या कामीं त्यास त्याचा मोठा अधिकारी लक्ष्मणराज याची फार मदत झाली. लक्ष्मणराज मूळ विक्रमादित्याचा नोकर असून त्याचा प्रधान व दंडनायक होता. विक्रमाची कन्या मैळालदेवी हिचें लग्न जयकेशीशीं झाल्यावर तिच्या तैनातीस त्यानें त्यास मुक्काम दिलें.

जयकेशीचा चालुक्यांशीं समेट झाला तरी त्याला होयसळ विष्णुवर्धन याजकडून उपद्रव होण्याचें बंद पडलें नव्हतें. त्यानें इ.स. ११३३ च्या सुमारास जयकेशीपासून हनगळ व हळसी हे प्रांत घेतले. ११३६ त पळसिगें १२००० हाहि प्रांत त्यानें बळकावला. तथापि जयकेशीनें हा अपमान निमुटपणें सहन न करतां गेलेला मुलूख परत मिळविण्यासाठीं विष्णुवर्धनाबरोबर झगडा चालूच ठेवला होता. होयसळ व कदंब यांजमधील कलहाचा फायदा घेऊन उत्तर शिलाहार राजा अपरार्क यानें कोल्हापूरचा शिलाहार राजा विजयादित्य याच्या मदतीनें कदंबांच्या ताब्यांत गेलेला प्रदेश काबीज करून आपलें आसन स्थिर केलें. जयकेशी इ. स. ११४७ च्या सुमारास मरण पावला. जयकेशिन् यास मैलाळदेवीपासून पेर्माडी व विजयादित्य दुसरा, असे दोघे पुत्र झाले. शिव व विष्णु याजवरील भक्तीमुळें त्यांस शिवचित्त व विष्णुचित्त असें अनुक्रमें म्हणत. पेर्माडी याला मलवरमारिन् म्हणजे घाटावरच्या लोकांना मारणारा अशी पदवी होती. विजयादित्याला त्याच्या विद्येवरून वाणीभूषण वा सरस्वतीभूषण या संज्ञेनेंहि ओळखीत. विजयादित्याच्या राणीचें नांव लक्ष्मीदेवी व पेर्माडीच्या राणीचें नांव कमलादेवी. कमलादेवीनें संपगाव तालुक्यांतील देगावें ( Dēgāmve ) येथील कमलनारायण व महालक्ष्मी यांचें सुंदर देवालय इ. स. ११४७ च्या सुमारास बांधलें. पेर्माडी व विजयादित्य हे दोघे बहुधा एकाच वेळीं राज्य करीत असून त्यांच्या ताब्यांत पळसिगे १२०००, कोंकण ९०० व वेळुग्राम ७० हा प्रदेश होता. इ. स. ११६३ च्या लेखावरून पेर्माडी गोंव्यास राज्य करीत असल्याचें दिसून येतें.

कमलादेवी ही पेर्माडीची पट्टराणी. तिच्यामुळें पेर्माडीच्या राजवटींत विद्याभिवृद्धीस पुष्कळ उत्तेजन मिळालें. पेर्माडीनें तिच्याच प्रोत्साहनानें राज्यांत कित्येक अग्रहार स्थापले. त्यांत वेद, वेदांगें, न्याय, मीमांसा, सांख्य, योग, वेदान्त, स्मृति, इतिहास, पुराणें व ज्योतिष यांचा अभ्यास होत असे. पेर्माडीच्या ताब्यांत पूर्वकारकिर्दींतील वेळुग्राम ७० इत्यादि प्रदेश होता. घांटावरील लोकांचें त्यानें पारिपत्य केलें म्हणून त्यानें आपणांस 'मलवरमारिन्' अशी पदवी धारण केली. यांतील मलव याचा अर्थ मावळ, म्हणजे देशावरील पश्चिमभाग. चालुक्यांचा पाडाव होईतों इ. स. ११५६ पर्यंत पेर्माडी त्यांचा मांडलिक राहिला. त्यांच्यानंतर कलचुरी हे सम्राट् झाल्यावर इ. स. ११८१ मध्यें आहवमल्ल कलचुरी यानें दंडनायक चंडुगीदेव यास गोंवेंकर कदंबांना शरण आणण्याकरितां पाठविलें. त्यानें विजयादित्याचा म्हणजे विष्णुचित्ताचा मुलुख जाळून टाकला. यावेळीं पेर्माडी मरून विष्णुचित्त एकटाच कारभार पाहात असावा. यानंतर होयसळ व कलचुरी यांचें युद्ध जुंपून होयसळ राजा वीर बल्लाळ दुसरा, यानें कलचुरींचा पराभव केला. त्यामुळें विजयादित्य याच्या नशिबीं होयसळांचें मांडलिकत्व पत्करण्याचें आलें. पुढें हेंहि पारडें फिरून हनगळचा कदंब राजा कामदेव यानें गोंव्यावर स्वारी करतांच विजयादित्य कामदेवाचा अंकित बनला. अशा रीतीनें शिवाचित्त व विष्णुचित्त या दोघां भावांची कारकीर्द अपेशी ठरून कदंब सत्ता संपुष्टांत आली.

## जयकेशी तिसरा

विजयादित्यानंतरचा कदंबराजा त्याचा पुत्र जयकेशी तिसरा इ. स. ११८७ च्या सुमारास राज्यारूढ झाला. त्याच्या भार्येचें नांव महादेवी. तिच्यापासून त्याला त्रिभुवनमल्ल हा पुत्र लाभला. जयकेशीच्या अमदानींत महत्त्वाचें वृत्त कोणतेंच घडलें नाहीं. तो इ. स. १२१२ त मरण पावला. त्याला सुमारें २५ वर्षे राज्योपभोग घ्यावयास मिळाला. त्याच्या ताब्यांतून वेळुग्राम ७० हा प्रांत गेला. हा प्रांत सौंदत्तीचा रट्ट राजा कार्तवीर्य चौथा याच्या अंमलाखालीं इ. स. ११९९ पासून आला.

## त्रिभुवनमल्ल

जयकेशीच्या मृत्यूनंतर त्रिभुवनमल्ल यास राज्य मिळालें. त्यावेळीं होयसळ व देवगिरीचे यादव यांजमध्यें युद्धप्रसंग सारखे घडत असल्यामुळें त्रिभुवनमल्लाच्या वाटेस जाण्यास त्यांना फुरसतच मिळाली नाहीं. शेवटीं हा झगडा संपून यादवांपुढें होयसळांना हार खावी लागल्यावर यादवांची दृष्टी गोंवेंकर कदंबांकडे वळली. सिंघण यादवाचा दक्षिणेकडील सेनापति व सामंत बिचण्ण यानें रट्ट, पाण्ड्य, होयसळ व इतर राजेरजवाडे यांचा मोड करून कदंबांवर इ. स. १२३७ त स्वारी केली. तींत त्रिभुवनमल्ल लढत असतां कामास आला, व कदंब राज्य बुडून त्याचा सारा प्रदेश यादवांच्या साम्राज्यांत सामील झाला.

## षष्ठीदेव तिसरा

त्रिभुवनमल्लानंतरचा राजा त्याचा पुत्र षष्ठीदेव तिसरा. त्यास गेलेलें राज्य कांहींसें परत मिळविण्यास संवदत्तीचा रट्ट राजा कामदेव याची मदत झाली असावी असें दिसतें. ही गोष्ट सिंघण यादव मेल्यावर झाली असली पाहिजे. पण षष्ठदेवाचें डोकें वर निघतें न निघतें तोंच त्याजवर यादवांनीं पुनः गहजब करून त्यास काबूंत आणिलें व कोंकण भागावर सन १२७२ च्या सुमारास आपले अधिकारी नेमले. उत्तर कोंकणांतील साष्टीचा अधिकारी महाप्रधान अच्युत नायक त्यांपैकीं होय. त्यापुढें इ. स. १२८९ त कृष्णदेव हा अधिकारी उत्तर कोंकण, दक्षिण कोंकण व गोंवें या सबंध कोंकण पट्टीचा कारभार पाहात होता. इ. स. १३१० त यादवांचाहि पराभव करून मलिक काफर यानें गोंवें प्रांत मुसलमानी अंमलाखालीं आणल्याचें दिसतें.

## उपसंहार

गोंवेंकर कदंब यांच्या राज्याचा प्रमुख प्रदेश जो गोंवें प्रांत तो सृष्टिसौंदर्यानें नटलेला आहे. त्यांत खाडीरूपानें मोठ्या बनलेल्या नद्या वाहात असून

एखादें उद्यान भिजविण्यास कुशल माळ्यानें हजाऱ्या धरावा त्याप्रमाणें खालील तळप्रदेशांतील नारळी, पोफळी, आंबा, रातंबा, वेत, काजू यांच्या बनलेल्या हिरव्यागार छतावर दूधसागराच्या धबधब्यांतून जणूं काय जलधारांचा वर्षावच होत आहे. गोंव्याप्रमाणेंच बेळगांव, खानापूर ( पळसिगें ), संपगांव, शिरसी, सावनूर, कारवार ( हैवे ) शिमोगा, धारवाड, हुबळी, इत्यादि प्रांतहि कांहीं काळ कदंबांच्या ताब्यांत होता. या प्रांतांतील बराच टापू अरण्यांनीं व्यापलेला असून त्यांतून बागबगीचे, मळे, तळीं, नद्या व गिरिशिखरें पाहात हिंडतांना आपण नंदनवनांतून वा तपोवनाशेजारून विहरत असल्याचा आनंद व आल्हाद होतो. हा प्रदेश आजहि समृद्ध व हृदयंगम आहे. मग कदंबांच्या राजवटींत त्यांत ब्रह्मवृंद अग्रहारांतून व तपोधन आश्रमांतून राहात असतील, तेव्हां दुष्यन्तानें पाहिलेल्या कण्वाश्रमाचें व मालिनी नदीचें पुण्यस्मरण तत्कालीन रसिकास कसें होत नसेल ? जयकेशी तिसरा याचा, मुंबईंतील प्रिन्स ऑफ वेल्स वस्तुसंग्रहांत ( म्यूझियम ) एक कानडी शिलालेख आहे. त्यांत खानापुराजवळील हळसिगे नाड ( पळसिगें ) या सह्याद्रीच्या लगत्यामधील प्रदेशाचें रसभरित वर्णन केलें आहे. त्यांतून घेतलेला एक ल्हानसा चुटका येथें मासल्याकरितां मराठींत देतों. " हळसिगे देश काय चमकत आहे ! तो या सृष्टीचें भूषण होऊन राहिला आहे. वृक्षवेली, तरुलता, पानें-फुलें, नारळी– पोफळीचीं आगरें, आंबराया, निंबोण्या, कमलवनानें झांकलेलीं सरोवरें, नद्या व पाण्याचा खळखळाट, पुलिंदे, नगराशेजारचीं उपवनें या सर्वांना इन्द्राच्या नंदनवनाचीच उपमा साजेल.

" एकादा ओहोळ वाहात येतो व जलाशयांत निमग्न होऊन पुनः वाहूं लागतो. त्याच्या पाण्यावर पोसलेल्या केळी, फोफळी, नारळी, निंबोण्या याना फळांनीं गजबजल्यामुळें त्या नीलनभ झांकून टाकतात. या संभारानें तेथील रहिवाशांना सुखाचा अक्षय झराच लाभला आहे.

" या उपवनांत येथें ही नारळी (arcca) फलभारानें लवली आहे; तेथें त्या वेली फळांचें ओझें सहन न झाल्यामुळें भूमीवर निजल्या आहेत.

येथें एका तरूनें आपले कोंवळे कोंब इतस्ततः आकाशांत झोंकून दिले आहेत. तेथें ती पल्लवाच्छादित लता एका वृक्षापासून दुसऱ्या वृक्षापर्यंत पसरल्यामुळें तिच्याखालीं गडद अंधार दाटला आहे. या अंधारांतून फिरणारा वाटसरू वाट चुकून कुंपणापाशीं गेला व अडकून राहिला. तो सहाय्यार्थ आरोळ्या ठोकूं लागला, त्या वाऱ्याबरोबर ऐकूं येऊन तेथें माळी आला. त्यानें पानें तोडलीं व उपहासपूर्वक वाटसरूकडे पाहून त्याला बाहेर काढलें. ''

कदंबांच्या राज्यांत व्यापारी वर्ग भरभराटींत होता. गोपकपुरी (गोंवें) बेलगामी, वनवासी, हळसी, वेलुग्राम (बेळगांव) हीं मुख्य नगरें होतीं. गांवांतील लोक जातिपरत्वें वेगळाल्या भागांत राहात. अस्पृश्य वस्ती तुटक असे. गावडा हा गांवाचा मुख्य. गांवांत पंचायत असून गांवाची व्यवस्था तिजकडे असे. गांवाचें रक्षण, तळीं, विहिरी यांचा बंदोबस्त, तंटे तोडणें व इनाम जमिनीची व्यवस्था पाहाणें हीं कामें पंचायत करी. मोठ्या नगरांचा कारभार तेथील म्युनिसिपालिटीसारखी तत्कालीन संस्था पाही. नगरांतील घरपट्टी व इतर कर वसूल करणें, दंड वसूल करणें इत्यादि कामें त्यांचीं असत. गोपकपुरी अथवा गोपकपट्टण हें मुख्य बंदर असून तेथें व इतरत्र सोनें, चांदी, कापड, तांदूळ, मिरीं, फळें, गळिताचीं धान्यें, कापूर, सौगंधिक द्रव्यें, विड्याचीं पानें यांचा व्यापार चाले. राज्यांत सूत कांतणें, कापड विणणें, पितळी सामान, जवाहिरी, लोखंडी सामान बनविणें, तेल काढणें, टोपल्या विणणें इत्यादि धंदे लोक करीत. वैश्य, कारागीर, सुतार, लोहार, सोनार, विणकर, कुंभार, तेली या प्रत्येक जातीची श्रेणी (संघ) असून प्रत्येक श्रेणीपाशीं स्वतःच्या पेढ्या व निधि असत. नगरांतील व्यापाराचीं सूत्रें श्रेणीच्या हातीं असत. तेथील उत्सव व समारंभ तेच करीत. किंबहुना नगराचें स्थानिक स्वराज्य तेच चालवीत.

---

# प्रकरण चौदावें

## महाराष्ट्राबाहेरचीं राज्यें

### ( उत्तर हिंदुस्थान )

### यवन, शक व पह्लव

हिंदुस्थानावर शिकंदर बादशहाची स्वारी खि. पू. ३२६ त झाली. शिकंदर हा मॅसिडोनियाचा रहिवासी. मॅसिडोनिया सांप्रत ग्रीसचा भाग आहे व पूर्वीहि तो इतरांकडून ग्रीस देशांतच गणला जात होता. त्यामुळें व त्याच्या सैन्यांत ग्रीक लोक असल्यामुळें त्याला व ग्रीकांना भारतीयांनीं एकच समजावें यांत गैर कांहीं नाहीं. परंतु भारतीय ज्यास यवन म्हणून संबोधीत त्या यवन शब्दाची उत्पत्ति आयोनियनपासून झाली आहे. आयोनियन बेटेंहि ग्रीसपाशींच आहेत. वास्तव आयोनियन बेटांत व त्यांच्या आसपासच्या प्रदेशांत राहाणारे ते भारतीयांच्या मतें यवन ठरले. शिकंदर हिंदुस्थानावर स्वारी करून परत गेल्यावर ग्रीसपासून हिंदुस्थानापर्यंत ग्रीकांचीं राज्यें बऱ्याच स्थळीं स्थापन झालीं. काबूळ नदीची दरी, वायव्य सीमाप्रांत व पंजाब यांवरहि ग्रीकांचा अंमल होता. या अनेक कारणांनीं ग्रीकांचा अर्थात् यवनाचा हिंदुस्थानाशीं निकट संबंध येऊन यवन लोक हिंदुस्थानाच्या पश्चिम भागांत स्थायिक बनले व कालांतरानें भारतीयांशीं एकरूप झाले.

अशोकाच्या शिलालेखांत यवन हा शब्द मॅसिडोनिया, मिसर, एपिरस व सीरिया येथील राजांना लावला आहे. पण सामान्यतः यवन म्हणजे ग्रीक किंवा ग्रीकाचे वंशज. ग्रीक राज्यें व हिंदुस्थान यांच्यामध्यें इराणी साम्राज्य पसरलें असल्यामुळें ग्रीकांचा संबंध हिंदुस्थानाशीं प्रथम इराणामार्फत येत असे. आयोनियांतील रहिवाशांना इराणी लोक यवन म्हणत असल्यामुळें इराणामार्फत

तेंच नांव हिंदुस्थानांत रूढ झालें. फार काय, पण वायव्येकडून जे लोक हिंदुस्थानांत येत त्या सर्वांना भारतीयांनीं सरास यवनच म्हणावें. हिंदुकुश पर्वतापलीकडच्या प्रदेशास बॅक्ट्रिया हें नांव होतें. तेथें यवनांची सत्ता बहुतकाळ स्थापन झाली होती. तिकडूनहि कांहीं यवन पंजाबांत उतरले. यवन हा शब्द पाणिनीच्या सूत्रांत सांपडतो. यावरून शिकंदरापूर्वींपासून यवनांशीं भारतीयांचा संबंध असल्याचें दिसून येतें.

तक्षशिलेस यवनांची राजधानी कांहीं काल होती. तेथील यवन राजा अँटिआल सिडस हा असतां त्याचा वकील हीलिओडोरस माळव्यांत विदिशेच्या राजाकडे आला होता. त्याचा विदिशेपाशीं ( भिलसा ) बिसनगर येथें श्रीकृष्णाप्रीत्यर्थ उभारलेला स्तंभ अद्यापि आहे. हीलिओडोरस यानें सनातनधर्म स्वीकारला होता. त्याप्रमाणें इतर असंख्य यवनांनीं तो स्वीकारला. त्यावेळीं भिल्शाचा राजा काशीपुत्र भगभद्र हा होता.

## शक

हिंदुस्थान, इराण व इराक हे देश सहस्रावधि वर्षांपासून कमी अधिक प्रमाणानें सुधारलेले आहेत. त्याशिवाय हिंदुस्थानाच्या पश्चिमेकडील इतर देश हल्लींप्रमाणें पूर्वींहि रानटीच होते. यांत बहुधा फिरत्या टोळ्या राहात. त्या टोळ्यांच्या नांवांप्रमाणें त्या देशांचींहि नांवें बदलत. बॅक्ट्रिया, सीथिया, पार्थिया हे त्यांपैकींच देश होत. बॅक्ट्रियाप्रमाणें इतर प्रदेशांत ग्रीक राहात असत. त्यास यवन हें नांव देण्यांत आलेंच होतें. त्याशिवाय सीथियांतून आले त्यांना सीथियन ऊर्फ शक व पार्थियांतून आले त्यांना पार्थियन ऊर्फ पहलव ही संज्ञा प्राप्त झाली. शक लोक हिंदुस्थानांत येण्यापूर्वी मध्य आशियांत सरदारिया नदीच्या कांठीं वास्तव्य करीत होते. या लोकांना इराणी लोकहि भारतीयांप्रमाणें शकच म्हणत. शकांची वस्ती हिंदुस्थानासारखी इराणांतहि झाली. शकांचा अंमल ते हिंदुस्थानांत आल्यावर प्रारंभीं तक्षशिलेस होता. तेथून ते साऱ्या पश्चिम हिंदुस्थानांत

पसरले व भारतीय समाजांत कालान्तरानें अन्तर्धान पावले. हिंदुधर्म स्वीकारल्यावर ते आपणांस क्षत्रिय म्हणवूं लागले. ते आपल्या नांवास वर्मन् व दत्त हे प्रत्यय लावीत. शक अफगाणिस्थानाच्या भागांत राहिल्यावर त्या भागास शकस्तान म्हणण्यांत आलें. ते सिंधांत गेले तेव्हां त्यांच्यावरून सिंध देशाच्या कांहीं भागास शकद्वीप हें नांव पडलें. सुराष्ट्र व माळवा यांत शकांचें राज्य इ. स. च्या दुसऱ्या शतकापासून चौथ्या शतकापर्यंत होतें.

पह्लवांचा अंमल तक्षशिलेवरहि होता. ते आपल्या नाण्यांवर ग्रीक भाषा वापरीत. शक व पह्लव हे दोघेहि आपल्यातर्फे क्षत्रप नेमून त्यांजमार्फत राज्य करीत. हल्लीं ज्यांना पठाण म्हणतात ते पार्थियनच म्हणजे पह्लव होत.

## मौर्य घराणें

उत्तर हिंदुस्थानाच्या उपलब्ध इतिहासाची सुरुवात मौर्यांपासून होते. मौर्य वंशांतील प्रसिद्ध राजा चन्द्रगुप्त हा अलेक्झांडराचा समकालीन होता. अलेक्झांडराची हिंदुस्थानावरील स्वारी खि. पू. ३२६ त झाली. चंद्रगुप्ताच्या आईचें नाव मोरिया ( मुरा ); त्यावरून त्याचें आडनांव मौर्य पडलें. मुद्राराक्षस नाटकांत चन्द्रगुप्त व त्याचा गुरु आर्य चाणक्य हीं दोन प्रमुख पात्रें आहेत. पैकीं आर्य चाणक्यानें अर्थशास्त्र हा जगप्रसिद्ध ग्रंथ रचिला. चन्द्रगुप्ताच्या राज्यांत हिमालय व विन्ध्य पर्वत यांजमधील प्रदेश व हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेकडील अफगाणिस्थानाचा भाग मोडत होता. मौर्य साम्राज्य पाश्चिमात्यांना माहीत होतें. मौर्यांच्या पाटलीपुत्र ह्या राजधानींत सीरिया व मिसर ( इजिप्त ) या देशांचे वकील असत. प्रसिद्ध लेखक मेग्यास्थेनिस हा पाटलीपुत्रास सीरियातर्फे वकील होता. चंद्रगुप्ताची कारकीर्द खि. पू. ३२१ ते २९७ पर्यंत झाली. त्याजपाशीं सहा लक्ष पायदळ, वीस सहस्र घोडेस्वार, नऊ सहस्र हत्ती व रथ होते.

चंद्रगुप्तामागून त्याचा पुत्र बिंदुसार गादीवर बसला. बिंदुसाराच्या दरबारीं सीरियाचा ग्रीक राजा सेल्यूकस निकेटर याचा वकील दायमेकस हा होता

बिंदुसारानें त्याजमार्फत ग्रीकांपाशीं उत्कृष्ट मद्य, अंजीर व तत्त्ववेत्ता यांची मागणी केली होती म्हणतात. पैकीं मद्य व अंजीर बिंदुसारास त्यांजकडून मिळाले असावे. पण तत्त्ववेत्ता मात्र मिळाला नाहीं. कारण ग्रीकांच्या मतें तत्त्ववेत्ता हा क्रयविक्रय करण्याचा पदार्थ नव्हे. बिंदुसारानें पंचवीस वर्षे राज्य केलें. त्याच्या कारकिर्दीत चंद्रगुप्ताच्या वेळचें राज्य कमी न होतां थोडें वाढलेंच. त्याच्या हयातींत तक्षशिलेस त्याजविरुद्ध बंड झालें, तें त्यानें आपला पुत्र अशोक यास पाठवून मोडलें.

बिंदुसारामागून खि. पू. २७४ त त्याचा पुत्र अशोकवर्धन ऊर्फ अशोक गादीवर बसला. त्यानें गादीवर आल्यानंतर नवव्या वर्षी कलिंग देश व गंजम प्रदेश जिंकला. या स्वारींत एक लक्ष लोक मारले गेले. शिवाय लुटालुटींत व जाळपोळींत कित्येक लक्ष माणसें मरण पावलीं. त्यायोगें त्याच्या विचारांत क्रांति घडून बौद्धपंथीय अहिंसातत्त्वाकडे त्याचा कल झुकला. पुढें दोन वर्षांनीं तो बौद्ध पंथाचा सभासदच झाला. सभासद या नात्यानें बौद्धभिक्षूंप्रमाणें अथवा जैन पंथीयांप्रमाणें तो गांवोंगांवीं धर्मचर्चा करीत हिंडला. त्या प्रवासांत ब्राह्मण, यती व वृद्ध यांस त्यानें दानें दिलीं व वादविवाद केला. हा दौरा संपवून परत आल्यावर बौद्ध तत्त्वांप्रमाणें वागण्यासाठीं त्यानें आपल्या अधिकाऱ्यांना उद्देशून आज्ञापत्रें काढलीं, व कांहीं आज्ञापत्रें दगडावर खोदूनहि ठेवलीं. हे लेख काश्मीर, सिंध, अफगाणिस्तान, कोंकण, काठेवाड, ओरिसा, बंगाल, पंजाब, हिमालय, म्हैसूर, माळवा इत्यादि प्रदेशांत आढळतात. त्यांपैकीं जुनागडापाशीं गिरिनार पर्वतावरचा, ओरिसांत ढवळीचा, माळव्यांत सांचीचा व कोंकणांत सोपाऱ्याचा यांचीं नांवें सांगतां येतील. हे लेख कोठें खडकावर व कोठें स्तंभांवर खोदलेले आहेत. गिरिनार पर्वतावरचा लेख खडकावर आहे. सांचीचा लेख स्तंभावर आहे. सांचीची एक टेंकडीच आहे. तिची उंची तीनशें फूट आहे. त्यावर अशोकाचा फारच प्रसिद्ध स्तूप असून त्या स्तूपापाशीं हा

चाळीस फूट उंचीचा स्तंभ आहे. त्याची लिपी ब्राह्मी आहे व त्याचा दगड गंगा, यमुना व बेतवा या तीन नद्यांपलीकडून आणिलेला आहे.

सांचीहून महाराष्ट्राला अगदीं नजीकचा लेख सोपाऱ्याचा. सोपारें हें लहानसें खेडें वसईजवळ आहे. त्याचें संस्कृत नांव शूरपारक. डोंगरांच्या दोन रांगांमध्यें सोपारें असून तिसऱ्या अंगास खाडी असल्यामुळें त्या प्रदेशाला सुपाचा आकार आला आहे. तेथील अशोककालीन स्तूप अलीकडे पूर्णपणें पुराण-वस्तु-खात्यानें उकरून काढला. त्याच्या डेऱ्याचा घेर २७५ फूट व उंची १०० फूट आहे. इतक्या विस्तीर्ण घेराचा स्तूप मुंबई इलाख्यांत हा पहिलाच. या स्तूपाच्या आसपास लोकांनीं नवसासाठीं वाहिलेले विटांचे लहान स्तूप बरेच उकरून निघाले आहेत. त्याच्या भोंवतालीं घातलेलें कुसूं बारा फूट जाड व दगडी आहे. स्तूपावर जो शिल-लेख होता, तो मुंबईस रॉयल एशियाटिक सोसायटीच्या इमारतींत ठेवला आहे. हा दगड निळसर रंगाचा ( Basalt ) आहे. एकंदर लेख गिरिनारच्या लेखासारखा आहे. त्याचा अर्थ येणेंप्रमाणें :– ' प्राचीन काळापासून राजांचा प्रघात मृगया किंवा इतर करमणुकी यांकरितां दौऱ्यावर जाण्याचा आहे. पण राजा प्रियदर्शी ( अशोक ) यानें सिंहासनाधिष्ठित होऊन दहा वर्षें झाल्या-नंतर धार्मिक दौरा काढला. त्याला सत्यज्ञान झालें आहे. तो आपल्या दौऱ्यांत ब्राह्मण व भिक्षू यांना भेटतो, त्यांस दक्षिणा देतो, वृद्धांना भेटून त्यांस सुवर्णदान करतो, धर्म व प्रजा यांच्या रक्षणाची काळजी घेतो व धर्माची चौकशी करून धर्मोपदेश देतो. या उपायांनीं देवांना प्रिय असा जो प्रियदर्शी त्याचा संचार राज्याच्या निरनिराळ्या भागांना सुखाचा होतो.'

अशोक आपणांस देवांना प्रियः व प्रियदर्शी असें म्हणवितो. नाशीकच्या पांडुलेण्यांत श्री शातकर्णीनेंही आपणांस प्रियदर्शीच म्हणवून घेतलें आहे. अशोकाला भाऊ बहिणी पुष्कळ होत्या. बाप राज्यावर असतां अशोक

उज्जयिनीस सुभेदार होता. त्याला मुख्य दोन राण्या व इतर अनेक स्त्रिया होत्या. पुत्र चार असावे. त्याजकडे तक्षशिला, उज्जयिनी, म्हैसूर व तोसाली येथील सुभेदाऱ्या वेळोवेळीं देण्यांत आल्या. पाटलीपुत्र ही त्याची राजधानी. त्याच्या मुदपाकखान्याकरितां शेकडों प्राणी मारण्यांत येत असत. तें मान कमी करून मोर व हरिण यांच्या वधास त्यानें परवानगी दिली. तीहि पुढें त्यानें रद्द केली.

ग्रीकांच्या दरबारांत अशोक आपले दूत पाठवीत असावा. त्याच्या वेळीं सुराष्ट्र उर्फ काठेवाड येथें यवन राज्य करीत असत. साक्षात् अशोकाच्या ताब्यातील देशाला जनपद म्हणत. जनपदाचे विभाग प्रदेश, प्रदेशाचे विभाग आहार आणि आहाराचे विभाग विषय. विषय म्हणजे सरासरी तालुक्याएवढा भाग. तालुक्याच्या मुख्य गांवाभोंवतीं तट असून त्याला कोट (Kotta) म्हणत. प्रदेशाच्या मुख्याला प्रादेशिक, आहाराच्या मुख्याला राजुक म्हणत. राजुकाच्या हाताखालील अधिकाऱ्यांना पुरुष ही संज्ञा होती. राजा व त्याचे अधिकारी यांना मध्यवर्ती असलेल्या संस्थेचें नांव परिषद. ही अर्थशास्त्रांत सांगितलेली मंत्रिपरिषद किंवा मंत्रिमंडळ असावें. त्यावें कार्य राज्यात नवीं कामें सुरू करणें, सुरू केलेलीं संपविणें, संपविलेलीं सुधारणें व आज्ञापालन होतें कीं नाहीं हें पाहाणें असे.

राज्यांतील सर्व माणसांना अशोकानें स्वतःचीं मुलें मानावीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या कामांतील दोष उघडकीस आणण्यास त्यानें महामात्र नामक अंमलदार नेमले होते. गरिबांना न्याय मिळवून देणें व त्यांची काळजी वाहाणें हीं त्यांचीं कर्तव्यें असत. प्रजेला इहलोकीं सुख देणें व मृत्यूनंतर स्वर्गप्राप्ति करविणें हें आपलें प्रजाविषयक कर्तव्य असल्याचें अशोक सांगतो. राजुकाकडे प्रजेचीं ऐहिक व पारलौकिक अशीं उभयविध कामें होतीं.

अशोक आपल्या राजवाड्यांत साठ हजार भिक्षूंना भिक्षा घालीत असे. त्यानें राज्यांत ८४ हजार विहार बांधले. भिक्षूंकरितां त्यानें चार कर्तव्यें सांगितलीं आहेत. त्यांचा पोषाख साधा असावा, अन्न साधें असावें,

राहावयास झोंपडी असावी आणि त्यांनीं चिंतनाचा आनंद लुटावा ( Ashoka by D. R. Bhandarkar ). बौद्ध सांप्रदायांत फूट पाडूं नये अशी त्याची आज्ञा सारनाथ, कौसांबी व सांची येथील स्तंभांवर नमूद आहे. ( १ ) साधव ( साधुता ) ( २ ) अधःपातापासून रक्षण ( ३ ) दया ( ४ ) दान ( ५ ) सत्य ( ६ ) शुचिष्मता ( ७ ) मार्दव यांस तो धर्म समजत होता. हा धर्म आचरण्याचे मार्ग येणेंप्रमाणें—प्राणिहत्या करूं नये, प्राण्यांना पीडा देऊं नये, वडिलांची आज्ञा पाळावी, गुरूविषयीं आदर बाळगावा, मित्राशीं औदार्यानें व सभ्यतेनें वागावें, तसेंच परिचित, आप्त, ब्राह्मण व श्रमण यांच्याशींहि वागावें. दास व नोकर यांच्याशीं सभ्य वर्तन ठेवावें, मितव्यय व मितसंचय असावा, धर्मादाय कोणीही व कोणालाही करावा आणि मनोविकार ताब्यांत ठेवावे. संयम व भावसंशुद्धि हे उत्कृष्ट गुण आहेत.

अशोक बौद्ध होता तरी त्यानें जैनादि इतर सांप्रदायांतील स्वतःस पटणारीं तत्वें स्वीकारलीं. ब्राह्मण व श्रमण यांविषयीं आदर बाळगावा व त्यांना दान करावें हें त्याचें मत या प्रवृत्तीचेंच द्योतक होय. त्यानें यज्ञ बंद केल्याचें लिहिलें आहे. पण ही बंदी स्वतःपुरतीच कीं इतरांना होती याविषयीं स्पष्ट पुरावा नाहीं. राज्याभिषेकानंतर दहाव्या वर्षी अशोक भिक्षुसंघांत राहिला. संघाबरोबर तो गयेस बोधिवृक्षाच्या दर्शनास गेला. त्यानें अनेक देव व त्यांचीं सुखें सांगितलीं आहेत. त्याच्या देवांत अनेक श्रेणी आहेत. व त्या देवांचीं अनेक मंदिरेंहि आहेत. त्यानें असें सांगितल्या-मुळें व तसें वर्तन ठेवल्यामुळें बहुजन-समाजाची धर्माकडे व देवपूजेकडे स्वार्थबुद्धीनें कां होईना प्रवृत्ति झाली.

अशोकानें लोकोपयोगाचीं अनेक कामें केलीं. त्यानें रस्त्यांच्या कडेला वडाचीं झाडें लावलीं, आंबराया निर्मिल्या, आठ कोसांवर विहिरी खोदल्या व धर्मशाळा बांधल्या. लोकांनीं आपणाप्रमाणें अशींच परोपकाराचीं कृत्यें करावीं ही त्याची अपेक्षा होती. धर्मप्रसाराचें काम त्यानें स्वतः केलें व

अधिकाऱ्यांकडून करविलें. त्याचे अधिकारी हे अधिकारी होते व धर्मोपदेशकहि होते. त्यानें अहिंसाव्रतपरिपालन वाढवीत शेवटीं मांसाशनहि सोडलें.

अशोकानें एकंदर ८४००० आज्ञापत्रें काढलीं असें म्हणतात. ज्या प्रसिद्ध स्थळीं गौतमबुद्ध गेला होता त्या प्रसिद्ध स्थळीं त्यानें आपलीं आज्ञापत्रें शिलेवर खोदलीं. त्या स्थळांत त्यानें बुद्धाचे अवशेष वांटले. आजीविक पंथाकरितां त्यानें बराबर पर्वतांत लेणीं खोदलीं व आपल्या कारकिर्दीच्या पंधराव्या वर्षी बुद्धकनकमुनी याचा स्तूप वाढविला. हें स्थळ कपिलवस्तूपासून दूर नाहीं. त्याच्या काळीं बौद्धपंथांत १८ पोटपंथ उत्पन्न झाले होते. ते मोडून एकपंथ निर्मिण्याकरितां अशोकाच्या आश्रयानें पाटलीपुत्रास अशोकारामांत एक परिषद भरविण्यांत आली. तिचा अध्यक्ष मोगलीपुत्त तिस्स होता. परिषदेंतील वादविवाद नऊ महिने चालून अखेरचा निकाल स्थविर पंथास अनुकूल लागला. त्यानंतर बौद्धमतप्रचारार्थ अशोकानें देशोदेशीं प्रचारक पाठविले. पैकीं मध्यांतिक हा काश्मीर व गांधार देशांत, महादेव हा दक्षिण हिंदुस्थानांत, यवनधर्मरक्षित हा अपरांतांत (कोंकण), रक्षित हा वनवासी देशांत व महाधर्मरक्षित हा महाराष्ट्रांत पाठविण्यांत आला.

ब्राह्मण व श्रमण यांना अशोककाळांत सारखाच मान होता. अशोकाच्या वेळीं व्हावयाच्या धार्मिक विधींचें पुढीलप्रमाणें वर्णन आहे. ' आजारांत, लग्नांत, पुत्रजन्मांत, यात्रेंत व इतर प्रसंगीं नाना आचार लोक पाळतात. स्त्रिया याहीपेक्षां अधिक व क्षुल्लक आचार पाळतात. ' यक्ष, किन्नर, गंधर्व, चैत्य, नाग इत्यादिकांची पूजा त्याच्या काळीं होत असे. वनस्पत्याहाराकडे प्रवृत्ति वाढत होती. क्षत्रिय व वैश्य हे दोन वर्ण नष्ट झाले होते. शूद्र असा वेगळा वर्ण नव्हता. पशू व मनुष्यें या दोहोंकरितांहि अशोकानें औषधोपचाराची सोय केली होती.

आपल्या राज्याच्या सीमेवरील जिंकलेल्या लोकांना व गुन्हेगारांना सुधारण्याचाहि प्रयत्न त्यानें केला. त्यांजकरितां अधिकाऱ्यांना उद्देशून त्याचे

दोन संदेश निघाले. त्यांपैकीं एक जगन्नाथपुरी जिल्ह्यांतील ढवळीपाशीं व दुसरा गंजम जिल्ह्यांतील जौगडा येथें खोदला आहे. त्यांत त्यानें तिकडील लोकांविषयीं पैतृक भावना व्यक्त केली आहे.

अशोकाचें खास राज्य संयुक्तप्रांत व बिहार यांवर होतें. त्याचे उपराजे तक्षशिला, उज्जयिनी व कलिंग यांचा कारभार पाहात. त्याच्या राज्यापलीकडे वायव्य सीमाप्रांतांत गांधार, कांबोज व यवन यांचीं राज्यें होतीं. दक्षिणेस म्हणजे अवन्ती व कलिंग यांच्यापलीकडे महाराष्ट्रांत राष्ट्रिक, वऱ्हाडांत भोज, पैठणाकडे पेटनिक व पुलिंद यांनीं आपलीं राज्यें स्थापलीं होतीं. या शेजारच्या राज्यांशीं अशोक औदार्यानें वागे. त्यांच्यापलीकडे जीं राज्यें होतीं तीं स्वतंत्र होतीं.

अशोककालीन रस्ते सिंध-हैदराबाद ते उज्जयिनी २५० कोस, भडोच ते उज्जयिनी १०० कोस, उज्जयिनी ते बिसनगर (विदिशा) ६० कोस, बिसनगर ते भारहत ९२ कोस, भारहत ते कौसांबी ४० कोस, कौसांबी ते काशी ५० कोस, काशी ते पाटलीपुत्र ६७ कोस येणेंप्रमाणें होते. रस्ते बांधीव असून वायव्य सीमेपासून पाटलीपुत्रापर्यंत मोठा राजमार्ग होता.

अशोककाळीं व एकंदर मौर्यकाळीं नगरें विपुल होतीं. नगरांतील रस्त्यांना गटारें बांधून काढलेलीं असत. एका जातीच्या मनुष्यास दुसऱ्या जातींत प्रवेश मिळत नव्हता. व्यापाऱ्यांच्या श्रेणी ( Guilds ) होत्या. लोक मिताहारी, नेमस्त व आनंदी असत. पोशाख मूल्यवान् घालीत. चाणक्याचें अर्थशास्त्र व पतंजलीचें महाभाष्य ज्ञात होतें. ब्राह्मणांची ग्रांथिक भाषा संस्कृत असे. मात्र बौद्ध व जैन यांचे ग्रंथ प्राकृत असत. अनेक पंथ उत्पन्न झाले. बौद्ध मतामुळें धार्मिक विचारांना ऊत आला. लोकांना तो एक नादच लागला. कोणत्याहि जातीचा वा वर्णाचा मनुष्य घर सोडून बाहेर पडे आणि संन्याशांच्या किंवा भिक्षूंच्या टोळींत शिरून चर्चा व वादविवाद करीत देशांत हिंडत राही.

ब्राह्मणांचा मुख्य व्यवसाय अध्ययन व अध्यापन हा होता. असे ब्राह्मण अरण्यांत आश्रम बांधून राहात. हिंदूंत देवदेवता अनेक असल्या तरी त्यांत शिव आणि विष्णु यांचेच भक्त अधिक होते.

सैन्यांत कांहीं नोकर पिढीजाद व काहीं सरंजामी असत. कांहीं सैनिक आयत्या वेळीं भाड्याचे आणीत व कांहीं रानटी टोळ्याहि मदतीला घेत. पिढिजाद व सरंजामी सैनिक जातीनें क्षत्रिय असावे. सैन्याचे मुख्य विभाग हत्ती, घोडे, पायदळ, असे त्रिविध असत. राज्यांत श्रेष्ठ अशी सत्ता राजाच्या हातीं असली म्हणून राजा काहीं सुलतानासारखा वागत नसे. वर्णाश्रमधर्माचें प्रतिपालन हें धर्मशास्त्रकारांनीं सांगितलेलें कर्तव्य बजावण्यास बांधल्या गेलेल्या राजाची सत्ता साहाजिकच मर्यादित राही. तें कर्तव्य तो न करील तर राष्ट्रीय पातकाचा धनी होईल अशा शिकवणींत वाढला असल्यामुळें राजा सामान्यतः नीतीनें वागे व म्हणूनच लोक त्यास पितृतुल्य मान देत असत. त्याच्या अभ्यासांत वेद, व्यवहार, राजनीति, तत्वज्ञान, गणित काव्य इत्यादि विषय असत.

अशोक शेवटच्या काळांत भिक्षू होऊन मगधांत सुवर्णगिरीवर राहिला. तो खि. पू. २३२ त मरण पावला. त्याच्या वंशातील अखेरचा राजा बृहद्रथ. त्याचा वध त्याचा सेनापति पुष्यमित्र शुंग यानें विश्वासघातानें करून मौर्यसत्ता लयास नेली. ही सत्ता सरासरी १३७ वर्षे टिकून खि. पू. १८५ त बुडाली.

## कुशाण राजघराणें

खिस्ती शकाच्या प्रारंभीं मध्य व उत्तर हिंदुस्थानांत आंध्र राजघराणें बलाढ्य होतें. त्याच काळांत कुशाण वंशांतला एक पुरुष बॅक्ट्रियांतून उतरला व त्यानें पार्थियनांपासून (पठाण) काबूल, गांधार (कंदाहार) व तक्षशिला हा प्रदेश घेतला. त्याचें नांव कुजल कडफिसेस (Kujula-Kadphises). त्याचा पुत्र विमा कडफिसेस (Wima Kadphises) यानें उत्तर हिंदुस्थान काशीपर्यंत जिंकला. इ. स. १२५ त कनिष्क हा

अत्यंत प्रबळ राजा याच वंशांत उत्पन्न होऊन त्यानें पुरुषपुर (पेशावर) ही आपली राजधानी बनविली. त्याचें राज्य मध्य आशियाच्या सरहद्दीपासून गंगातटाकापर्यंत पसरलें. तो प्रथम पार्शी धर्माचा व शिवादि हिंदु-देवतांचा भक्त होता. कुशाणांच्या नाण्यावर एका अंगाला शिव व दुसऱ्या अंगाला नंदी आहे. पण मागाहून बौद्धमत स्वीकारून तो महायान पंथाचा अनुयायी झाला. याच्या कारकिर्दींत बुद्धाची मूर्ति बनविण्यांत आली. त्यापूर्वी पादुका, छत्री अशीं त्यांचीं चिन्हें असत. बुद्ध हा महायान पंथांत देव समजण्यांत येऊं लागला. त्या सुमाराच्या नाण्यांवर बुद्ध, झरथुष्ट्र यांच्याही मूर्ती आहेत.

इसवी सनाच्या प्रारंभीं मथुरेवर कुशाण सत्रप म्हणजे सामंत (गव्हर्नर) राज्य करीत असत. कनिष्क इ. स. १७० त मरण पावला. त्याच्यामागून हाविष्क गादीवर बसला. त्याचें राज्य काबूल, काश्मीर, पंजाब व मथुरा यांजवर होतें. त्याच्या मृत्यूनंतर इ. स. १८७ त वासुदेव राजा झाला. वासुदेवापर्यंतचे सर्व कुशाणराजे बौद्ध असल्यामुळें बौद्ध पंथाला राजाश्रय मिळाला. पण वासुदेव शिवोपासक निघाला. त्यायोगानें बौद्ध पंथाचा राजाश्रय तुटला. कुशाणांना स्थूल मानानें क्वचित् शकही म्हणत. त्यांचें साम्राज्य एक शतक टिकलें. कुशाण राजांचें धोरण चातुर्वर्ण्याविरुद्ध व वैदिक धर्मीयांतील वरिष्ठ जातीविरुद्ध होतें. ब्राह्मणांवर कुशाणांचा एकंदरींत राग होता. त्यांचा नायनाट करण्याचा प्रयत्न कुशाणांच्या वानस्पर नामक सत्रपानें केला. त्यानें वरिष्ठ जातीच्या हिंदूंना खालीं ओढून कनिष्ठ जातींच्या हिंदूंना वर चढविलें. क्षत्रियांना नाहीसें करून राज्यकर्त्यांचा एक नवाच वर्ग निर्माण केला. या परकीय शकांना वैदिक धर्मीयांची बरोबरी करण्यास प्रारंभीं बौद्धमतस्वीकार हाच मार्ग होता. मागून ते वैदिक धर्मानुयायीहि बनले.

कुशाणकाळीं वैदिक धर्मीयांची झालेली अवस्था महाभारताच्या वनपर्वांत पुढीलप्रमाणें वर्णिली आहे. "तेव्हां देशांत पुष्कळ म्लेच्छ राजे

राज्य करतील. हे पापी राजे असत्यवादी बनून आपल्या सत्तेला खोट्या तत्त्वांचा आधार घेतील. आंध्र, शक, पुलिंद, यवन, कांबोज, बाल्हिक, सूर, अभीर यांचीं राज्यें होतील. वेदोच्चार व्यर्थ ठरेल. शूद्रलोक ब्राह्मणांना बरोबरीच्या नात्यानें 'भो' म्हणूं लागतील व ब्राह्मणहि त्यांना उलट 'आर्य' म्हणून संबोधतील. कारभाराच्या भीतीनें नागरिक चारित्र्यास मुकतील. ते ऐहिक सुखाच्या मागें लागतील. सगळें जग म्लेछमय बनेल. यज्ञयाग बंद पडतील. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य नाश पावतील. सर्वत्र एकंकार होईल. मनुष्यें स्वर्गीयांना श्राद्धादि कर्मांनीं संतुष्ट करणार नाहींत. देवपूजेला बंदी होईल. लोक हाडें पूजतील. ब्राह्मणांच्या वस्तींत, देवांना पवित्र अशा जागीं, पवित्र स्थळीं, देवालयांत थडगीं, बुद्धाचे स्तूप—डागोबा—एडूक स्थापन होतील. देवालयें दिसणार नाहींत."

"कुशाणकाळीं म्हणजे शककाळीं वरीलप्रमाणें स्थिती झाल्याचें गर्ग संहितेंतहि लिहिलें आहे. कुशाणांचा हेतु समाजव्यवस्था मोडण्याचा होता. बॅक्ट्रियन तुख्खार म्हणजेच कुशाण. त्यांचें अधिराज्य सावकाश ऑक्ससपासून बंगालच्या उपसागरापर्यंत पसरलें. संयुक्त प्रांत व बिहार कुशाणांच्या साक्षात् अमलाखालीं होता. शातवाहन हे दाक्षिणेंत तीनशें वर्षें राज्य करीत असून शकांशीं झगडत होते. कुशाण हे गाई व बैल यांचा वध करीत." (जयस्वाल)

भारशिवानीं कुशाणांना जिंकून आपलें राज्य स्थापलें. त्यांच्या राज्यांत बिहार, संयुक्त प्रांत, बुंदेलखंड, मध्यप्रांत, माळवा, राजपुताना व पूर्व पंजाब हा प्रदेश मोडला. भारशिवांची अधिष्ठात्री देवता शिव ही होती. त्यांनीं दहा अश्वमेध केले. काशींतील दशाश्वमेध घाट ही त्याची खूण आहे. भारशिवांची राजधानी ही कौसांबी व काशी यांच्या दरम्यान होती. त्यांनीं बौद्ध कालानंतर वैदिक धर्माचा उद्धार केला. त्यांच्या वेळीं सर्व वातावरण शिवभक्तीनें दुमदुमलें. त्यांनीं गंगेचें पावित्र्य तिला मिळवून दिलें.

कुशाणांप्रमाणें पह्लवांनींहि आपला शिरकाव हिंदुस्थानांत करून घेतला. वायव्य हिंदुस्थानांत जिंकलेल्या प्रदेशावर त्यांनीं आपले सत्रप (क्षत्रप) नेमले. सत्रप घराणीं बरींचशीं स्वतंत्र वागत. एका सत्रप घराण्यानें मथुरेंतहि आपलें राज्य स्थापलें. काठेवाड, माळवा, गुजराथ या प्रदेशांत दोन क्षत्रप घराण्यांनीं राज्यें केलीं. त्यांपैकीं पहिलें क्षहरात घराणें. त्यांतील भूमक व नहपान हे पुरुष प्रसिद्ध असून नहपानाचा उल्लेख नाशिक लेण्यांतहि झाला आहे. नहपानाचा जांवई ऋषभदत्त व कन्या दक्षमित्रा. नहपानाचें राज्य माळवा, गुजराथ, राजपुताना, काठेवाड, उत्तर कोंकण, व पश्चिम महाराष्ट्र यांवर होतें. तें त्यानें शातवाहनांपासून जिंकलें असावें. नहपान इ. स. १२४ त असावा. त्यास क्षहरात म्हणत. गौतमीपुत्रानें (शातवाहन) नहपानास जिंकून गेलेला मुलूख त्याजपासून परत घेतला.

पह्लवाप्रमाणें शकांचेहि क्षत्रप पश्चिम हिंदुस्थानांत काहीं भागावर राज्य करीत. त्यांचा अंमल इ. स. ७८।८० च्या सुमारास संपला.

रुद्रदामन हा एक क्षत्रप प्रसिद्ध आहे. रुद्रदामनाचा एक अधिकारी सुविष्क पह्लव हा सुराष्ट्रांत (काठेवाड) राज्य करता झाला. रुद्रदामनासंबंधीं एक लेख गिरनारवर आहे. रुद्रदामनानें वासिष्ठीपुत्र पुळुमावी याचा दोनदां पराभव केल्याचें वर्णन आहे. तथापि वासिष्ठीपुत्र पुळुमावी त्याचा आप्त असल्यामुळें त्यानें त्याला दोनदां गादीवर बसविलें. रुद्रदामनानें महासत्रप अशी पदवी धारण केली. त्याच्या ताब्यांत कच्छ, काठेवाड, सिंध, पूर्व व पश्चिम माळवा आणि राजपुतान्याचा कांहीं भाग होता. ज्यांत हा मजकूर आहे, तो लेख इ. स. १५० त लिहिला गेला. लेखांतील भाषा चांगली संस्कृत आहे. इ. स. २३६-४० चे सुमारास अभीर ईश्वरदत्त यानें क्षत्रपांचा कांहीं मुलुख जिंकला. अभीरांचें राज्य उत्तर कोंकण, खानदेश व नाशिक यांजवर होतें. तें त्यांनीं क्षत्रपांपासूनच घेतलें असावें. कोंकणांत पांचव्या शतकांत त्रिकूटक हें राजघराणें उदयास आलें. त्यांचीं नाणीं

उपलब्ध असूनें त्यांच्यांतील दन्हसेन (ध्रुवसेन) या राजानें अश्वमेधहि केला होता. त्यानेंहि क्षत्रपांचाच कांहीं मुलुख जिंकून त्यावर राज्य स्थापलें असावें.

## शुंग घराणें

शुंग घराणें फार प्राचीन असून भारद्वाज हा ब्राह्मण त्याचा मूळ पुरुष होता. मौर्य कालांत शुंग त्यांचे मांडलिक असावे. शुंग राजघराण्याचा संस्थापक पुष्यमित्र वैदिक धर्माभिमानी व अश्वमेध करणारा होता. त्याजवर यवन आन्ध्र राजांनीं स्वाऱ्या केल्या. पुष्यमित्रामागून त्याचा पुत्र अग्निमित्र यानें आन्ध्रांपासून विदर्भ देश जिंकून घेतला. त्याच्याहि कारकिर्दीत वैदिक-धर्म-स्थापनेस मदतच झाली. अग्निमित्रामागून सुजेष्ठ व सुजेष्ठामागून वसुमित्र यांनीं राज्य केलें. शुंग घराण्यांतील शेवटचा राजा देवभूति व्यसनी निघाला. त्यास त्याचा सेनापति वासुदेव यानें जिवें मारून शुंग सत्ता लयास नेली. शुंगांची राजधानी पाटलीपुत्र होती. वासुदेवाचा वंश तो कण्व वंश.

## गुप्त घराणें

कुशाणांचा ऱ्हास व गुप्तांचा उदय समकालीन दिसतो. गुप्तघराण्याचा प्रारंभ चौथ्या शतकांत झाला. त्यांचा मूळ पुरुष गुप्त. गुप्ताचा पुत्र घटोत्कच, घटोत्कचाचा पुत्र चन्द्रगुप्त पहिला. चन्द्रगुप्तापर्यंत गुप्तघराणें विशेष भरभराटीस आलें नव्हतें. गुप्त हे प्रथम प्रयाग व साकेत या नगरांवर व गंगानदीच्या जवळपास लहानसें राज्य सांभाळून असत. गुप्त व घटोत्कच हे आपणांस फक्त महाराज म्हणवीत. पण चन्द्रगुप्तापासून पुढचे गुप्त आपणास महाराजाधिराज म्हणूं लागले. अर्थात् त्यांचें साम्राज्य झालें. चन्द्रगुप्तानें आपलें संवत्सरहि सुरू केलें. त्याच्या राज्याचा विस्तार प्रयाग ते पाटलीपुत्र असावा. चन्द्रगुप्त इ. स. ३२८ च्या सुमारास मरण पावला.

## समुद्र गुप्त

चन्द्रगुप्ताच्या मृत्यूनंतर त्याचे पुत्र कच व समुद्रगुप्त यांच्यांत गादीसाठीं भांडणें लागलीं. कच वडील असल्यामुळें कांहीं दिवस राज्याचा मालक झाला. पण त्याजहून अधिक कर्तबगार व पराक्रमी असा समुद्रगुप्त यानें कचास पदच्युत करून सिंहासन मिळविलें. त्याच्या कारकिर्दीत गुप्त साम्राज्याचा विस्तार फार झाला. त्यानें दक्षिणापथावरहि स्वारी केली. त्याचें साम्राज्य बिहार, ओरिसा, संयुक्त प्रांत, कोचीपर्यंत मद्रास इलाखा, मध्यप्रांताचा पूर्वेकडील प्रदेश, भावलपुरापर्यंत राजपुताना, झेलम व चिनाब या नद्यांच्या कांठचा प्रदेश व काश्मीरची सीमा यांवर पसरलें. त्यानें अश्वमेध केला तो त्याच्या पराक्रमास उचित शोभला. तो सानातन धर्माचा अभिमानी असूनहि बौद्धमताविषयीं आदर बाळगीत असे. त्याच्या कारकिर्दीची समाप्ति इ. स. ३७७च्या सुमारास झाली (आर. व्ही. दांडेकरकृत ए हिस्टरी ऑफ दि गुप्ताज्.).

समुद्रगुप्तामागून त्याचा वडील पुत्र रामगुप्त गादीवर बसला; पण तो नालायक ठरल्यामुळें त्यास ठार मारून त्याचा धाकटा भाऊ चंद्रगुप्त दुसरा यानें राज्य बळकावलें. त्यानें रामगुप्ताची पत्नी ध्रुवदेवी हिच्याशीं लग्न केलें. त्याच्या कारकिर्दीत गुप्तसाम्राज्याचा दरारा समुद्रगुप्ताच्या काळाप्रमाणेंच टिकला. त्यानें वायव्य सरहद्दीचा बंदोबस्त केला, सबंध माळवा जिंकला व काठेवाडच्या क्षत्रपांचें प्राबल्य मोडलें. गुप्तांची राजधानी प्रारंभापासून पाटलीपुत्र होती. माळवा जिंकल्यावर चंद्रगुप्तानें माळव्यात उज्जयिनी ही दुसरी राजधानी केली. काठेवाड व माळवा यांची भर पडल्यामुळें गुप्तसाम्राज्य काठेवाडापासून पूर्व बंगालच्या हद्दीस भिडलें. त्याच्या राज्यांतील खंबायत, घोघा, वेरावळ, पोरबंदर व द्वारका या बंदरांमार्फत परदेशांशीं जोराचें व्यापारी दळणवळण सुरू होऊन नाण्यांच्या रूपानें रोममधील सुवर्ण याच्या राज्यांत वाहूं लागलें. त्या सुवर्णाचा उपयोग करून चंद्रगुप्तानें विविध जातींचीं नाणीं पाडलीं.

चन्द्रगुप्तास पश्चिमेकडील मुलुख जिंकतां आला, याचें कारण त्याच्या घराण्याचें वाकाटकांशीं असलेलें सख्य. त्यानें विक्रमादित्य ही पदवी घेतली. त्याशिवाय सिंहविक्रम, सिंहचन्द्र, साहसांक, विक्रमांक याहि पदव्या होत्या. त्यानें फांशीची शिक्षा रद्द केली व दवाखाने स्थापले. त्याला राणी ध्रुवदेवी इजपासून प्रभावती गुप्ता इत्यादि दोन तीन मुलें झालीं. तिचेंच लग्न वाकाटक राजा रुद्रसेन दुसरा याच्याशीं झाल्यामुळें हीं दोन घराणीं साहाजिकच वैरभाव टाकून परस्परांबरोबर सलोख्यानें राहूं लागलीं.

## कुमार गुप्त

चन्द्रगुप्तामागून त्याचा सर्वांत वडील पुत्र कुमारगुप्त इ. स. ४१४ मध्यें राज्यावर आला. याच्या कारकिर्दीचा पूर्वार्ध दानधर्मांत भरभराटींत गेला. त्यानें आपणास महेन्द्रादित्य ही पदवी घेतली. त्याच्या वायव्य सीमेवर हूण व कुशाण यांच्या स्वाऱ्या होऊं लागल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करण्यास त्यानें स्कंदगुप्त यास पाठविलें. कुमारगुप्तानें अश्वमेधहि केला. कुमारगुप्त इ. स. ४५५ त निवर्तला.

## स्कंद गुप्त

कुमारगुप्तानंतर राज्यपद स्कंदगुप्ताकडे आलें. त्यानें आपणास देवराज व विक्रमादित्य या दोन पदव्या घेतल्या. त्याचा अंमल काठेवाड ते बंगालपर्यंतच्या उत्तर हिंदुस्थानावर होता. त्यानें वेगवेगळ्या प्रांतांवर सामंत नेमले असून त्यांपैकीं सुराष्ट्रावर पर्णदत्त व चक्रपालित आणि दुआबावर सर्वनाग हा सामंत होता. प्रवरसेन दुसरा हा जिवंत असेपर्यंत वाकाटक व गुप्त यांचे संबंध ठीक राहिले; पण मागाहून ते बिघडले. स्कंदगुप्तानें हूण व पुष्यमित्र यांचा पराभव करून पुष्कळ वर्षें शांततेनें राज्य केलें. स्कंदगुप्त हूणांशीं लढण्यांत गुंतला असतां त्याच्या राज्याचा पूर्वेकडील व दक्षिणेकडील भाग वाकाटक राजा नरेन्द्रसेन हा कुरतडीत होता. पण त्याची पुंडाई

स्कंद हूणांवरील मोहिमेंतून मोकळा झाल्यावर त्यानें थांबविली. स्कंदानें हूणांसारख्या रानटी व प्रबल शत्रूंचा मोड केल्यावर त्याची कीर्ति आशिया व युरोप या दोन्ही खंडांत पसरली. तो गुप्त घराण्यांत अत्यंत श्रेष्ठ सम्राटां-पैकीं एक होऊन गेला. स्कंद इ. स. ४६८ च्या सुमारास मरण पावला.

स्कंदगुप्तामागून त्याचा भाऊ पुरगुप्त, मग नरसिंहगुप्त व पुढें कुमारगुप्त दुसरा यांना राज्य मिळालें. त्यांचा अंमल बंगाल, बिहार व संयुक्त प्रांताचा पूर्वभाग यांपुरताच राहिला. पुरगुप्त हा कुमारगुप्त पहिला व अनंतदेवी यांचा पुत्र. नरसिंहगुप्त इ. स. ४६८ ते ४७२ पर्यंत राज्यावर असावा. त्याच्या वेळीं गुप्तराज्य बऱ्या स्थितींत होतें. नरसिंहगुप्तामागून कुमारगुप्त दुसरा यास गादी मिळाली. त्याची राजधानी काशी असून तिजभोंवतालच्या प्रदेशांत त्याला मान होता. बुद्धगुप्त हा शेवटचा गुप्त राजा इ. स. ४९६ च्या सुमारास गादीवर होता. त्याच्यावेळीं गुप्तराज्याचे शेवटचे प्रांत स्वतंत्र होत चालले.

गुप्त राजे वैदिक धर्माभिमानी होते. त्यांनीं गाई व बैल यांचा वध थांब-विला. चिनी प्रवासी फॉहिन हा उत्तर हिंदुस्थानांत इ. स. ४०९ ते ४११ पर्यंत प्रवास करून गेला. तेथील लोक, वाङ्मयोत्कर्ष, संस्कृति, धर्म व कलाकौशल्य यांची तो तारीफ करितो. या कालांत वैदिक आचारांचें पुनरु-ज्जीवन होऊन संस्कृत भाषेचा प्रचार वाढला. यास अभिजात वाङ्मयाचा काळ ( classical period ) म्हणतात. जगविख्यात कालिदास कवि दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या पदरीं असावा. गुप्तकाळांत पुराणें, कौटिल्याचें अर्थ-शास्त्र व पंचतंत्र जन्मास आलें. मुख्य पुराणें व मनुस्मृति यांस सध्याचें स्वरूप याच कालांत प्राप्त झालें. आर्यभट्ट व वराहमिहिर यांनीं गणित व ज्योतिष या विषयांवर ग्रंथ लिहिले. दिल्लीच्या प्रसिद्ध कुतुबमिनाराजवळचा लोहस्तंभ याच कालांतील धातुकामाचा द्योतक होय. झांशी जिल्ह्यांतील देवगडच्या देवालयावरची नकशी व रेखीवपणा उत्कृष्ट म्हणून वाखाणला गेला

आहे. कानपूर जिल्ह्यांतील भिटर येथील विटांचें देऊळ हा त्या कलेचा सुंदर नमुना आहे. तसेंच सारनाथ येथील बुद्धाचा पुतळा हाही गुप्त-कालीन शांतिविषयक कल्पनेचा मासला समजला पाहिजे. गुप्त साम्राज्यावर श्वेत-हूणांनीं स्वाऱ्या करून तें धुळीस मिळविलें. त्याबरोबर भारतीय शिल्प-कलेस उतरती कळा लागली. गुप्त-समकालीन दुसरें मोठें घराणें वाकाटकांचें. त्यांच्या राज्यांत वऱ्हाड, कुंतल, अवंती, त्रिकूटक, आंध्र व महाराष्ट्र हे देश मोडत.

## वर्धन घराणें

वर्धन घराणें सहाव्या शतकांत सरस्वती नदीच्या कांठीं स्थानेश्वर येथें राज्य करीत होतें. याच घराण्यांत प्रसिद्ध हर्षराजा उदयास आला. हर्ष-चरित्र बाण कवीनें लिहिलें. हर्षाच्या कारकिर्दींत सुपरिचित चिनी प्रवासी ह्युएनत्संग हिंदुस्थानांत सोळा वर्षे अवलोकन करीत हिंडत राहिला. हर्षाचे पूर्वज मांडलिक राजे होते. त्यांपैकीं प्रभाकरवर्धनानें आपणास परमभट्टारक व महाराजाधिराज या पदव्या घेतल्या. त्याच्या राज्यापलीकडे उत्तरेस हूणांचें राज्य होतें. त्यांचा व गांधारच्या कुशाणांचाही त्यानें पराभव केला. त्याच्या दक्षिणेस गुर्जर, लाट आणि माळवा हीं राज्यें होतीं. त्यांचा प्रभाकरानें मोड केला. प्रभाकरवर्धन इ. स. ६०५ मध्यें मरण पावला. त्याच्या मागून हर्ष सिंहासनावर बसला. हर्षानें शिलादित्य ही पदवी घेतली, माळव्याच्या राजाला जिंकलें, व तसेंच वायव्य सरहद्दीवरील तुखारापासूनहि त्यानें खंडणी वसूल केली. हर्षाच्या दरबारीं ह्युएनत्संग इ. स. ६४० मध्यें होता. हर्ष व चालुक्य राजा दुसरा पुलकेशी यांजमधील लढाईत हर्ष पराभव पावला. ह्युएनत्संगामार्फत हर्षानें चीनशीं राजकीय संबंध जोडले. हिंदु लोकां-विषयीं ह्यूएनत्संगाचें मत अनुकूल झालें. त्याला हिंदू लोक धर्माप्रमाणें वाग-णारे आढळले. बंडखोरांना कारागृहवासाची व मृत्यूची शिक्षा दिली जाई.

महापातकासाठीं शरीराचे अवयव तोडण्यांत येत. न्यायदानांत दिव्याचाहि इलाज करीत. हत्ती, घोडे, पायदळ व रथ असें राजाचें चतुरंग सैन्य असे.

हर्षराजा बौद्ध असून त्यानें त्या संप्रदायाविषयीं आचार-विचारानें बराच अभिमान दर्शविला. महायान व हीनयान या दोन पंथांपैकीं हीनयानाचा हर्ष प्रवर्तक झाला. त्यानें धर्मविषयक चर्चा करणारी एक परिषद कनोज येथें भरविली. ज्या मंडपांत ही परिषद भरली त्या मंडपांत बुद्धाची एक सुवर्ण-मूर्ति ठेवली होती. परिषदेनंतर हर्षाला मारण्याचाहि एक कट उघडकीस आला. राजाच्या बौद्धपंथीय पक्षपातामुळें चिडलेल्या ब्राह्मणांनीं हा कट केला असें म्हणतात. हर्ष हा विद्वान् ग्रंथकार व गुणिजनांचा पोशिंदा झाला. त्यानें नागानंद, रत्नावली व प्रियदर्शिका हीं तीन नाटकें स्वतः लिहिलीं. त्यानें बाणकवीस पदरीं बाळगलें.

## माळव्याचे परमार

माळव्यावर परमारांचें राज्य होण्यापूर्वी गुर्जरवंशीय प्रतिहार घराणें राज्य करीत असून त्यांची राजधानी उज्जयिनी होती. प्रतिहारांची सत्ता नर्मदेपर्यंत होती व तिच्या दक्षिणेस राष्ट्रकूटांचा अंमल चालू होता. परमार याचा अर्थ शत्रूचा वध करणारा. परमारांचा मूळ पुरुष उपेन्द्र हा राष्ट्रकूटांच्या कृपेनें नवव्या शतकाच्या प्रारंभीं माळव्याचा सत्ताधारी झाला. माळव्यालाच दुसरें नांव अवन्ती आहे. परमारांची राजधानी कांहीं काल उज्जयिनीस व कांहीं काल धारेस होती. त्यांच्या अत्यंत भरभराटीच्या काळांत त्यांची उत्तरसीमा बुंदी-कोटा असून तें राज्य पूर्वेस भिलासा, हुशंगाबाद व सागर, दक्षिणेस खानदेश व नाशिक या जिल्ह्यांत पसरलें असून त्याची हद्द यादव राज्यास भिडली होती. यादवराजा तिसरा भिल्लम यानें शक ९७४ त श्रीधर दंडनायक माध्यंदिन वत्सगोत्री ब्राह्मण यास परमाराच्या पदरीं असतां भोज राजाच्या मृत्यूच्या सुमारास नाशिक जिल्ह्यांतील अनकाईचा दुर्ग फितूर होऊन आपल्या स्वाधीन केल्याबद्दल कांहीं गांवें इनाम दिलीं ( देवळाली

ताम्रपट ) यावरून परमाराच्या दक्षिणेकडील हद्दीची कल्पना येते. त्याच्या पश्चिमेस महीनदी व तिच्या पलीकडे गुजराथेवर चौलुक्य राज्य करीत होते. परमारांना मोठें साम्राज्य स्थापतां आलें नसलें तरी त्यांच्या अंगीं चिवटपणाचा गुण वाखाणण्याजोगा दिसतो. त्यांची सत्ता पांचशें वर्षे टिकून तिचा शेवट इतर अनेक सत्तांप्रमाणें मुसलमानांच्या हातून झाला. या पांचशें वर्षांत त्यांची सत्ता दोनदां अस्तास गेली व तितक्यावेळां तिनें फिरून डोकें वर काढलें. ती एकदां इ. स. १०९४ च्या सुमारास अस्त पावली व त्यानंतर तिजवर तसलाच प्रसंग अवघ्या पन्नास वर्षांनीं म्हणजे इ. स. ११४३ त ओढवला. त्यामागून तिला पुन: सुमारें १४० वर्षांचा आयुर्दाय लाभला.

अशा रीतीनें परमार सत्तेचे तीन खंड पडतात. पहिल्या खंडास इ. स. ८०८ मध्यें सुरुवात होऊन तो १०५४त म्हणजे २४४ वर्षांनीं संपला. या काळांत परमार सत्तेस प्रतिबंध करणारीं राज्यें कनोजचे प्रतिहार, गुजराथेचे चौलुक्य, दक्षिणेंतील राष्ट्रकूट व चालुक्य आणि चेदीचे कलचुरी हीं होत. अशा प्रबळ सत्तांच्या कैचींत चौफेर सांपडलेल्या परमारांना राज्यविस्तार करण्यास फार थोडी कुवत राहिली होती. त्यांचें राज्य वारंवार अस्तंगत होण्याचें कारण तरी हेंच. परमारांचे पहिले पांच राजे राष्ट्रकूटांचे मांडलिक होते. त्या अंकितत्वांतून मुक्त झालेला पहिला परमार राजा वैरिसिंह दुसरा. पण तो मुक्त होतो न होतो तोंच कनोजच्या प्रतिहारांनीं वैरिसिंहावर राज्यच्युतीचा प्रसंग आणिला. त्यामागून महेन्द्रपाल दुसरा यानें राष्ट्रकूटाच्या मदतीनें प्रतिहारांस हांकून देऊन माळवा परत मिळविला.

पहिल्या खंडांतील परमारांत सियक दुसरा, वाक्पति दुसरा ऊर्फ मुंज, सिंधुराज, भोज हे प्रसिद्ध राजे झाले. सियक याचें दुसरें नांव श्रीहर्ष. तो इ. स. ९४९ मध्यें गादीवर बसला. सियक हा महान् योद्धा व सेनापति होता. त्या काळीं माळव्याच्या वायव्येस हूणांचें राज्य होतें. त्याजवर सियकानें सौराष्ट्र राजा ब्रलवर्मन् याच्या साहाय्यानें स्वारी केली. तींत हूणराजा

जाज्जप्पा यास बल्लवर्मन् यानें ठार मारलें. राष्ट्रकूट साम्राज्य आतां खाला-वलें असल्यामुळें सियकानें आपला मांडलिक वागदाचा कंक यासह हत्यार उपसण्याचें ठरविलें. उभयपक्षांचें युद्ध नर्मदेवर झालें. त्यांत कंक ठार झाला तरी सियकानें खोट्टिगाचा पाठलाग त्याच्या राजधानीपर्यंत करून मान्यखेट (मालखेड) लुटलें व अशा रीतीनें खोट्टिगाचा पराभव केला. परमारांच्या दृष्टीनें हर्षाचें हें कृत्य कौतुकास्पद होय. सियक हा परमार घराण्याचा खरा संस्थापक मानला पाहिजे. त्याचें राज्य उत्तरेस बन्सवाडा, पूर्वेस भिलसा, दक्षिणेस गोदावरी व पश्चिमेस महीनदी येथपर्यंत विस्तार पावलें. मान्य-खेटच्या स्वारीहून परत आल्यावर त्यानें आपलें राज्य आपला पुत्र वाक्पतिराज याच्या स्वाधीन केलें व स्वतः संन्यास घेतला. त्याची कारकीर्द इ. स. ९७०-९७३ च्या दरम्यान संपली.

## वाक्पति दुसरा

यानें आपणास श्रीवल्लभ व पृथ्वीवल्लभ या पदव्या घेतल्या. त्याला अमोघवर्ष, उत्पल व मुंज अशींहि नांवें होतीं. पैकीं मुंज या नांवानें तो प्रसिद्ध आहे. त्याच्या कारकिर्दींत माळव्याची संपत्ति व समृद्धि वाढली. साम्राज्याला बळकटी आली. विद्या व कला यांहिकडे त्यानें लक्ष पुरविलें. त्यानें चेदी देशाचा कल्चुरी राजा युवराज याजवर स्वारी करून त्याची त्रिपुरी ही राजधानी घेतली, मेवाडावर जाऊन तेथील राजा शक्तिकुमार याजपासून अबूपर्वत मिळविला व येणेंप्रकारें विस्तार पावलेल्या राज्याचे निरानिराळे भाग पाडून त्यांचा कारभार राजपुत्रांकडे सोंपविला. तो गुजरायेकडे वळल्यावर तिचा चौलुक्य राजा मूळराज पहिला हा प्रतिकारार्थ पुढें आला. पण निरुपाय होऊन त्यास सहकुटुंब मारवाडांत पळून जावें लागलें. उत्तर गुजराथ येणेंप्रमाणें घेतल्यानंतर वाक्पति लाट देशांत शिरला. त्यावेळीं कल्याणचा चालुक्य राजा तैलप दुसरा याचा सेनापति बारप्पा येथें अंमल चालवीत होता. वाक्पतीनें त्यालाहि जिंकलें. पुढें खुद्द तैलप व वाक्पति

यांचा अनेकवार सामना झाला. शेवटच्या सामन्यांत वाक्पति पकडला गेला व त्याच्या हालअपेष्टा करून तैलपानें त्याचा शिरच्छेद केला.

वाक्पति ऊर्फ मुंज स्वतः मोठा कवि व विद्वानांचा आश्रयदाता होता. त्यानें माळव्यांत संस्कृत भाषेचें पुनरुज्जीवन केलें. त्याचा पद्मगुप्त नामक राजकवि असून त्यानें नवसाहसांकचरित नामक काव्य लिहिलें आहे. त्या काव्याचा नायक स्वतः मुंजच आहे. भद्र, हलायुध, धनिक, धनपाल, शोभन इत्यादि कवी त्याच्या आश्रयानें उदय पावले. त्यानें सुंदर तडाग खणले. धारेचा मुंजसागर ह्यांपैकींच होय. त्यानें उज्जयिनी, महेश्वर, ओंकार–मांधाता व धर्मपुरी येथें देवळें व धरणें बांधलीं.

## सिंधुराज

वाक्पतिमागून त्याचा धाकटा भाऊ सिंधुराज माळव्याचा राजा झाला. त्यानें लाट देशावर स्वारी करून तेथील अधिपतीस जिंकलें. गुजराथेवरील त्याच्या स्वाऱ्यांनीं त्याला अनिहलवाडच्या चौलुक्यांशीं सामना द्यावा लागला. त्यांत चौलुक्य राजा चामुंडराज यानें परमारांना उधळून लावलें. या पराभवानें परमारांची सत्ता खिळखिळी झाली. त्यानंतर सिंधुराज लवकरच मरण पावला.

## भोजराजा

हा माळव्याचा सुप्रसिद्ध राजा भोज. तो रसिक तसाच पराक्रमीहि निघाला. त्यानें इ. स. १०१९ च्या सुमारास उत्तर कोंकणच्या राजास जिंकलें. त्याचें राज्य उत्तरेस बन्सवाडा व डुंगरपूर, पूर्वेस भिलसा, दक्षिणेस खानदेश, नाशिक, कोंकण व पश्चिमेस खेडा येथपर्यंत विस्तारलें. भोजराजाचा चुलता मुंज याचे हाल करून चालुक्यराजा तैलप यानें त्यास मारलें. याचा सूड घेण्याकरितां भोजानें कलचुरी राजा गांगेय व चोलराजा राजेन्द्र यांस आपल्या पक्षांत घेतलें. या वेळीं चालुक्यराजा जयसिंह गादीवर होता. त्याजविरुद्ध भोजानें एवढी जय्यत तयारी केली होती तरी जयसिंहानें त्याचा इ. स. १०१९ मध्यें पराभव केला. यानंतर कांहीं वर्षे

या दोन घराण्यांतील भांडण बंद होतें. पण तें जयसिंहामागून पहिला सोमेश्वर गादीवर येतांच पुनः पेटलें. सोमेश्वरानें माळव्यावर मोहिमांमागून मोहिमा सुरू केल्या. अखेरीस त्यानें धारेंत शिरून भोजास पळवून लावलें. जय व पराजय या दोन्हींकडून त्याचें सतत स्वागत चालू होतें. त्यानें लाट देशात जाऊन तेथील कीर्तिराजाची राजधानी व राज्य घेतलें. सिंधु राजाच्या वेळीं कोंकणच्या शिलाहारांचा परमारांशीं सलोखा होता. पण अरिकेसरी तथा केशिदेव या शिलाहाराच्या राजवटींत बिघाड उत्पन्न झाला. भोजानें त्यास नमवून आपलें प्रभुत्व कबूल करावयास लावलें. या संबंधाचा विजयोत्सव भोजानें ३ जानेवारी १०२० रोजीं साजरा केला. कनोजचा प्रतिहार राजा यशःपाल व अजमीरचा चव्हाण राजा वाक्पति यांचाहि त्यानें धुव्वा उडविला.

पण शेवटचे दिवस भोजास कठीण गेले. त्याजवर चोहोंकडून संकटें आलीं. गुजराथेचा चौलुक्य राजा भीम व कलचुरी राजा कर्ण यांनीं एक होऊन माळव्यावर स्वारी केली. भोजानें आत्मरक्षणार्थ शिकस्त केली. पण युद्ध सुरू असतांच त्यास मृत्यूनें गांठल्यामुळें त्याचे प्रयत्न फुकट गेले व कांहीं काळ परमार राज्याचा अस्त झाला.

भोज हा मोठा राजा होऊन गेला. त्यानें राज्यकारभार उत्कृष्ट हांकला, शाळा स्थापल्या व विद्वानांना आश्रय दिला. तो स्वतः कवि व विद्वानांचा चाहाता होता. त्यानें पुष्कळ देवळें बांधलीं. त्याच्यासारखें औदार्य विरळा. फेरीस्त्यानें भोजराजासंबंधानें पुढीलप्रमाणें लिहून ठेवलें आहे. 'भोजराजा वर्षांतून दोनदां दोन महोत्सव साजरे करीत असे. हे उत्सव चाळीस दिवस चालत. त्या प्रसंगीं हिंदुस्थानांतील प्रसिद्ध गायक व नर्तक येत. त्यांना मेजवान्या मिळत व मद्यप्राशनांत ते दंग असत. उत्सवसमाप्तीचे वेळीं त्यांना नूतन वस्त्रें व बिदागी देऊन त्यांची संभावना केली जाई.'

## जयसिंह

भोजामागून जयसिंह यास माळव्याचें सिंहासन मिळावयाचें; परंतु कलचुरी व चालुक्य यांनीं त्याचें राज्य घेतलें असल्यामुळें जयसिंह मदतीकरितां नाइलाजानें कल्याणचा चालुक्य राजा सोमेश्वर पहिला यास शरण गेला. सोमेश्वरानें आपला पराक्रमी पुत्र विक्रमादित्य यास त्याच्या साहाय्यार्थ पाठविलें. त्याच्या मोठ्या फौजेपुढें कलचूरी राजा कर्ण व चौलुक्य राजा भीम यांस हात टेंकावे लागून माळव्यावर जयसिंहाची स्थापना करण्यांत आली. एव्हांपासून जयसिंह चालुक्यांचा पक्का दोस्त बनून वेंगीवरील स्वारींत विक्रमाच्या बरोबर गेला. सोमेश्वर पहिला निवर्तल्यावर सोमेश्वर दुसरा व विक्रमादित्य यांचा तंटा जुंपला असतां, जयसिंहानें विक्रमाचा पक्ष घेतला. तेव्हां सोमेश्वरानें जयसिंहाची खोड मोडण्याकरितां माळव्याशीं युद्ध पुकारलें व या मोहिमेचें सेनापतित्व गंग उदयादित्य यास दिलें. गंगाच्या मदतीस होयसळ एडेयंग व गुजराथेचा कर्ण राजा यांस दिलें. इतक्या प्रचंड तयारीनें आलेल्या चालुक्य सैन्यापुढें जयसिंहाचा पाड तो काय ? जयसिंह मारला गेला व चालुक्यांनीं व चौलुक्यांनीं धारा घेतली.

## उदयादित्य

भोजाच्या कारकिर्दींत गेलेलें राज्य जयसिंहानें मिळवावें, पुनः त्यानेंच तें गमवावें व जिवाला मुकावें हा दैवाचा खेळ विचित्र होय यांत शंका नाहीं. माळव्यावरील परमारांची सत्ता नेहमींच कशी डळमळीत व दुर्बल होती याचा हा सबळ पुरावाच समजला पाहिजे. तथापि परमार घराण्यांत हिकमती, कल्पक व कर्तृत्ववान पुरुषांचा तुटवडा मात्र कधींच भासला नाहीं. भोजाचा एक आप्त उदयादित्य यानें अजमीरचा ( शाकंभरी ) चौहान राजा दुर्लभ तिसरा यास साहाय्यास बोलावून प्राप्त संकट तरून जाण्याचें ठरविलें. दुर्लभानें आपलें घोडदळ उदयादित्याच्या कुमकेस दिलें. त्याच्या जोरावर दुर्लभ चौलुक्य व

कर्नाट यांजवर तुटून पडला व त्यानें माळवा परत घेतला. उदयादित्यानें आपलें राज्य बरेंच वाढविलें. तें उत्तरेस झालरपट्टण, पूर्वेस भिलसा व दक्षिणेस नेमाड येथपर्यंत फैलावलें.

उदयादित्याचे ठिकाणीं राज्यकर्त्याचे अनेक सद्गुण वसत होते. तो विद्वानांस मान देई. धारेस भोजानें स्थापलेलें विद्यालय याच्या राजवटींत भरभराटीस आलें. त्यानें धुळाक्षरांचे व व्याकरणाचे शालोपयोगी तक्ते तयार करविले आणि भिलसा प्रांतांत उदयपूर नांवाचें नगर वसविलें. उदयादित्य इ. स. १०८६ त मरण पावला.

## लक्ष्मदेव

उदयादित्यामागून लक्ष्मदेव गादीवर बसला. यावेळीं कलचुरींचा कर्णराजा मरून यशःकर्ण ( इ. स. १०७२–१११५ ) राजा झाला होता. कलचुरींची पूर्वीची आगळीक लक्षांत घेऊन त्यानें यशःकर्णाचा मोड केला व त्रिपुरी घेतली. अंग व कलिंग येथील राजांशींहि त्याचे युद्धप्रसंग घडले.

याच्या कारकिर्दींत परमारांना मुसलमानांची प्रथम साक्षात् झळ लागली. गझनीच्या सुलतान महमदाचा नातू मसूद पहिला हा इ. स. १०५९ मध्यें सुलतान झाला होता. त्यानें आपला पुत्र महमूद यास इ. स. १०७५ त हिंदुस्थानांत जिंकलेल्या प्रदेशाचा सुभेदार नेमलें. त्यानें आग्रा घेतला व कित्येक हिंदू राजांना शरण आणिलें. मग तो माळव्यावर आला. प्रथम महमुदाचा जय झाला; पण मागाहून लक्ष्मदेवासच विजयश्रीनें माळ घातली. लक्ष्मदेव इ. स. १०९४ च्या सुमारास मरण पावला.

## नरवर्मा

लक्ष्मदेवामागून त्याचा धाकटा भाऊ नरवर्मन् यास राज्यपद मिळालें. गुजराथेचा चौलुक्यराजा सिद्धराज याजबरोबर बरींच वर्षे युद्ध चालून शेवटीं नरवर्मा कैद झाला. परमारांचा विशेष गुण हा कीं त्यांतील बहुतेक राजे

सुशिक्षित, विद्याप्रिय व विद्वानांचे आश्रयदाते निपजले. त्या परंपरेस अनुसरून नरवर्मा हाहि स्वतः कवि व सरस्वतीचा भक्त होता. त्यानें देवळेंहि बांधलीं.

## यशोवर्मन्

नरवर्म्यामागून त्याचा पुत्र यशोवर्मन् इ. स. ११३३ मध्यें राजा झाला. त्याच्या अंगीं राज्यकर्त्यास योग्य असा कोणताच गुण नव्हता. त्याचाहि चौलुक्य सिद्धराज यानें पराभव करून त्याचें राज्य बुडविलें.

## जयवर्मन्

यशोवर्म्यानंतर जयवर्म्यानें इ. स. ११३८ त माळवा चौलुक्यांपासून स्वतंत्र केलासा दिसतो. पण हें स्वातंत्र्य फार दिवस टिकलें नाहीं. यावेळीं चालुक्य विक्रमादित्य सहावा व सोमेश्वर तिसरा मरून जगदेकमल्ल दुसरा गादीवर होता. त्यानें माळव्यावर केलेल्या स्वारींत जयवर्म्याचा मोड झाला व तो मारला गेला. ही गोष्ट इ. स. ११४३ मध्यें घडली.

## बल्लाळ

जयवर्म्यामागून बल्लाळाकडे राजपद आलें. त्यास गुजराथेचा चौलुक्य राजा कुमारपाल याजबरोबर झगडावें लागलें. त्यांत बल्लाळ ठार झाला व माळवा गुजराथेस जोडला गेला.

## परमार महाकुमार

कुमारपाल चौलुक्य यानें माळवा आपल्या राज्यास जोडल्यावर राज्यव्यवस्थेकरितां त्याचे लहान विभाग पाडले व ते सामन्तांच्या ताब्यांत दिले. यावेळीं विन्ध्य पर्वताच्या दक्षिण भागांत परमार घराण्याच्या लहान शाखा नांदत होत्या. त्यांतील पुरुष आपणास महाकुमार म्हणवीत. त्यांजपैकीं हरिश्चन्द्र हा एक संस्थानिक होता. तो इ. स. ११४४ पासून ११७८ पर्यंत राज्य करीत होता. त्याच्या मागून त्याचा पुत्र देवपाल राज्यपद पावला. त्याच्या

कारकिर्दींत होयसळ घराण्यांतील बल्लाळ दुसरा यानें माळव्यावर हल्ला केला व लुटालूट चालविली. त्यास आळा घालण्याचा माळव्यांतील परमारांनीं व इतर राजेरजवाड्यांनीं प्रयत्न केला पण त्यांच्यानें बल्लाळाचें पारिपत्य करविलें नाहीं. याच गडबडींत शाहाबुद्दिन महमद घोरी हिंदुस्थानांत आला. त्यानें देवळें पाडीत व मुलूख लुटीत दंगल उडविली. तेव्हां त्या त्या भागांतील लोक माळव्यांत राहावयास आले.

गुजराथेचा चौलुक्यराजा कुमारपाल इ. स. ११७२ त मरण पावल्यावर चौलुक्यांची सत्ता खालावत चालली. त्याचा पुतण्या अजयपाल विशेष नांव घेण्यासारखा नव्हता. परमार व चौलुक्य खालावले असतां कल्याणचें चालुक्य घराणेंहि संपत आलें होतें. त्याच्यामागून कलचुरींचा थोडासा उदय झाला व त्यांना मागें सारून देवगिरीचे यादव सम्राट बनले. यादव वारंवार माळव्यास पीडा देऊं लागले. माळव्याचा अर्जुनवर्मा व लाट देशाचा सिंधुराज यांनीं सिंघण यादवास अटकाव करून पाहिला. पण त्यांस यश आलें नाहीं. अर्जुन इ. स. १२१८ मध्यें मरण पावला. त्याच्यामागून महाकुमार हरिश्चन्द्राचा पुत्र देवपाल गादीवर बसला. अर्जुन व देवपाल यांच्या वेळीं परमारसत्ता पूर्वेस उदयपूर, दक्षिणेस हुशंगाबाद व नेमाड आणि पश्चिमेस भडोच येथपर्यंत पसरली.

लाट देशाचा राजा शंख हा देवपालाचा मांडलिक होता. तो युद्धकलानिपुण असून उत्तरेस चौलुक्यांशीं व दक्षिणेस यादवांशीं लढत होता. त्याच्या कारकिर्दींत यादवांनीं लाट देशावर स्वारी केली व ते नर्मदेपर्यंत गेले. शंखानें त्यांस सडकून चोप दिला. त्यानंतर यादव दुसऱ्यांदा लाटांवर आले. यावेळीं शंख कैद केला गेला. पण तह होऊन शंखास सोडून देण्यांत आलें. पुढें देवपाल व शंख यांनीं गुजराथेवर मोहिम नेली. त्यावेळीं गुजराथेचा चौलुक्य राजा वीरधवल हा तुरुष्कांशीं लढत होता. देवपाल गुजराथेच्या मोहिमेवर असतां माळव्याच्या हद्दीवर मुसलमानांनीं दीन गाजविला. इतकें व

नव्हे तर इ. स. १२३३ च्या सुमारास दिल्लीचा राजा अल्तमष यानें माळवा पादाक्रांत केला. पण ही वावटळ निघून गेल्यावर देवपालानें माळव्यांत स्थिरस्थावर केलें.

## जगत्तुंग

देवगिरीचा सिंघण यादव मेल्यावर त्याचा पुत्र कृष्ण बापाचें धोरण पुढें चालवून माळव्यावर ताज्या दमानें आला. या स्वारींत त्यानें प्रचंड विजय मिळविला. पुढें देवपालामागून जगत्तुंग माळव्याचा राजा झाला. मुसलमानांनीं उत्तर बाजू जिंकली असतांहि परमारांनीं आत्मरक्षणार्थ कांहींच तजवीज केली नाहीं. कृष्णराजाच्या स्वारीनें जगत्तुंगाचें पुष्कळच नुकसान झालें होतें. त्या समयास दिल्लीचा सेनापति बल्बन यानें नरवरच्या राजास जिंकल्यावर माळव्याची धूळधाण उडविली. गुजराथेचा राजा विशालदेव यानें १२४३ च्या सुमारास माळव्यांत येऊन धारानगरी लुटली. यामुळें परमार सत्ता अधिकच क्षीण झाली.

## जयवर्मन् दुसरा

जगत्तुंग तथा जेतुगी इ. स. १२५६ मध्यें मृत्यु पावला. त्याच्यामागून त्याचा धाकटा भाऊ जयवर्मन् दुसरा गादीवर आला. त्यास रणस्तंभपूरचे चौहान राजे जबर शत्रू भेटले. जयवर्म्यामागून जयसिंह दुसरा व त्यानंतर अरुणवर्मन् राजा झाला. अरुणवर्म्याच्या वेळीं अन्तःकलह फार माजला. यास भरींत भर म्हणून रामदेव यादवानें यशस्वी हल्ला चढविला. त्यामागून चौहान राजा हंमीर, ढोल्कयाचे वाघेले व गुजराथेचा चौलुक्य राजा शारंगदेव ( इ. स. १२७५–१२९५ ) हे उठले. हंमीरास उत्तरेकडून मुसलमान शत्रू होते; तरी त्यानें त्यांची क्षिति न बाळगतां धारेवर येऊन माळव्याचा राजा भोज दुसरा याचा पराभव केला. उलटपक्षीं इ. स. १३०१ मध्यें अल्लाउद्दिन रांथनथोर ( रणस्तंभपूर ) मध्यें शिरला. तेव्हां हंमीराचे सर्व उपाय हरल्यामुळें त्यानें स्वतःचा शिरच्छेद केला व त्याच्या स्त्रियांनीं

जोहार केला. चौहानांचा निकाल उडवून अल्लाउद्दिन माळव्यांत उतरला. त्याबरोबर माळव्याचा राजा महालकदेव पळून गेला व अल्लाउद्दिनानें माळवा आपल्या राज्यास जोडला. अशा रीतीनें परमार घराण्याचा कायमचा शेवट झाला.

## दक्षिण हिंदुस्थान

कर्नाटकाच्या दक्षिणेकडील हिंदुस्थानास द्राविड देश म्हणतात. तामिळ व द्राविड हे दोनहि शब्द समानार्थकच समजावे. द्रविडांचा उल्लेख पाणिनींत नाहीं. पण पाणिनीच्या व्याकरणावर टीका लिहिणारा कात्यायन इ. स. च्या चौथ्या शतकांत झाला; त्याच्या टीकेंत द्राविड शब्द आला आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील चोल, पांड्य, चेर (केरल) व पल्लव हीं प्राचीन राजघराणीं. हा प्रदेश प्राचीन काळापासूनच फार संपन्न व समृद्ध आहे. यांत मिरीं व इतर मसाल्याचे पदार्थ उत्पन्न होतात, त्यास पूर्वीं परदेशांत फार किंमत येत असे. म्हैसूर, कुर्ग, त्रावणकोर, वगैरे प्रांतांत हत्तींचे कळपच्या कळप आढळतात. त्यामुळें हस्तिदंत पैदा होऊन तो परदेशीं विकला जाई. भोंवतालच्या समुद्रांतून मोत्यें व खाणींतून हिरे निघत. मलमल व रेशमी वस्त्रें तेथील कोष्टी विणीत. या सर्वांचा व्यापार मिसर, अरबस्तान, मलाया व चीन या देशांबरोबर चालत असे. त्याच्या दक्षिण किनाऱ्यावर रोमन व्यापारी वसाहत करून राहिले होते. हा सारा प्रदेश ज्ञात कालापासून वैदिक धर्माचाच असून तेथील राजांनीं अश्वमेध केले आहेत.

### पाण्ड्य

वरील राजघराण्यांपैकीं पाण्ड्यांचा निर्देश अशोकाच्या स्तंभलेखांत आहे. पाण्ड्य राज्य हिंदुस्थानाच्या अगदीं दक्षिण टोंकाला असून त्यांत मदुरा, तिनिवेल्ली, त्रावणकोर संस्थान, कोईमतूर व कोचीन यांचा कांहीं भाग यांचा समावेश झाला. मदुरा ही त्यांची राजधानी. पांड्य राज्य कांहीं काळ भरभराटींत

राहून पुढें मोडकळीस आलें व पुनः त्यानें डोकें वर काढलें. पहिली अमदानी दहाव्या शतकांत संपली व दुसरी अमदानी बाराव्या शतकापासून सुरू झाली. पांड्य राज्याचा सातव्या शतकांत छडा लागतो. त्या शतकांत कडुंगन नांवाचा पांडवराजा प्रसिद्ध होता. जटिल परांतक हा इ. स. ७६० मध्यें गादीवर बसला. या पराक्रमी राजानें ५० वर्षें राज्य केलें. पहिल्या पांड्य राजांत हा अतिशय मोठा राजा होऊन गेला. वरगुणवर्मन् यानें इ. स. ८६० पासून ८८० पर्यंत राज्य उपभोगलें. पल्लव व चोल राजांशीं त्याच्या लढाया झाल्या. पांड्यामागून चोल राजघराणें उदयास आलें खरें; पण तें नवव्या शतकांत पांड्यांनाहि भारी होऊन बसलें. चोलराजा परांतक याज-पुढें पांड्यराजा दुसरा राजसिंह याचा टिकाव न लागून त्या राज्याचें स्वातंत्र्य इ. स. ९२० मध्यें नाश पावलें. तथापि राजसत्ता कायमच होती. इ. स. १२१६ मध्यें मारवर्मन् सुंदर हा पांड्यराजा गादीवर बसला. त्यानें चोलांच्या मुलुखांत शिरून तंजावराचा विध्वंस केला व चोल राजाला पळवून लावलें. या वेळीं होयसळ राजा दुसरा नरसिंह याचें वजन बरेंच वाढलें. त्याच्या मदतीनें चोल टिकले.

मारवर्मन् सुंदर दुसरा हा पांड्यराजा इ. स. १२३८ मध्यें गादीवर बसला. त्यानें होयसळांशीं टक्कर देऊन पाड्यांचा बोज राखला. त्याच्यामागून जातवर्मन् सुंदर पांड्य हा इ. स. १२५१ मध्यें राजा झाला. उत्तर पांड्यां-पैकीं हा अतिशय मोठा राजा. या काळीं चोल सत्ता मागें पडून होयस-ळांनीं त्यांचें स्थान पटकावलें होतें. पांड्यांची सत्ता चेर व सिंहलद्वीप यांवरहि पसरली. सुंदर पांड्यानें होयसळांचा तीनदां पराभव केला. वारंगळ-च्या काकतीयांनाहि जिंकून तो राजाधिराज झाला. पांड्यांच्या आतांपर्यंत-च्या लढाया हिंदू राजांशीं होत्या. पण अतःपर मुसलमानांशीं सामन्याचा प्रसंग आला. दिल्लीच्या अल्लाउद्दिन खिलजीचा सेनापति मलिक काफर यानें पांड्यमुलुखावर स्वारी करून त्यांची राजधानी मदुरा लुटली. त्या

टोल्यासरशी पांड्यसत्ता मोडकळली. मलीक गेल्यावर दिल्लीहून इ. स. १३१५ मध्यें खुश्रूखान आला. त्यानें वीर पांड्य याचा पराभव केला व चोलांनाहि जिंकलें. येणेंप्रमाणें पांड्य व चोल लयास गेले.

## चोल

चोल घराण्याचाहि उल्लेख अशोकाच्या स्तंभलेखांत आढळतो. चोल ज्या प्रदेशावर राज्य करीत, त्यास चोलमंडल अशी संज्ञा होती. चोलमंडलाचाच अपभ्रंश युरोपियनांनीं 'कारोमांडल' केला. चोलांचें राज्य पांड्यांच्या ईशान्येस पूर्व किनाऱ्यावर पेन्नार व वेल्लूर या दोन नद्यांमध्यें होतें. चोलांची राजधानी पुढें तंजावर झाली. कावेरी नदीवर कावेरीपट्टण व चोलपुरम् हीं शहरें त्यांनीं वसविलीं. चोलांचा ऐतिहासिक धागा दुसऱ्या शतकापासून लागतो. तेव्हांच प्रसिद्ध चोलराजा करिकाल पहिला यानें चेर व पांड्य यांच्या संयुक्त सैन्याचा पराभव केला. त्यांच्याशीं तह झाल्यावर करिकाल राजानें आपली कन्या चेर राजपुत्रास दिली व सिंहलद्वीपावर स्वारी करून तेथील बारा हजार माणसांना लढाईत पकडून कावेरी नदीच्या कालव्यावर कामाला लावलें. पूर्व समुद्रावर कावेरीच्या मुखाशीं कावेरीपट्टण शहर त्यानेंच वसविलें. त्याच्या कारकिर्दीत चोल राज्याचा कळस झाला. करिकालाच्या पश्चात् कांहीं काळ चोल राजास वाईट येऊन चेर व पांड्य यांनीं त्यांच्या राज्याचा बराच भाग घेतला.

येथून पुढें कित्येक शतकें चोल घराणें मागासलें. पण आठव्या शतकांत पल्लव मागें पडल्यावर चोल पुनः चढले. नवव्या शतकाच्या मध्यांत चोलराजा विजयालय यानें पल्लव व पांड्य यांच्या भांडणांमध्यें आपलें साधून तंजावर वगैरे चोलांचा जुना मुलूख परत घेतला. त्याचा पुत्र आदित्य पहिला हा इ. स. ८८० मध्यें गादीवर आला, तेव्हां त्यानें पल्लवांना चांगलाच हात दाखविला. आदित्याचा पुत्र परांतक पहिला यानें पांड्यांवर स्वारी करून

मदुरा लुटली व तेथील राजा राजसिंह यास सिंहलद्वीपांत घालविलें. परांतकावर आतां उत्तरेकडून राष्ट्रकूटांचें नवें संकट गुदरलें. पुढील चार राजांच्या कारकिर्दीत राष्ट्रकूटांनीं कांची घेतली व तंजावरास वेढा दिला. चोलराजा राजराज पहिला हा इ. स. ९८५ मध्यें गादीवर बसला. त्यानें चोल राज्य वाढविलें. राजराजानें पहिल्या दहा वर्षांत पांड्य राजांचा व चेरांचाहि पश्चिमेकडील प्रदेश जिंकून घेतला. हीं दहा वर्षे उत्कर्षाचीं गेल्यावर कल्याणवासी चालुक्य सत्तेची वक्रदृष्टि चोलांकडे फिरल्यामुळें चोलांना तिला तोंड द्यावें लागलें. चालुक्यांनीं पल्लवांचा दक्षिणेकडील मुलूख बळकावला.

## राजेंद्र पहिला

राजराजामागून त्याचा पुत्र राजेंद्र पहिला हा इ. स. १०१२ मध्यें राजा झाला. तो फार पराक्रमी निघाला. त्यानें चालुक्यांविरुद्ध चढाई करून त्यांच्या ताब्यांतील धारवाडापर्यंतचा मुलुख लुटला. त्याचा हा धुमाकूळ चालुक्य राजा सत्याश्रय यानें थांबविला. तेव्हां राजेंद्रानें आपला मोर्चा दक्षिणेस फिरवून सिंहलद्वीपावर स्वारी केली व तेथील राजाला कैद करून आपल्या राजधानींत ठेवलें. त्यानें चेरांवरहि जय मिळवून परशुरामाचा म्हणून त्यांजपाशीं असलेला प्रसिद्ध राजमुकुट आणिला. सिंहलद्वीप व चेर यांच्या पराभवानें राजेंद्राचें सामर्थ्य इतकें वाढलें कीं त्यास चालुक्य राजा दुसरा जयसिंह याचा इ. स. १०२० मध्यें पराभव करतां आला. असेच जयावर जय मिळवीत तो ओरिसा, कोसल यांतून बंगालपर्यंत गेला. बंगाल्यांतून परत येतांना गंगेच्या कांठीं मुक्काम करून त्यानें या स्वारीच्या स्मरणार्थ गंगाईकोंडा अशी पदवी घेतली. बंगालच्या उपसागरांतूनहि जलमार्गानें सैन्य नेऊन पेगू व मलाया यांवर जाऊन त्यानें बरीच लूट आणिली व चोलपुरम् हें नवें शहर वसविलें आणि कालवे व देवालयें बांधून स्वराज्याच्या वैभवांत व संपत्तींत भर घातली. राजेंद्र इ. स. १०४२ मध्यें मरण पावला.

## राजाधिराज

राजेंद्राचा पुत्र राजाधिराज हा बापाच्या हयातींतच राज्यकारभारांत मदत करीत होता. त्याच्या राज्यावर चालुक्यांकडून होणारें आक्रमण त्यानें थांबविलें आणि सिंहलद्वीपावर स्वाऱ्या करून तेथील चार राजांना युद्धांत लागोपाट ठार मारलें; शेवटीं अश्वमेध केला आणि जयमूकोंडा चोल ही पदवी घेतली. पण राजाधिराजाचा शेवट मात्र चांगला झाला नाहीं. त्याचा तुंगभद्रेवर चालुक्यराजा सोमेश्वर पहिला याजबरोबर युद्धप्रसंग होऊन त्यांत इ. स. १०५२ मध्यें तो प्राणास मुकला. राजाधिराजाच्या मृत्यूनंतर त्याचा भाऊ दुसरा राजेंद्र गादीवर बसला. त्यानें इ. स. १०५४ मध्यें सिंहलद्वीपावर शस्त्र धरून राजा विजय यास डोंगरांचा आश्रय करावयास लावलें. १०६८ मध्यें राजेंद्र चालुक्यांशीं लढतांना ठार झाल्यावर राजपद त्याचा भाऊ वीरराजेंद्र याजकडे गेलें. त्याची चालुक्यराजा पहिला सोमेश्वर याजबरोबर लढाई जुंपली. तिच्यांत सोमेश्वराचें सैन्य तुंगभद्रा ओलांडून चोल-मुलुखांत शिरलें असतां चोलांनीं त्यास हांकून देऊन कुडल—संगमंवर सोमेश्वराचा पराभव केला.

तेथून पुढें चोलराजांचा चालुक्य राजाशीं वारंवार झगडा होत गेला. पहिल्या सोमेश्वरानंतर दुसरा सोमेश्वर गादीवर बसल्यावर त्याचा धाकटा भाऊ विक्रमादित्य सहावा हा सोमेश्वराशीं भांडून चोलराजाकडे निघून गेला. चोलराजा वीर राजेंद्र याचा तो जांवई असल्यामुळें त्याची त्यास भावाविरुद्ध मदत मिळण्याची आशा होती. वीर राजेंद्रानें विक्रमास चालुक्यराजा अशी मान्यताहि दिली. पण त्यास राजपद प्राप्त होण्यापूर्वींच वीर राजेंद्र मेला. त्याचा पुत्र अधिराजेंद्र यास गादी मिळण्याच्या कामीं विक्रमाचेंच साहाय्य कारण झालें. अधिराजेंद्र इ. स. १०७४ मध्यें मेला. त्याच्या मृत्यूबरोबर चोल घराण्यांतील सरळ वारस संपले. वेंगीचा पूर्व चालुक्य राजेंद्र दुसरा हा चोल-राजघराण्याचा नातू असल्यामुळें चोलांच्या गादीवर वारसा हक्क सांगत होता.

चालुक्य विक्रमादित्य पराक्रमी असून चालुक्यांच्या मोहिमा तोच चालवीत असे. पण राजपद त्याचा वडील भाऊ दुसरा सोमेश्वर याजकडे स्वाभाविकच होतें. दोघां भावांतील भांडणाचा शेवट प्रत्यक्ष युद्धानें होऊन विक्रमानें इ. स. १०७६ मध्यें सोमेश्वरास कैद केलें व गादी मिळविली. तो सहावा विक्रमादित्य या नांवानें प्रसिद्धि पावला. विक्रमादित्याच्या शौर्यापुढें भोंवतालच्या राजांचे कांहीं चालत नव्हतें. पण तो मृत्यु पावतांच चालुक्याचा सामंत म्हणून वागणारा विष्णुवर्धन होयसळ स्वतंत्र होण्याच्या मार्गास लागला. अतःपर होयसळांची सत्ता वाढत चालली व दुसरीकडे चालुक्य व चोल यांच्या ऱ्हासास सुरवात झाली. इ. स. १२१६ मध्यें चोलराजा तिसरा राजराज गादीवर बसला असतां पांड्य प्रबळ होऊन चोलांचा मुलूख आक्रमूं लागले. पांड्यांनीं एकाच मोहिमेंत चोल राजधानी तंजावर हिचा विध्वंस करून चोलांना मांडलिक बनविलें. इ. स. १२६७ पर्यंत चोलराजा तिसरा राजेंद्र तंजावरात जीव धरून होता. त्यानंतर थोड्याच दिवसांत चोल राज्य बुडालें.

## चेर

तामीळ देशाचा तिसरा विभाग केरळ किंवा चेर. तेथील राजा केरळपुत्र याचा उल्लेख अशोकानें आपल्या शिलालेखांत केला आहे. चेर राज्य पांड्यांच्या पश्चिमेस व उत्तरेस होतें. त्यांत पश्चिम घांट व पश्चिम समुद्र यांजमधील प्रदेश मोडत असून सध्यांचें त्रावणकोर संस्थान हा त्याचा दक्षिणेकडील अर्धा भाग. ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं केरळ देश भरभराटींत होता. त्याचा इतिहास लेखरूपानें दुसऱ्या शतकाच्या मध्यापासून सांपडतो. त्यावेळीं चेर व चोल यांजमधील युद्धांत चेर राजा पहिला आदन ( Adan ) ठार झाला. इ. स. ७८३ मध्यें पांड्य राजा जटिलपराक्रम यानें चेर राज्याचा दक्षिण भाग म्हणजे त्रावणकोर घेतलें. इ. स. ९१८ मध्यें चेर राजा भास्कर रविवर्मन् यानें क्रांगानोर येथें यहुद्यांना राहाण्यास परवानगी दिली. यहुदी लोक

रोमन लोकांनीं पॅलेस्टाईन घेतल्यावर पहिल्या शतकांत हिंदुस्थानाच्या पश्चिम किनाऱ्यावर राहावयास आले असावे. चेरांचा ऱ्हासकाळ बाराव्या शतकापासून सुरू झाला.

## पल्लव

पल्लव राजघराण्याची राजधानी कांची. खि. पू. दुसऱ्या शतकापासून तिचा छडा लागतो. चोल साम्राज्याचा ऱ्हास व पुनः उदय यांमधील काळांत पल्लव साम्राज्य विस्तारलें. त्यांत चोलमंडल हा पूर्व किनाऱ्यावरचा प्रदेश व तेलंगण म्हणजे कृष्णेच्या मुखाकडील भाग मोडत होता. चौथ्या शतकांत पल्लवराज्य पश्चिमेकडून वाढत कदंब राज्याला भिडलें व कदंब त्यांचे मांडलिक झाले. सहाव्या शतकांत पल्लव पूर्ण भरभराटींत असून त्यांनीं लांकडी इमारतीऐवजीं दगडी इमारतीं बांधण्यास सुरुवात केली. खडकांत देवळें कोरण्याची कला सहाव्या शतकांतील प्रसिद्ध पल्लवराजा सिंह विष्णु पोतराज यानें आपल्या राज्यांत आणिली. महेंद्रवर्मा याच्या कारकिर्दीतहि पुष्कळ इमारती सातव्या शतकाच्या प्रारंभीं उठल्या. त्याचा समकालीन चालुक्यराजा दुसरा पुलकेशी याजबरोबर त्याचा लढा जुंपला. इ. स. ६१० मध्यें पुलकेशीनें त्याजपासून वेंगी प्रांत घेतला. यांतूनच पूर्वचालुक्य राज्य निर्माण झालें. चालुक्यसत्तेनें उत्तरेकडून दाबून धरल्यामुळें पल्लव आपलें राज्य दक्षिणेस वाढवूं लागले. महेंद्रवर्मा पहिला हा विद्या व कला यांचा आश्रयदाता आणि स्वतः गायनवादननिपुण होता. त्यानें लिहिलेलें मठविलासप्रकाशम् हें नाटक कापालिक पंथावर प्रकाश पाडणारें आहे.

महेंद्रवर्म्यामागून नरसिंहवर्मा पहिला हा इ. स. ६२५ ते ६६० पर्यंत राज्य करीत होता. त्यानें चालुक्य सत्तेला मागें रेटून पुलकेशीचा तीनदां पराभव केला. चालुक्यराज्यांत शिरल्यावर त्यानें त्यांची राजधानी बदामी ही लुटली. त्यानंतर तेरा वर्षे बदामींत राजाच नव्हता. यावरून सदर

प्रसंगीं पुलकेशी मारला गेला असावा असा तर्क निघतो. नरसिंहाचा पराक्रम पाहून सिंहलद्वीपच्या राजघराण्यांतील मनवम्म ( Manavamma ) हा एक पुरुष त्याजकडे मदत मागावयास आला. त्यास नरसिंहानें सिंहलद्वीपचें राज्य मिळवून दिलें. त्यानें बांधकामें पुष्कळ केलीं. महामल्लपुरम् हें शहर त्यानेंच वसवून तेथील प्रस्तरमंदिर बांधलें. त्याच्या कारकिर्दींत प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्युएनत्संग कांचीस आला होता. तो या प्रदेशास द्रविडदेश म्हणतो. तेथें त्याच्या वेळीं बौद्ध व हिंदुधर्म हे दोनहि प्रचलित असल्याचें तो लिहितो. धर्मपाल हा बौद्धमतप्रचारक कांचींत राहात होता.

नरसिंहानें महामल्ल अशी पदवी घेतली व त्यानंतरच महामल्लपुरम् हें नगर वसविलें. त्याच्यानंतर दुसरा महेंद्रवर्मन् राजा झाला. त्यानें इ. स. ६६० ते ६७० पर्यंत राज्य केलें. त्यानंतर नरसिंहवर्मा दुसरा गादीवर आला. त्याच्यामागून परमेश्वरम् दुसरा गादीवर असतां त्याचे चालुक्यांशीं युद्धप्रसंग झाले. त्यावेळीं विक्रमादित्य पहिला हा चालुक्यांचा राजा होता. त्या दोघांच्या अनेक लढाया होऊन कधीं विक्रमानें कांची घेतली तर कधीं परमेश्वरम् यानें बदामी घेतली. एका स्वारींत विक्रमादित्य दक्षिणेस बराच दूर आल्यावर पल्लव व पाड्य यांच्या संयुक्त सैन्यानें त्याचा पराभव केला. विक्रमादित्याच्या वेळींहि पल्लवांशीं लढा चालू राहिला. त्यानें इ. स. ७३३ मध्यें कांची घेऊन तेथील राजेश्वर मंदिरास देणग्या दिल्या. त्याचा यासंबंधीं शिलालेख तेथें आजहि दृष्टीस पडतो. त्यावेळीं पल्लवराजा नंदिवर्मन् दुसरा हा गादीवर होता. नंदिवर्मनूच्या लढाया पांड्य, चालुक्य व गंग यांच्याशीं झाल्या. नंतर राष्ट्रकूटांनीं चालुक्य राज्य घेतल्यावर राष्ट्रकूट राजा दन्तिदुर्ग यानें कांची जिंकली. त्यानंतर ५० वर्षांनीं तिसऱ्या गोविंदानें कांची पुनः अशीच जिंकली होती. राष्ट्रकूटांचा व पल्लवांचा पुढें शरीरसंबंधहि घडून आला. राष्ट्रकूट राजकन्येच्या पोटीं दंतिवर्मन् पल्लव जन्मास येऊन त्यानें इ. स. ७८० ते ८३० पर्यंत राज्य केलें. त्यास कदंबराजानें आपली कन्या दिली. मध्यंतरी नृपतुंगानें राज्य

केल्यावर अपराजित हा पल्लव राजा इ. स. ८७५ ते ८८५ पर्यंत गादीवर होता. त्यानें गंगांच्या मदतीनें पांड्यांना जिंकलें. अपराजितानंतर पल्लव राजघराणें अस्तंगत झालें; तरी त्यांची कीर्ति बांधकामांच्या रूपानें कायमच आहे.

---

# प्रकरण पंधरावें

## भारतीय राजनीति

### राज्यव्यवस्था

मुसल्मानपूर्वकालीं दक्षिणेंत जीं राज्यें होतीं त्यांची घटना कोणत्या तत्त्वास अनुसरून करण्यांत आली होती हें समजण्याकरितां मनु, याज्ञवल्क्यस्मृति व शुक्रनीति यांत सांगितलेल्या राज्यघटनेची स्थूल मानानें ओळख करून देणें या ठिकाणीं जरूर आहे. भारतीय राज्यघटनेचा मुख्य घटक राजा. राजांतहि सर्व राजे साहजिकच सारख्या योग्यतेचे नसून त्यांच्या सामर्थ्याप्रमाणें त्यांजमध्यें अनेक भेद असत. प्रजेला पीडा न देता ज्याचें उत्पन्न सालीना एक लक्ष कर्षांपर्यंत येतें तो राजा सामन्त. तीन लक्ष उत्पन्नाचा तो मांडलिक. वीस लक्ष उत्पन्नाचा तो राजा. वीस ते पन्नास लक्ष उत्पन्नाचा तो महाराज. स्वराटाचें उत्पन्न ५० लक्ष ते १ कोटीपर्यंत, सम्राटाचें १ ते १० कोटींपर्यंत, विराटाचें १० ते ५० कोटी व सार्वभौमाचें ५० कोटी कर्षांवर सांगण्यांत आलें आहे. महाराष्ट्रावरील शातवाहन, वाकाटक, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव हीं राजघराणीं सार्वभौम असल्यामुळें त्यांचें वार्षिक उत्पन्न ५० कोटींच्या आसपास असावें असें समजण्यास हरकत नाहीं. शिलाहार, कदंब, रट्ट इत्यादि मांडलिक होते. मांडलिकाचें उत्पन्न तीन लक्ष सांगण्यात

आलें आहे. पण शिलाहारांचा राज्यविस्तार बराच मोठा असल्यामुळें त्यांचें उत्पन्न तीन लक्षांहून बहुधा जास्ती असलें पाहिजे.

राज्याचीं राजा, अमात्य, मित्र, कोश, देश, दुर्ग व सेनापति हीं सात अंगें असून त्यांत राजा मुख्य. सामंतापासून सार्वभौमापर्यंत सर्व लहानथोर राजांना हीं सप्तांगें राखावींच लागत. महाराष्ट्रांत कोंकण व देश या दोन्ही भागांत मिळून शेंकडों किल्ले आहेत. त्यांपैकीं बहुतेक दुर्ग कोंकण भागांत शिलाहारादि मांडलिकांनीं व देशावर शातवाहनादि सार्वभौमांनीं बांधले असल्यास नवल नाहीं. वरील सप्तांगांपैकीं मुख्य जो राजा त्याला राज्य राखण्याची व वृद्धिंगत करण्याची पात्रता येण्यास लहानपणापासून अनेक विद्यांचा व शास्त्रांचा अभ्यास अपरिहार्य मानला जाई. ब्रह्मविद्या, वेदत्रयी, वार्ता व दण्डनीति या चार विद्यांचें परिशीलन राजानें सतत करावें असें सांगितलें आहे. पण एवढ्यानें राजाची पात्रता संपत नाहीं. त्याची दिनचर्या व एकंदर वर्तन अत्यंत थोर असण्याची आवश्यकता याज्ञवल्क्य स्मृतीनें पुढील शब्दांनीं वर्णिली आहे. 'राजानें राजधानीचें रक्षण करून प्रतिदिनीं प्रातःकाळीं उठल्यावर स्वतः जमाखर्च पाहावा. नंतर न्यायाचीं कामें बघून मध्यान्हसमयीं स्नान करावें व स्वेच्छेनें योग्य समयीं जेवावें. नंतर त्यानें नवीन संपादिलेलें धन भांडागारांत ठेवावें, हेरांची भेट घ्यावी, अपराण्हकाळीं अन्तःपुरांत विहरावें अथवा मंत्री किंवा चतुर व गुणी स्त्रिया यांजबरोबर विनोदपर गोष्टी बोलाव्या, उत्तम वस्त्रें व अलंकार घालून चतुरंगसेनेची पाहाणी करावी व सेनापतीबरोबर राज्यरक्षणाचा विचार करावा. इतकें आटोपेपर्यंत सायंकाळ सहजच होत असल्यामुळें सन्ध्योपासना उरकून हेरांशीं गुप्त भाषण करावें, त्यामागून नृत्य-गायनादिकांनीं कांहीं काळ मन रमवून भोजन उरकावें, भोजनोत्तर विस्मरण होऊं नये, यासाठीं यथाशक्ति स्वाध्यायाचा पाठ करावा. मग मंगलवाद्यें व शंख यांचा घोष होत असतां रात्रौ झोंपीं जावें व प्रातःकाळीं त्या वाद्यांचा गजर ऐकतच उठावें. येणेंप्रमाणें ब्राह्ममुहूर्तावर जागें झाल्यानंतर ज्योतिष्याचें दर्शन

घेऊन त्याजकडून ग्रहादिकांची स्थिति जाणावी. ग्रह अनिष्ट असल्यास ब्राह्मणांना ग्रहशांति करण्यास सांगून वैद्यास आपली प्रकृति दाखवावी. ' राज्य टिकून त्याची उत्तम प्रकारें भरभराट होण्यारा राजा इतका सुसंस्कृत, जागरूक, सुविचारी, परिपक्व बुद्धीचा व कर्तव्यदक्ष असला पाहिजे हें सांगावयास नकोच. शातवाहनांपासून यादवअखेर जे असंख्य राजे दाक्षिणेंत होऊन गेले ते या कसोटीस बऱ्याच अंशीं उतरणारे असतील व याच परंपरेंत वाढलेले असतील यांत संशय नाहीं.

राजाविषयीं येथवर विचार झाल्यानंतर राज्याच्या सप्तांगांपैकीं दुसरें अंग अमात्य याजकडे वळावयास पाहिजे. शुक्र त्यास प्रकृति म्हणतो. त्यानें प्रकृतीची एकूण संख्या दहापर्यंत दिली असून तिच्यांत पुरोहित, प्रतिनिधी, प्रधान, सचिव, मंत्री, प्राडविवाक, पंडित, सुमंत्रक, अमात्य, दूत यांचा समावेश केला आहे या सर्वांत श्रेष्ठ पुरोहित. तो नीतिशास्त्र, अस्त्रविद्या व व्यूहादि यांत कुशल असावा. त्याच्याखालीं प्रतिनिधी. राजानें काय करावें व काय न करावें हें सांगणारा तो प्रतिनिधी. राजाचा सर्व कारभार पाहाणारा तो प्रधान. सैन्याची खडानूखडा माहिती असणारा तो सचिव. नीतिकुशल तो मंत्री. धर्मतत्त्व जाणणारा तो पंडित. लोक व शास्त्र यांची नीति ज्यास माहीत आहे तो प्राडविवाक. देशकालज्ञ तो अमात्य आणि आयव्ययावरील प्रमुख अधिकारी तो सुमंत्र. या दहा प्रकृती प्रत्येक राजापाशीं असतीलच असें म्हणवत नाहीं. कित्येक राजांपाशीं विस्ताराच्या मानानें प्रकृतींची संख्या कमीहि असण्याचा संभव आहे. तथापि या दहा प्रकृतींपैकीं पुरोहित, मंत्री, पंडित, प्राडविवाक यांस विद्वत्तेची आवश्यकता असल्यामुळें त्या पदांवर ब्राह्मणांची योजना होत असली पाहिजे. त्याच कारणासाठीं न्यायाधीशाची जागाहि ब्राह्मणांना मिळत असावी. अग्निपुराणांत सेनापतीहि ब्राह्मण किंवा क्षत्रिय असावा असें म्हटलें आहे. हें सर्व लक्षात घेता राज्यकारभारात ब्राह्मणांकडे किती मोठा वांटा येत होता याची कल्पना होते.

असो. राजाची सत्ता प्रकृतींत वांटली गेल्यामुळें एकादे वेळीं प्रकृतीकडून पदच्युत होण्याची भीति संभवे. या प्रकृतींपैकीं कोणाहि एकास आपल्याहून बलाढ्य न होऊं देण्याकरितां राजास सावधगिरी बाळगावी लागे. तसेंच प्रकृतींसहि समबल ठेवणें त्यास भाग असे. या दृष्टीनें व पात्रतेच्या दृष्टीनेंहि एकदां एकाची विशिष्ट पदावर नेमणूक झाली म्हणजे तो सतत त्या जागीं चिटकून राहाण्यांत नुकसान असल्यामुळें प्रकृतींच्या बदल्या होत व एकाच घराण्यांत विशिष्ट अधिकार नेहमीं राहिलाच पाहिजे असें घडत नसे. बापाच्या पश्चात् त्याचा पुत्र लायक निपजल्यास बापाचा हुद्दा त्यास मिळावा हें स्वाभाविक होय. पण तो अपात्र निघाला तर तें स्थान त्यास देत नसत. मंत्रिमंडळांतील कित्येक मंत्री नालायक निपजण्याइतकाच राजाहि नालायक निपजण्याचा संभव आहे. अशा स्थितींत राजाला पदच्युत कोणीं करावें हा प्रश्न उद्भवतो. तो अधिकार पुरोहिताचा असून त्यानें इतर प्रकृतींच्या अनुमतीनें राष्ट्रविनाशक राजास काढून टाकून राजकुलांतील गुणयुक्त पुरुषाची राज्यावर स्थापना करावी असें शुक्रनीतींत सांगितलें आहे.

राज्याची घटना येणेंप्रमाणें झाली तरी खुद्द राजाच्या खासगीकडील व्यवस्थेस कित्येक अधिकारी पाहिजेतच. भोजनशाला, उद्यानें, देवघर, धर्मादाय, कोठी हीं खासगीकडील खातीं असून त्यांजवर पाकाधिप, आरामाधिपति, देवतुष्टिपति, दानाध्यक्ष, संभारपति इत्यादि अधिकारी असत. [१]

राजाच्या मृत्यूनंतर त्याचें राज्य पुढें चालविण्याची जोखीम शिरावर घेणारा उत्तराधिकारी राजानें आपल्या हयातींतच तयार करावयास पाहिजे. नैसर्गिकरीत्या तो अधिकार युवराजाकडेच यावयाचा असल्यामुळें युवराजपदावर राजानें आपल्या धर्मपत्नीपासून झालेल्या औरसपुत्राची स्थापना करावी. त्याला राज्याभिषेक नाहीं एवढीच काय ती उणीव; बाकी त्याचे अधिकार राजासमान मानण्यास हरकत नाहीं. युवराज व इतर राजपुत्र यांना नीतिशास्त्र, धनुर्विद्या याचें ज्ञान, दंडपारुष्य यांचा अनुभव व कष्ट सोसण्याची

शक्ति पाहिजे. राजा वगळल्यास राजपुत्र व राजकुलांतील इतर पुरुष यांना उद्योगास लावण्याचा प्रश्न उद्भवतो. राजाला चुलते, चुलत भाऊ, सख्खे बंधू व पुत्र असूं शकतील. त्या सर्वांनीं राजास साहाय्य करणें हें त्यांचें कर्तव्य होय. वडील भाऊ राजा झाल्यावर त्यानें आपल्या बंधूंना राज्यांत अधिकारावर नेमावें. शालकांना सैन्यांत नोकरी द्यावी; गुरु किंवा मित्र असतील त्यांजकडे आपले दोष दाखविण्याची कामगिरी सोंपवावी. कारण तें कटुकर्तव्य त्यांच्याशिवाय इतरांच्या हातून पार पडणार नाहीं. मित्र, बंधू, पुत्र, सेनापति व सभ्य यांच्या सल्ल्यानें त्यानें राजकृत्यं करावें. राजसभेंत प्रकृतींशिवाय राजाचे पुत्र, नातू, बंधू, भाचे, कन्यापुत्र, चुलते, स्वकुलश्रेष्ठ, सेनाधिपति, मातामह, सासरा, गुरु यांनाहि बसण्याचा अधिकार असावा.

न्यायदानाचें काम मुख्यतः राजाचें असलें तरी इतर उद्योगांमुळें किंवा न्यायदानास आवश्यक अशी बौद्धिक व शैक्षणिक पात्रता राजांत नसल्यास त्यानें त्या कामावर धर्म व शास्त्र यांत निपुण अशा ब्राह्मणांना नेमावें. तो स्वतः न्याय देणार असेल तर त्यानें आपल्या मदतीस ब्राह्मण व मंत्रिजन यांना घ्यावें. ब्राह्मण हाच न्यायाधीश असल्यास त्यानें आपल्या मदतीस धार्मिक व न्यायकुशल असे तीन ब्राह्मण घेऊन न्याय–निवाडा करावा. शुक्रनीतींत न्यायाधीशाला साहसाधिपति म्हणजे दंडाधिपति म्हटलें आहे. दक्षिणेंतील राज्यांत विशेषतः कल्याणचे चालुक्य, कल्चुरी व यादव यांच्या राजवटींत दंडनायक हा अधिकारी आढळतो. शुक्रनीतींतील साहसाधिपति व हे दंडनायक समान दिसतात. शुक्रनीतींतल्यापेक्षां वरील काळांत न्यायखातें बरेंच विस्तृत व गुंतागुंतीचें झालें असावें. कारण त्यांत दंडनायकाशिवाय महादंडनायक व प्रचंडदंडनायक असेहि अधिकारी आढळतात. त्यांचा क्रम दंडनायक, महादंडनायक व प्रचंडदंडनायक असा लागतो.

देश हें राज्याचें पांचवें अंग. त्याचे विभाग राष्ट्र, विषय, भुक्ति व ग्राम याप्रमाणें आपल्या काळांत पाडलेले आहेत. त्याखेरीज ग्रामसमूहा-

वरूनहि विभाग पाडण्याची एक रीत आहे. या दुसऱ्या रीतिप्रमाणें मनु व शुक्र यांनीं विभाग सुचविले आहेत. या समूहातील ग्राम या शब्दाला विशिष्ट अर्थ आहे. ज्या गांवाचें शिवार एक कोसाचें आहे किंवा ज्याचें उत्पन्न राजाला एक हजार रौप्यकर्ष येत आहे त्याला शुक्रनीतींत ग्राम कल्पिलें आहे. आपल्या देशात गांवाचें शिवार बहुधा एक कोसाचें असल्यामुळें ग्रामाची शुक्रनीतीनें केलेली व्याख्या आजहि लागू पडते. मात्र एक सहस्र रौप्यकर्षांवरून गांवाची ठरविलेली मर्यादा चिंत्य आहे. आपल्या काळात प्रांतांच्या नांवाला ग्रामसंख्या जोडलेली आहे. तिजकडे गांवच्या या हिशेबानें पाहिल्यास तिचा नीट बोध होतो. कोंकण ९००, कोंकण १४००, पळसिगे १२०००, वनवासी १२०००, हानगळ ५००, करहाट ४०००, तर्दवाडी १००० यांचा अर्थ या रीतीनें लागणार आहे. गांव चांगला सुपीक असला तर त्याचें सरकारी जमीन-महसुलाचें उत्पन्न एक सहस्राच्या चौपटीनें किंवा दसपटीनें अधिक येऊं शकेल. त्या स्थितींत एखाद्या एकत्र राहाणाऱ्या वस्तीस ग्राम म्हणण्याचा प्रघात असला तरी सरकारी उत्पन्नाच्या दृष्टीनें त्याचीं चार, दहा, तीस, चाळीसहि गांवें धरलीं जातील. त्या हिशेबावरूनच तीसगांव, चाळीसगांव अशीं एकाच गांवाचीं नांवें पडलीं आहेत. एका गांवाखालीं काहीं खेडीं व वाड्या असतात. त्यासुद्धां गांवाचें शिवार तीनचार कोसाचें झाल्यास गावाची संख्या सरकारी हिशेबानें तीनचारपर्यंत भरेल. गांवाखालीं खेडीं व वाड्या असतात; त्यांना शुक्रनीतींत अनुक्रमें पल्ली व कुंभ अशा संज्ञा दिल्या आहेत.

गांवाहून मोठे असे दहा, वीस, शंभर, सहस्र गांवांचे विभाग असून त्या प्रत्येक विभागावर नेमलेले वेगळाले अधिकारी असत. त्यांचा क्रम असा कीं सहस्रग्रामाधिपतीच्या हाताखालीं शतग्रामांचा एक असे दहा ग्रामाधिपति, शतग्रामाधिपतीच्या हाताखालीं वीस गांवांचा एक असे पांच ग्रामाधिपति व वीस ग्रामाधिपतीच्या हाताखालीं दशग्रामांचा एक असे दोन

ग्रामाधिपति. त्यांपैकीं शतग्रामाधिपतीला सामंत अशी संज्ञा शुक्रनीतींत दिलेली आढळते. सामंत हे संस्थानिकांसारखे किंवा जहागीरदारांसारखे असत. त्यांच्या जोडीस नोकर म्हणून सार्वभौमानें नेमलेल्या अधिकाऱ्यास अनुसामंत व पिढीजात सामंतपदावरून म्हणजे जहागिरीवरून काढून टाकलेल्या सामंतास अनुसामंत अशी संज्ञा शुक्रनीतींत योजलेली आहे. दशग्रामांचा अधिपति तो नायक व दशसहस्रग्रामांचा अधिपति तो आशापाल. दशग्रामाधिपतीला एक मध्यम प्रतीचें पुर व सहस्रग्रामाधिपतीला एक नगर जहागीर देण्यांत येई. सामंताहून मोठा तो महासामंत. महासामंत ही संज्ञा शुक्रनीतींत नाहीं, तेव्हां महासामंताची व्याख्याहि तींत नाहीं. कदाचित् महासामंत व वर निर्दिष्ट केलेला आशापाल हे समान योग्यतेचे असावे. सेऊण देशच्या यादवांपैकीं भिल्लम तिसरा याला महासामंत अशी पदवी होती. त्याच्या नंतरचा सेऊणचंद्र दुसरा यास महामंडलेश्वर म्हटलेलें आहे. तेव्हां महासामंत याजपेक्षां महामंडलेश्वराचा दर्जा कदाचित् मोठा असला तरी त्या दोघांत फारसा फरक नसावा. आपल्या काळांतील महामंडलेश्वराच्या खालचा मंडलेश्वर दिसतो. मंडलिक व मंडलेश्वर बहुधा एकच वाटतात. दक्षिण कोंकणाचा रट्टराज शिलाहार हा मंडलिक होता. कल्याणचालुक्य विक्रम सहावा याचा सासरा जोगमरस ऊर्फ जोगम राणा हा मंगळवाडचा मंडलेश्वर होता. रट्टराज वगळल्यास बहुतेक शिलाहार राजे, यादव व गोंव्याचे कदंब हे महामंडलेश्वर होते.

वरील अधिकारीमंडळांत ग्रामाधिपति हा शेवटचा दुवा. त्याजपासून वरपर्यंत सर्व अधिकाऱ्यांपाशीं प्रजारक्षणार्थ शिबंदी असे. अर्थात् ते सर्व लढवय्ये असत. ग्रामाधिपतीस जवळच्या शिबंदीकडून एकादे प्रसंगीं प्रजारक्षण अशक्य झाल्यास त्यानें वरिष्ठाची मदत घ्यावी व हाच क्रम वरपर्यंत समजावा. ग्रामाधिपतींत कर्तव्यनिष्ठा, न्यायप्रियता व चातुर्य असल्यास गांवांतील व्यवहार सुरळीत चालतो. त्याच्या या लोकसेवेचा मोबदला त्यास ग्रामसंस्थांकडून प्रापंचिक वस्तूंच्या रूपानें मिळत असे. यांतच अली-

कडच्या काळांतील ग्रामव्यवस्था व बलुत्याची पद्धति यांचीं बीजें सांपडतात. स्मृतिकारांनीं प्रत्येक जातीचे व्यवसाय ठरविले असून एका जातीस दुसऱ्या जातीचा व्यवसाय करण्यास प्रतिबंध ठेवला होता. कारण तशी मुभा सर्वांना ठेवल्यानें कांहीं धंदे बंद पडतील व कांहींत फाजील गर्दी होऊन कोणाचाच धंदा नीट चालणार नाहीं. ठरलेले धंदेच ज्या त्या जाती करीत आहेत कीं नाहीं हें पाहाण्यास प्रत्येक जातीची श्रेणी असे. त्या श्रेणीचा एक प्रतिनिधी, अशा अनेक प्रतिनिधींचे मिळून गण असत. त्यांच्या आज्ञेस न जुमानतां वागून जर लोक वाटेल तो धंदा पत्करतील तर त्यांना आपआपल्या नियत व्यवसायास लावण्याचें काम राजाला करावें लागे. हिचेंच नांव धर्म-स्थापना. बहुधा ही सर्व व्यवस्था खालच्या खालींच व्हावयाची योजना असल्यामुळें राजा व त्याचे मंत्री याजवर कामाचा बोजा बेताचाच पडे.

राज्यरक्षणाकरितां व राज्याच्या सुस्थितीकरितां राजाला ब्राह्मणाची प्रतिष्ठा राखावी लागे. ज्ञान हें मोठें सामर्थ्य आहे व ज्ञानासारखें जगांत पवित्र दुसरें कांहींहि नाहीं. हें ज्ञान ब्राह्मणाला कष्टाशिवाय प्राप्त होत नाहीं व ज्ञानसंपादनास आणि ज्ञानरक्षणास स्वास्थ व साधनानुकूलता असावयास पाहिजे. ज्ञानसंपादन करून मनुष्याच्या ऐहिक व पारलौकिक कल्याणास कारण होणारें जें धर्मानुष्ठान तेंहि त्याजकडूनच घडावयाचें असल्यामुळें राजा त्याची योग्यता पाहून वृत्ति ठरवी. राजानें ब्राह्मणाचें संरक्षण त्यांच्याकरितां करावयाचें नसून आपल्या राज्याकरितां व राज्यांतील जनतेच्या कल्याणाकरिता करावयाचें असे. तो राष्ट्राच्या ज्ञानांत जी भर घालील तिजवर राष्ट्राची उन्नति अवलंबून राही. पण हेच ब्राह्मण राजानें त्यांच्या योगक्षेमाची तरतूद न केल्यामुळें बुभुक्षित झाले, अन्नान्नदशेस पोंचले तर राष्ट्र हें नीति, धर्म, सदाचार व ज्ञान या बाबतींत खालावून अधोगतीस जाईल. राजे लोक हें सर्व जाणून सत्पात्र ब्राह्मणांना भूमिदान, गोदान, सुवर्णदान यासारखीं दानें देऊन सुस्थितींत राखण्याचा प्रयत्न करीत.

दुर्ग हें राज्याचें सहावें अंग. राज्यांत दुर्ग सहा प्रकारचे असत. ते धनुदुर्ग, महीदुर्ग, अब्दुर्ग, वार्क्षदुर्ग व गिरिदुर्ग येणेंप्रमाणें. आजूबाजूस वीसपंचवीस कोसापर्यंत पाणी नसलेला तो धनुदुर्ग. तटाबाहेर चारहि बाजूंस चार कोसांपर्यंत मोठाले वृक्ष, कांटेरी झाडें, व कळकीचीं बेटें आहेत तो वार्क्षदुर्ग. सपाटीवरचा भुईकोट किल्ला तो महीदुर्ग. भोंवतालून पाण्यानें वेढलेला तो अब्दुर्ग. डोंगरावरचा किल्ला तो गिरिदुर्ग. अशांपैकीं कोणत्या तरी किल्ल्याचा आश्रय करून राजानें आपली राजधानी वसवावी.

राजधानीचें नगर कोणत्या स्थळीं असावें या विषयींहि शुक्रनीतींत कांहीं लक्षणें सांगितलीं आहेत. त्या स्थळांत नाना वृक्षलता उगविलेल्या असाव्या, पशु-पक्ष्यांची समृद्धि असावी, उदक विपुल असावें, भोंवतालचा प्रदेश धान्य व तृणकाष्ठ यांनीं युक्त असून तेथून समुद्राकडे नावेंतून जातां यावें. जवळ पर्वत पाहून रमणीय स्थळीं सपाटीवर राजानें आपली राजधानी स्थापावी.

सेनापति हें राज्याचें सातवें अंग. सेनाधिपति किंवा सैनिक नेमतांना राजानें जातीचा विचार न करतां लायकीचा विचार करावा. सैन्यांत विभाग पाडले असून प्रत्येक विभागावर वेगळाले अधिकारी नेमलेले असत. त्यांपैकीं पांच किंवा सहा सैनिकांवरचा तो प्रतिपाल. सहा सैनिकांहून अधिक सैनिकांवरचा तो गौल्मिक. शंभरावरचा तो शतानिक. वीस हत्ती किंवा घोडे यांवरचा मुख्य तो नायक. सैन्याबरोबर लेखक असून त्यांचें काम सैनिक किती आहेत, त्यांना वेतन काय, नवे सैनिक किती व जुने किती याची माहिती ठेवण्याचें असे.

सैन्यांत तसें राज्यकारभारांतहि लेखक लागावयाचेच; किंबहुना त्यांच्या हातीं प्रजेचें हितअहित असतें. द्रव्याच्या लालुचीनें प्रजाजनांना त्यांजपासून पीडा सोसावी लागते. म्हणून राजानें लेखक वर्गास धाकांत ठेवावें अशी याज्ञवल्क्य स्मृतीची आज्ञा आहे. शब्दांतील तत्त्व जाणणारा, गणना कुशल, शुची, नाना लिपी जाणणारा असा लेखक व गणक राजानें नेमावा असें शुक्रनीति सांगते.

गणक म्हणजे हिशेबी खात्यांतले किंवा नगदीकडील नोकर. त्यांजविषयीं याज्ञवल्क्याचा राजाना असाच इशारा आहे. कायस्थ ही जात आजहि उत्तर हिंदुस्थानांत फार मोठी, वजनदार, बुद्धिमान, सुशिक्षित व सरकारी नोकरींत पुढें सरसावलेली आहे. तिच्याकडे लेखकाचा धंदा दीडदोन सहस्र वर्षें चालत आला आहे. अर्थात् तत्कालीन सरकारी खात्यांतून हिशेबाचीं, लिहिण्याचीं, कारकुनीचीं जीं कामें व हुद्दे असतील तें बहुतेक सर्व त्यांजकडेच असलें पाहिजेत. ही स्थिति ब्राह्मण लोक आपला धार्मिक व्यवसाय सोडून देऊन या प्रकारच्या सरकारी नोकरींत शिरेपर्यंत चालत आली असली पाहिजे. महाराष्ट्रांतहि लेखकवर्गांत मुसलमान पूर्वकाळींच कायस्थांचा प्रवेश बरींच वर्षें झाला असल्याचें राष्ट्रकूट सम्राट अमोघवर्ष पहिला यानें शक ७९३ मध्यें ठाणें जिल्ह्यांतील झरिवालिक गावाचा जो ताम्रपट दिला आहे तो लिहिणारा वल्मराजपुत्र गुंडश्वल हा कायस्थ वंशज आहे यावरून दिसून येतें. याज्ञवल्क्यानें कायस्थांविषयीं राजाला पुढीलप्रमाणें इशारा दिला आहे.

'पीड्यमानाःप्रजा रक्षेत्कायस्थैश्च विशेषतः' अर्थात हा दोष विशिष्ट जातीचा नसून व्यवसायाचा आहे हें सांगणें नलगे.

लेखकाच्या कामांपैकीं ताम्रपट लिहिणें हें एक महत्त्वाचें काम होतें. ताम्रपटांत काय मजकूर घालावा याविषयींहि याज्ञवल्क्यानें नियम सांगितले आहेत. राजानें लिहावयाचें दानपत्र कापसाच्या वस्त्रावर किंवा तांब्याच्या पत्र्यावर लिहिलेलें असावें. त्यांत राजानें आपले प्रपितामह, पितामह व पिता यांचीं नांवें घालून व कीर्ति वर्णून नंतर स्वतःचें नांव लिहावें. ज्यास तें दान केलें असेल त्याच्या नांवाचा निर्देश असावाच.

स्मृतिकालीं क्षत्रिय वर्गाची स्थिति कशी होती हें समजणें आवश्यक आहे. ते अशिक्षित, मागसलेले व संस्कारहीन होत चालले असावे असा बळकट संशय येतो. तो संशय मनुस्मृतीच्या खालील श्लोकांत प्रतिबिंबित झाला आहे.

शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥

याचा अर्थ असा कीं क्षत्रिय जातींत हळूहळू संस्कारलोप झाल्यामुळें आणि याजन, अध्ययन व प्रायश्चित्त याबाबतींत ब्राह्मणांचा आश्रय न केल्यामुळें त्या शूद्रत्वाला पोंचल्या आहेत. ही स्थिति प्रस्तुत काळासहि लागू असावी असें वाटतें. कारण शिपाईगिरीचा पेशा ज्यांनीं पत्करला त्यांना विद्येचा कंटाळा येणें व त्याची मातब्बरी न कळणें अगदींच स्वाभाविक आहे. शिवाय गरीब स्थितींत जन्मलेल्या शिपयांना इतकी अनुकूलताहि असण्याचा संभव नाहीं. फक्त मोठालीं उत्पन्नें असलेले लष्करी अधिकारी क्षत्रियांच्या बौद्धिक दर्जास सांभाळून राहात असतील व त्यांची संख्या शिपाई पेशांतील सहस्रावधि लोकांच्या मानानें अगदींच थोडी असेल.

सैन्यांत घ्यावयाच्या शिपायांविषयीं मनुस्मृतीनें नियम घालून दिले आहेत. ते असे कीं कुरुक्षेत्र, विराट देश, कान्यकुब्जदेश, रोहिछत्र प्रदेश आणि मथुरेच्या आसपासचा भाग यांत जन्मलेले पुरुष धिप्पाड, शूर व मानी असल्यामुळें त्यांची योजना सैन्याच्या अग्रभागीं करण्यांत यावी. हा सारा मुलुख उत्तर हिंदुस्थानांतील गंगा-यमुना या नद्यांच्या कांठचा दिसतो. कुरुक्षेत्रावर नेहमीं युद्धें होत व तेथून पलीकडील पंजाब प्रांतांतील लोकाची आजसुद्धा धिप्पाड शरीरयष्टि व शौर्य यांविषयीं इंग्रजी सैन्यांतहि ख्याति आहे. पंजाबी पैलवान व मथुरेचे कुस्तिबाज चोबे साऱ्या भरतखंडाच्या परिचयाचे आहेत. कान्यकुब्ज म्हणजे कनोजी लोक. रोहिछत्र प्रदेशांतील रहिवासी रोहिले असावे. रोहिल्यांशीं पेशवाईत मराठ्यांच्या लढाया झाल्या आहेत. पण या सर्व उत्तरेकडील लोकांची दक्षिणेकडील राजांना सैन्य-भरतीस मदत मिळणें शक्य नसल्यामुळें स्थानिक लायक माणसांचीच ज्ञातिनिरपेक्ष भरती दाक्षिणेंतील राजे बहुतांशीं करीत असतील.

भरतखंडांतील वेगळाल्या राजांचीं परस्परांशीं वारंवार युद्धें होत. त्या युद्धांत एका राजानें दुसऱ्या राजास जिंकलें तरी जेता राजा जिताचें राज्य खालसा करून आपल्या राज्यास सहसा जोडीत नसे. या संबंधाचें बीज मनुस्मृतींत सांपडतें. तसेंच यदाकदाचित् परराज्य राजानें आपल्या राज्यास जोडलें तरी त्यांतील प्रजाजनांना वागविण्याविषयींहि मनूनें उदार नियम दिले आहेत. या देशांतील देवस्थानें, ब्राह्मण लोक व परमार्थांत गढलेले धार्मिक जन यांना जेत्या राजानें नेमणुका द्याव्या व जित राजाकडे जर त्याचें राज्य चालवावयाचें नसेल तर त्याला पदच्युत करून त्याच्या गादीवर त्याच्या वंशोत्पन्नास स्थापावें आणि तो व त्याचें मंत्रिमंडळ यांस करारांनीं बांधून घ्यावें. भरतखंडांत राज्यक्रांत्या झाल्या तरीहि प्रजाजनांस त्यापासून कायमचा उपसर्ग पोंचत नसल्यामुळें समाजव्यवस्था अबाधित राहात असे याचें हें गमक होय.

---

# प्रकरण सोळावें

## महाराष्ट्रांतील राज्यपद्धति

मागील प्रकरणांत वर्णिलेली राजनीति महाराष्ट्रावरील राजे देशकाल परिस्थित्यनुरुप शक्य तितकी पाळीत असत. तिचें स्वरूप कसें होतें याचें दिग्दर्शन येथें केलें आहे.

### शातवाहन

महाराष्ट्रांत इतिहासाला विदित असे पहिले सम्राट् शातवाहन. त्यांची राजकीय माहिती सांप्रत फार थोडी उपलब्ध आहे. शातवाहनांच्या मदतीस मंत्रिमंडळ असून त्यांचे हुद्दे महामात्य, अमात्य असे आढळतात त्याशिवाय महासेनापति, महादंडनायक व महत्तारक ( Chamberlain ) याहि हुद्यांचे त्यांचे अधिकारी होते.

अभीर व महाभोज हे त्यांचे मांडलिक होते. नाशिकाजवळ गोवर्धन ही त्यांची दुय्यम राजधानी असावी. ज्यास पुढें राष्ट्रमुख किंवा राष्ट्रपति म्हणूं लागले त्यास शातवाहनकालांत राष्ट्रीक ही पदवी होती व असे राष्ट्रीक त्यांच्या राज्यांत सर्वत्र असत. ते राज्यांतील वरच्या दर्जाचे अधिकारी असले पाहिजेत. मुसलमानांच्या राजवटींतील सुभेदार व ब्रिटिश रियासतींतील गव्हर्नर त्याच तोलाचे हे राष्ट्रीक दिसतात. राजकीय विभागांपैकीं आहार हा सर्वांत खालचा विभाग सांपडतो. मामल म्हणजे मावळ हा एक त्यांचा आहार होता. आहार हा तालुका समजण्यास हरकत नाहीं. कार्षापण, प्रतिक व सुवर्ण हीं नाणीं तेव्हांचे लोक वापरीत. भूमि निवर्तन या मापानें मोजीत. पुढील राजवटींत जे राजकीय विभाग होते व ज्या पद्धतीनें राज्य व्यवहार चालत होते ते शातवाहनकाळींहि असले पाहिजे.

## वाकाटक

शातवाहनानंतरचे महाराष्ट्रावरील सम्राट वाकाटक यांची माहिती अगदींच थोडी मिळते. शातवाहनानंतर ताम्रपट मिळण्यास सुरुवात वाकाटाकांपासून होते. त्यांचा वाशीम येथें सांपडलेला ताम्रपट सेनापति विष्णु यानें लिहिला आहे.

## बदामीचे चालुक्य

वाकाटकांमागून महाराष्ट्रावरील सम्राट बदामीचे चालुक्य. यांचें साम्राज्य कर्नाटक, कोंकण, दक्षिण गुजराथ, महाराष्ट्राचा बराच प्रदेश व आंध्र यांवर स्थापन झालें. त्यांच्या राज्याचे राष्ट्र, विषय, आभोग व ग्राम असे विभाग होते. त्यांजवरील अधिकाऱ्यांना राष्ट्रकूट, विषयपति, आभोगिक व ग्रामयुक्त हीं नावें असत. शिवाय कारवार व दक्षिण कानडा या भागांतील त्यांचे मांडलिक कदंब हे वनवासीस राहात. चालुक्यांनीं आपल्या कुलांतील पुरुषांना निरनिराळया प्रांतांवर सामन्त नेमलें. पैकीं पुलकेशी दुसरा यानें आपला ज्येष्ठ पुत्र चन्द्रादित्य यास गोमंतक व सावंतवाडी यांचा सामन्त

केलें. नाशिकाजवळचा गोवर्धन प्रांत शातवाहनांपासूनच प्रसिद्ध होता. त्याजवर पुलकेशीनें आपला भाऊ जयसिंहवर्मा यास सामंत करून पाठविलें. सामन्तांना राजाप्रमाणेंच बरेच अधिकार असत व ते राजकीय स्वातंत्र्यहि पुष्कळ उपभोगीत. त्यांना दानपत्रें करतां येत व ते हाताखालीं प्रांत-रक्षणाकरितां फौजफांटाहि ठेवीत. वर जेवढे म्हणून अधिकारी सांगितले आहेत, त्यांजपाशींहि ज्यांच्या त्यांच्या परीनें फौजा असतीलच. चालुक्यांचीं नाणीं सोन्याचीं व जाड असून त्यांवर वराहाचिन्ह आहे. त्यांची राजधानी बदामी गिरिदुर्गाच्या आश्रयानें आहे.

## राष्ट्रकूट

राष्ट्रकूटांचें साम्राज्य दक्षिण गुजराथ, मध्यप्रांताचा मराठी भाग, कोंकण, सबंध महाराष्ट्र, हैदराबाद, ( दक्षिण ), कर्नाटक व म्हैसूर संस्थानाचा कांहीं प्रदेश यांवर विस्तारलें होतें. या मोठ्या साम्राज्याचे राज्यकारभाराच्या सोयीसाठीं प्रांत करण्यांत आले होते. अधिकाऱ्यांचे हुद्दे राष्ट्रपति, विषयपति व ग्रामकूट असे होते. सर्वांत मोटा विभाग म्हणजे राष्ट्र व त्याच्याखालीं विषय. पूनक ( पुणें ) करहाटक ( कऱ्हाड ) नाशिक हे विषय आढळतात. विषयाखालीं भुक्ती. तिजवरील अधिकाऱ्यास भोगपति किंवा भोगिक म्हणत. भुक्तींतील गावाचे वेगळाले समूह असत. त्या समुहाखालीं खेडीं. एका मोठ्या गांवाखालीं लहान खेडीं येत.

ग्रामसमूह हा एक स्वतंत्र राजकीय विभाग असून तो विस्तारानें लहान मोठा असे. याचीं उदाहरणें ' वटनगरिकाख्य चतुरशीति व करहाट दशसहस्र' यांसारखीं देतां येतील. पहिल्याचा अर्थ वटनगरी नांवाचा चौऱ्याऐशीं गावांचा समूह व दुसऱ्याचा अर्थ करहाट नांवाचा दहासहस्र गांवाचा समूह. हा दुसरा समूह कदाचित् राष्ट्राइतका मोठा असावा. राष्ट्रकूटकालांत देश हाहि एक राजकीय विभाग डोकावूं लागला होता. राष्ट्रकूटांच्या हाताखालीं मांडलिक अशीं चालुक्य घराणीं अनेक होतीं. त्यांपैकीं विमला-

दित्य नांवाचा चालुक्य इ. स. ८१३ च्या सुमारास ( शक ७३५ ) कर्नाटकांत कुनिंगिगल देशावर राज्य करीत होता. महत्त्वाचीं मोठीं नगरें हे स्वतंत्र राजकीय घटक मानले जात. त्यांजवरील अधिकारी हे पुरपति वा नगरपति असत. राजपद वंशपरंपरागत होतें. बापाच्या पश्चात् गादी सर्वांत वडील पुत्रास व वडील पुत्र कर्तृत्ववान नसल्यास धाकट्या कर्तृत्ववान् पुत्रास मिळे. राजाच्या हयातींतच युवराजाची निवड बहुधा करीत. युवराजपद प्राप्त होण्यास राजपुत्र २४ वर्षांचा व्हावा लागे. युवराज राजधानींत राहात असे. राजा अल्पवयी असेल तेव्हां त्याच्या कोणा पुरुष-आप्तास मुख्त्यार नेमीत.

राष्ट्रकूटांची राजसभा ही पायदळ, रिसाला व हत्ती यांनीं वेढलेली असे. याचा हेतु संरक्षण व दरबारी भपका हा दिसतो. राजसभेस युवराज, इतर राजपुत्र, राजकुलांतील पुरुष, मंत्रिमंडळ, लष्करी अधिकारी व इतर अंमलदार येत. कवि, ज्योतिर्विद, श्रेणीनायक, शेटसावकार राजसभेंत असत. राजसत्तेचें नियंत्रण स्मृतिग्रंथ, सुशिक्षण, लोकमताचा जोर, मंत्रिमंडळास मिळालेले अधिकार, रूढींचें श्रेष्ठत्व व ग्रामसंस्था यांनीं व्हावें. मंत्रिमंडळांत फार वजनदार माणसें घेत. तिसऱ्या कृष्णराजाचा परराष्ट्रमंत्री नारायण याचें वर्णन सम्राटाचा प्रतिहस्त असें करण्यांत आलें आहे. ध्रुवाचा परराष्ट्रमंत्री हल्ल हा सामंत असून पंचमहाशब्दांचा अधिकारी होता. मंत्रि बहुधा युद्धाला जाणारे सेनापति असत. मुख्य मंत्री महासामंताच्या दर्जाचा व पंचमहाशब्दाधिकारी असे. त्याच्या आज्ञेनें मांडलिकांनीं देणग्या दिल्याचीं उदाहरणें आहेत. सम्राट राजधानी सोडून बाहेर गेला असला किंवा आजारी असला तर त्याचा कारभार मुख्य मंत्र्यानें पाहावा.

परराष्ट्रमंत्र्याचा हुद्दा अर्थशास्त्रांत व मनुस्मृतींत दूत असा आहे. परंतु राष्ट्रकूटकाळांत त्यास महासंधिविग्रहक म्हटलें आहे. ताम्रपटाचा मसुदा करण्याचें काम त्याजकडे सोंपवीत. याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षराटीकेंत पुढील आधार सांपडतो.

संधिविग्रहकारी तु भवेद्यस्तस्य लेखकः ।
स्वयंराज्ञा समादिष्टस्स लिखेद्राजशासनम् ॥

राष्ट्रकूटांचे मांडलिक राजे व शेजारचे राजे बरेच असल्यामुळें महासंधिविग्रहकाच्या हाताखालीं सामान्य संधिविग्रहक कांहीं असतीलच. मुख्य न्यायाधीशालाहि मंत्रिमंडळांत स्थान असे. सेनापति हे मंत्रिमंडळांत असल्यामुळें त्यांना राहावयास मोठाले प्रासाद, बसावयास हत्ती, पोशाख इत्यादि इतमाम देत. सेनापति शत्रूवर जय मिळवून आले म्हणजे त्यांना गांवें इनाम मिळत. धर्मव्यवस्था पाहाण्याकरितां धर्माधिकरण नांवाचे अधिकारी असत.

राष्ट्रकूटांचें साम्राज्य अनेक राष्ट्रांचें—प्रांतांचें बनलेलें होतें. एक राष्ट्र पांच-सहा जिल्ह्यांएवढें असावें. अशीं राष्ट्रें त्याच्या साम्राज्यात वीस-पंचवीस तरी असतील. कांहीं राष्ट्रपति राजपुत्रच असत. इतर राष्ट्रपति युद्धांत कीर्ति संपादलेल्यांना नेमीत. राष्ट्रपतींचा दर्जा महासामन्ताच्या किंवा महामंडालेश्वराच्या बरोबरीचा राही. राष्ट्रपती आपल्यापाशीं बंदोबस्ताकरितां मोठा फौजफांटा ठेवीत. त्याचा उपयोग ते स्थानिक अधिकाऱ्यांना व मांडलिकांना दाबांत ठेवण्याकडे करीत. राष्ट्रपति हेच वसूलखात्यावरील मुख्य अधिकारी असत. खेड्यांतील जमिनींची मोजणी व तरम आकारणी ते स्थानिक अधिकाऱ्यांच्या सहकार्यानें करीत. त्यांच्या हाताखालचे विषयपति व भोगपति यांची नेमणूक सम्राटाकडून होत असे. राज्यकारभारांत राष्ट्रपतींना राष्ट्रमहत्तर मदतीस येत. विषयपति व भोगपति हेही फौजा बाळगून राहात. कांहीं विषयपती राष्ट्रपतींप्रमाणें मांडलिकाचा दर्जाहि मिळवीत. विषयपतींना वसुली-अधिकार असतच. ते राष्ट्रपतीला जबाबदार समजले जात. कराची सूट देण्याची अखत्यारी विषयपतींना होती. विषयपतींच्या मदतीस राज्यकारभारांत महत्तराचें मंत्रिमंडळ असे. त्या मंडळांत विषयांतील मातबर

लोक असत. महत्तर कर्नाटकांतील महाजनांसारखे असून त्यांत गांवांतील वडील व वजनदार माणसें घेण्यांत येत.

विषयाचे–जिल्ह्याचे अनेक विभाग पाडले असून त्यांना भुक्ति म्हणत. त्यांत शंभर ते पांचशेंपर्यंत गांव असत. भुक्ति म्हणजे हल्लींचा तालुका. त्यावरील अधिकारी ते भोगिक किंवा भोगपती. भुक्तीच्या पोटविभागांत प्रत्येकीं १० ते ३० गांवें असत. त्याजवरील मुख्य लष्करी अधिकाऱ्यांनाच नेमीत. भुक्ति व विषय याजवरील सरकारी-वसुली-अधिकाऱ्यांच्या मदतीला वतनदार अधिकाऱ्यांची योजना करण्यांत आली होती. जमीन-महसूल धान्यरूपानें घेण्याची पद्धत होती. नगरांच्या प्रमुखांचा हुद्दा पुरपति वा नगरपति असून त्या जागेवरहि बहुधा लष्करी अधिकाऱ्यांनाच नेमीत. त्यांना बिनसरकारी समित्या मदत करीत.

कोणत्याहि जागेवर अधिकारी नेमतांना त्याच्या अंगचे लष्करी गुण, वंशपरंपरा अगर शिक्षण यांपैकीं एक वा अधिक बाबी लक्षांत घेत. वनवासीचें विषयपतित्व तीन पिढ्या एकाच घराण्यांत चालू राहिलें. तिसऱ्या कृष्णराजाचा मंत्रि मोठा कवि, कुशल वक्ता व राजनीतिविशारद होता. बहुतेक अधिकारी फार राजनिष्ठ असत. अधिकाऱ्यांना वेतनादाखल कधीं इनामें, कधीं रोख पगार तर कधीं निम्मा रोकड पगार व निम्मा धान्य अगर अन्यरूपाचा मोबदला देत. गांवाच्या पाटलाला जी जमीन मिळे तिला देशग्रामकूटक्षेत्र अशी संज्ञा होती. ग्रामाधिपतीची जागा पिढीजाद असे. त्यास सरकारी नोकर म्हणण्यापेक्षा लोकप्रतिनिधीच म्हणणें शोभेल. त्याला महाराष्ट्रांत ग्रामकूट व कर्नाटकात गोवंडा असा हुद्दा होता. कांहीं गांवें लष्करी अधिकाऱ्यांना व कांहीं विद्वान् ब्राह्मणांना इनाम असत.

ग्रामरक्षणाची जोखीम ग्रामकूटावर होती. युद्धप्रसंग वारंवार घडत असल्यामुळें लोकांना हत्यारांचा चांगला सराव होता. सर्वांना मिळणारें लष्करी

शिक्षण, देशांतील अनेक मांडलिकांची आपली सत्ता वाढविण्याविषयीं आकांक्षा व त्यामुळें ग्रामस्थांना आपलें बाहुबल दाखविण्याची खुमखुमी यामुळें एका गांवच्या लोकांनीं शेजारच्या गांवकऱ्यांशीं लढावें व त्यांचीं गुरेंढोरें पळवावीं असले प्रकार हमेशा घडत. या लढायांत एकादे वेळीं खेडींच्या खेडीं उध्वस्त होत. असल्या लढाया राष्ट्रकूटांना थांबवितां आल्या नाहींत. तथापि त्या योगानें देशांत आत्मरक्षणाचें व लढाऊ वातावरण सतत टिकण्यानें लोकांतील क्षात्रतेज वृद्धि पावत असे. या गुणांमुळें दक्षिणेंतील लोकांना उत्तरेकडील राजेहि आपल्या सैन्यांत दाखल करून घेत. प्रत्येक खेड्यांत स्वयंसैनिकांचें पथक असून त्यांतूनच साम्राज्य-सैन्यांत शिपायांची भरती करीत. ग्रामकूट हाच त्या पथकाचा नायक असे.

ग्रामकूटाचा जमीनबाबीशीं दृढसंबंध होता. ग्रामपंचायतींतहि तोच प्रमुख असे. खेड्यांतील लहानसहान फौजदारी कज्जे चालविण्याचा अधिकार त्यालाच. हल्लींच्या पाटलाचें खेड्यांत जें कामकाज तेंच तेव्हांच्या ग्राम-कूटाचें. ग्रामकूटाला वर लिहिल्याप्रमाणें नोकरीसाठीं इनाम जमिनी असतच. शिवाय मनूनें सांगितलेलें धान्य, सर्पण व चिल्लर जिन्नस यांवरील कर ग्राम-कूटालाच मिळत; त्याच्यावरील विविध कार्यांच्या जोखमीकडे पाहातां ग्राम-कूट क्षत्रिय असावा हें स्वाभाविक होय. त्याची ही योग्यता सरकार ओळ-खून असे. राजघराण्यांतील स्त्रियांना सुरक्षित पोंचविण्याची कामगिरी ग्राम-कूटाकडे येत असे.

लेखक किंवा कुलकर्णी हा हुद्दा राष्ट्रकूटकाळीं महाराष्ट्रांत आढळत नाहीं. ताम्रपटांतून ग्रामकूट, ग्राममहत्तर यांच्यानंतर युक्त, आयुक्त, नियुक्त वा उपयुक्त हा हुद्दा निर्देशिला आहे. बहुधा हेच गांवचे लेखक किंवा कुलकर्णी असावे. कायस्थांचा प्रवेश राष्ट्रकूटांच्या कारभारांत झाला असून त्यांपैकीं वत्सराजपुत्र गुंडधवल यानें ठाणें जिल्ह्यांतील झरिवालिक येथील ताम्रपट सन ७९३ मध्यें लिहिला आहे.

महाराष्ट्र व दक्षिण गुजराथ यांतील ग्रामपंचायतींत असणाऱ्या गृहस्थांना वर लिहिल्याप्रमाणें महत्तर म्हणत. कर्नाटकांत व कोंकणांत त्यांना महाजन हें नांव होतें. महत्तर किंवा महाजन याचा अर्थ गृहपति म्हणजे कुटुंबांतला वडील मनुष्य. ग्रामकूटांच्या मागून त्यांचा उल्लेख अधिकारिक महत्तर किंवा महत्तराधिकारिणः असा सांपडतो. त्यांच्या समितीकडे जमातींची जबाबदारी असे. कर्नाटकांत निरनिराळया कार्याकरितां समितींचीं पोटमंडळें असत तशीं महाराष्ट्र व गुजराथ यांत नसत. महाजनांना किंवा महत्तराधिकाऱ्यांना सारामाफी देण्याचा अधिकार दिसत नाहीं. गांवांतील सार्वजनिक कामें, शाळा, छत्रें, देवालयें यांची व्यवस्था या समितीकडे वा पंचायतीकडे असे. त्यांना लहान फौजदारी व दिवाणी कज्जे चालविण्याचा अधिकार होता. पंचायती बहुधा देवळाच्या मंडपांत किंवा झाडाखालीं बसत. पंचायतीचे अध्यक्ष निरनिराळया प्रसंगीं निरनिराळे निवडले जात.

राष्ट्रकूटाच्या काळीं वसुलाच्या बाबी येणेंप्रमाणें असत. (१) नियमित कर (२) प्रासंगिक कर (३) दंड (४) सरकारी मिळकतीचें उत्पन्न (शेरी) (५) माडलिकापासून खंडणी. नियमित कर– (१) उद्रंग (२) उपरि कर (३) भुतोत्पातप्रत्याय किंवा शुल्क (४) विष्टि (५) किरकोळ कर.

प्रासंगिक कर– (१) शातभटप्रवेशदण्ड (२) राजसेवकांना वसतिदंड, प्रयाणदंड (३) विशेष प्रसंगीं मागावयाचे कर.

दंड म्हणजे शिक्षा म्हणून घ्यावयाचें द्रव्य.

सरकारी मिळकतीपासून उत्पन्न– (१) शेरी जमिनी, पड जमिनी व झाडें (२) खाणी व मीठ (३) बेवारशी मिळकत व भूमिगत द्रव्य.

नियमित करांपैकीं उद्रंग म्हणजे जमीनबाब आणि उपरि कर म्हणजे इतर कर. जमीनबाबत एकूण उत्पन्नाचे २० टक्के इतकी असावी. जमीनधाऱ्याच्या बाबतींत मान्य, अर्धमान्य, नमस्य, बलगच्छू ( Balgachchu ) इतक्या तऱ्हा होत्या. मान्य जमिनींना सारा माफ होता. त्यांना बलुतेंहि द्यावें लागत नव्हतें

(Inhabitants duer). अर्धमान्य जमिनींना बलुतें द्यावें लागे. या जमिनी बहुधा सरकारी नोकरीसाठीं दिलेल्या असाव्या. नमस्य जमिनी देवब्राह्मणांना दिलेल्या असत. लष्करी अधिकाऱ्यांना पराक्रमाबद्दल मिळालेल्या जमिनींना बलगच्छू ( Balagachchu ) जमिनी म्हणत. त्यांजवरील कर हलका असावा. जमीनधारापद्धति कायमची नसून तिच्यांत कालपरत्वें बदल होत. जमीनधारा मालाच्या रूपानें बहुधा घेत, द्रव्यरूपानें क्वचित् घेत. या कराच्या बाबतींत नियम असा दिसतो कीं उत्पन्न मालाचें असलें म्हणजे कर मालाच्या स्वरूपाचा घ्यावयाचा व रोकडीचें असलें तर रोकडच घ्यावयाची. जमीनधाऱ्याचे अनेक हप्ते असत. गुजराथेंत भाद्रपद, कार्तिक व माघ असे तीन हप्ते होते.

भूतपट्टप्रत्यय नांवाच्या कराचा उल्लेख बऱ्याच ताम्रपटांतून आहे. हा कर जकातीच्या स्वरूपाचा असावा. तूप व कोळसा यांजवरहि कर घेत. हे कर कधीं पदार्थरूपानें व कधीं द्रव्यरूपानें वसूल करीत. विष्टि म्हणजे वेठ. प्रत्येक मनुष्यानें सरकारास कोणत्या तरी रूपानें कर दिलाच पाहिजे अशी राजनीति आहे. गरीब मनुष्यापाशीं द्यावयास पैसा नसल्यास त्यानें कराच्या ऐवजीं वेठ द्यावी. कारागीर व मजूर यांनीं महिन्यांतून एकदोन दिवस सरकाराकरितां काम करावें असा मन्वादिकांनीं नियमच लिहून ठेवला आहे. ही वेठ ग्रामाधिपति त्या त्या लोकांपासून कारणपरत्वें घेत.

घरपट्टी, नौकाकर, लग्नपट्टी यांची गणना किरकोळ बाबींत होते. गांवापाशीं सैन्याचा तळ पडल्यास त्याच्या खर्चाचा बोजा गांवास सहन करावा लागे. पुत्रजन्म, विवाह अशा प्रसंगीं राजे व राजपुरुष यांना प्रजा नजराणे देई ते वेगळे.

या काळांत नाणीं प्रचारांत होतीं त्यांचीं नांवें द्राम, सुवर्ण, गद्याणक, कळंजू ( Kaḷanju ) कासू, मंजडी व अक्कम. द्राम हें रुप्याचें व सोन्याचें

नाणें व बाकीचीं नाणीं सोन्याचीं. त्यांच्या किंमती डॉ. आळतेकर यांच्या मतानें पुढीलप्रमाणें होतात.

| | नांव | धातू | वजन | किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | द्राम | रुपें | $\frac{1}{2}$ तोळा | ६ आणे |
| २ | द्राम | सोनें | $\frac{1}{2}$ तोळा | ७ रु. |
| ३ | कळंजू | ,, | $\frac{1}{4}$ तोळा | ५ रु. |
| ४ | गद्याणक | ,, | $\frac{1}{2}$ तोळा | १० रु. |
| ५ | कामू | ,, | १५ ग्रेन | रु. १८१० |
| ६ | मंजडी | ,, | २॥ ग्रेन | ४ आणे |
| ७ | अक्कम | ,, | १। ग्रेन | २ आणे |

यहींतील सर्व जमिनीचा मालक राजा हा मानला जात नव्हता तरी राजाच्या मालकीच्या गांवोगांवीं असंख्य जमिनी असतच. त्या बेवारशी अगर जप्त केलेल्या असल्या पाहिजेत. जंगलें राजाच्या मालकीचीं होतीं. जीं गांवें राजांनीं दिलीं आहेत त्यांच्या ताम्रपटांत 'संरक्षमालाकुल' असें विशेषण लावलेलें आहे. त्याचा अर्थ ग्रामाच्या चतु:सीमेमधील जंगलांतल्या जमिनी असा वाटतो. पडित जमिनी सरकारी मालकीच्या स्वाभाविकच होत्या. खाणींवर सत्ता राजाची असल्याचा द्योतक शब्द 'सहाभ्यंतरसिद्धि' हा अनेक लेखांतून आढळतो. 'निधिनिक्षेपसमे' अशी शब्दयोजना कित्येक ताम्रपटांत आहे. ती लक्षांत घेतल्यास जमिनींत पुरलेल्या द्रव्यावर राजाची सत्ता असल्याचें निर्विवाद दिसून येतें. एकादा मनुष्य निपुत्रिक वारल्यावर त्याची मिळकत वारसांना देण्यापूर्वीं मिळकतीचा लहानसा अंश सरकारजमा करण्याची वहिवाट होती.

सैन्याची मुख्य छावणी मालखेड या राजधानींत होती. स्थिरीभूतकटक असें मालखेडाचें वर्णन आढळतें. त्याशिवाय प्रत्येक प्रांतांत वेगळी छावणी

असेलच. राष्ट्रकूटांचें दक्षिणेकडील सैन्य वनवासीच्या अधिपतीच्या ताब्यांत व उत्तरेकडील सैन्य गुजराथ शाखेच्या ताब्यांत होतें. त्या सैन्याची मदत स्वारीच्या अगर बंड मोडण्याच्या प्रसंगीं सम्राट घेत असत. राष्ट्रकूटांपाशीं सैन्याच्या चतुरंगांपैकीं रथ हें अंग उपयोगांत नव्हतें. सैन्यानें केलेल्या पराक्रमाच्या वर्णनांत लुटीमध्यें हत्ती, पायदळ व घोडदळ यांचाच तेवढा निर्देश आहे. विजयाबद्दल अगर शौर्याबद्दल सेनापतीचा किंवा इतर लष्करी अधिकाऱ्याचा बहुमान मात्र त्यास रथ देऊन करीत. राष्ट्रकूट पाल व गुर्जर प्रातिहार यांचीं सैन्यें पायदळ, हत्तीदळ व घोडदळ यांविषयीं प्रख्यात असल्याचें तत्कालीन मुसलमान लेखकहि सांगतात. सैन्यांत ब्राह्मणांसुद्धां सर्व वर्गांच्या लोकांस घेत. सैन्याचा एक भाग सनदी लोकांचा व मांडलिकी सैनिकांचा असे. सैन्यांतील जे कित्येक अधिकारी पिढीजाद असत ते पिढिजाद सैनिकांतून घेतले जात असले पाहिजेत. सैनिकांचा पुरवठा फौजेला व्हावा यासाठीं काहीं गांवांना सारा माफ असल्याचें अर्थशास्त्रांत म्हटलें आहे. तो नियम राष्ट्रकूट कालासहि लागू होता. सैन्यास रोकडीच्या अगर मालाच्या रूपानें पगार देण्याची राष्ट्रकूटांची वहिवाट होती.

युद्धांत पडलेल्या सैनिकांच्या बायका-मुलांना पोटगी देत. सैन्यांत तरबेज न झालेले किंवा अर्धवट तरबेज झालेले सैनिक नसत. सैनिकांना शिक्षण देण्याकरितां अधिकाऱ्यांना नेमीत. राष्ट्रकूट सम्राट स्वतः लढवय्ये असल्यामुळें मुख्य सेनापतित्व त्यांजकडेच असेल. ते आपल्या हाताखालीं अनेक सेनापती घेत. सेनापतींचा दर्जा महासामन्तांएवढा असे. त्यांना हत्ती, रथ, सरकारी पोशाख व विशेष चिन्हें असा इतमाम मिळे. हा इतमाम सम्राट स्वतः समारंभानें त्यांस देई. बलाधिकृत, दण्डनायक व महाप्रचण्डदण्डनायक अशा त्यांच्या पदव्या आढळतात. सैन्याबरोबर त्यांचे बाजारबुणगे असत. सैन्यास हरजिन्नस पुरविण्याकरितां कित्येक व्यापाऱ्यांना नेमीत. राजतरंगिणींत जखमी

सैनिकांकारितां डोल्या असत असें लिहिलें आहे. राष्ट्रकूटांच्या सैन्यांत डोली वाहाणारांची स्वतंत्र तुकडी असे.

लांबच्या मोहिमांवर सम्राट आपल्या राण्यांना व आप्तेष्ट स्त्रियांना बरोबर घेत. पहिल्या अमोघवर्षाचा जन्म त्याच्या पित्याच्या सैन्याचा तळ विंध्यपर्वतापाशीं असतां तेथें झाला. युद्धांत प्राचीन नियम पाळले जात नसत. गांवेंच्यागांवें बेचिराख होत व मालमत्ता लुटली जाई. जैन यतिलेलक सोमदेव यालाहि तत्कालीन युद्धनीतीस कूटयुद्ध व विश्वासघातकी युद्ध ( तूष्णीमयुद्ध ) अशीं नांवें ठेवावींशीं वाटलीं.

गांवांतील पोलीस बंदोबस्तावर ग्रामपतीची देखरेख होती. गांवांत होणाऱ्या चोऱ्यांचा तपास लावण्याचें काम येस्करा ( Watchman ) कडे असे. त्याला चोरीचा माग आपल्या आजूबाजूच्या गांवाला भिडवितां न आल्यास चोरीनें झालेलें नुकसान त्याला भरून द्यावें लागे. अर्थात् त्याची ऐपत पाहूनच त्याजवर हा बोजा टाकीत. त्यानें नुकसान भरून न दिल्यास त्याचें बलुतें बंद करीत. नोकरी इनाम त्याच्या जवळच्या भाऊबंदास जाई किंवा दंड, तुरुंग वा शारीरशिक्षा त्याच्या वांट्यास येई. इतकेंहि करून भरपूर नुकसान भरून न मिळाल्यास येस्कराची सबंध जात अगर सरकार त्याची जिम्मा घेई. पोलीस अधिकाऱ्यांना चोरोधरणिक वा दण्डपाशिक अशीं नांवें होतीं. त्यांच्यावर हुकमत राष्ट्रपति व विषयपति हे चालवीत. त्यांच्या ताब्यांत फौज असल्यामुळें पोलिसाला फौजेची मदतहि प्रसंगीं त्यांजकडून मिळे.

राष्ट्रकूटांच्या साम्राज्यांत मांडलिक राज्यें असत; त्यांपैकीं कांहीं जिंकलेलीं राजघराणीं व कांहीं नवीन नेमलेले राष्ट्रपती अगर सामंत असत. हे राष्ट्रपती व सामंत हळूहळू पिढिजाद बनून कांहीं कालानें त्यांची गणना स्वाभाविकच मांडलिकांत होत असे. ते पंचमहाशब्दांचे अधिकारी असत. शृंग, शंख, भेरी, जयघंटा व टमट ( Tamata ) हे पंचमहाशब्द. त्याशिवाय

सिंहासन, चामर, पालखी व हत्ती हींहि राजचिन्हें त्यांस वापरण्याची परवानगी असे. मांडलिक राजांच्या सभेंत सम्राटाचा वकील घ्यावा लागे. तो तेथील कारभारावर देखरेख ठेवी, हुकमत चालवी व साधारणपणें सध्याच्या पोलिटिकल एजंटाप्रमाणें अथवा रेसिडेंटाप्रमाणें वागे.

सर्व मांडलिक सारख्या दर्जाचे नसत. गुजराथेचे राष्ट्रकूट व कोंकणचे शिलाहार यांचे अधिकार मोठे. त्यांना अंतर्गत स्वायत्तताहि अधिक. त्यांना स्वतःचे मांडलिक उत्पन्न करतां येत. ठराविक खंडणी सम्राटास देऊन टाकली म्हणजे सर्व उत्पन्नाचे धनी ते. कर बसविण्याची व गावें इनाम देण्याची सत्ता ते उपभोगीत. गांवें त्यांना विकतांहि येत. त्यासाठीं सम्राटाच्या मंजुरीचीहि गरज नसे. पण छोट्या मांडलिकांची सत्ता अगदीं मर्यादित. त्यांना स्वतःचे मांडलिक नसत व गांवहि कोणास मुखत्यारीनें इनाम देतां येत नसे. तिसऱ्या गोविंदाचा चालुक्य मांडलिक बुद्धवर्ष यास एका जैन मुनीनें शनीच्या पीडेपासून मुक्त केल्याबद्दल एक गांव इनाम देण्याचें मनांत आलें. तेव्हां त्यासाठीं त्याला गोविंदास आर्जवावें लागलें. याशिवाय मांडलिकांचा तिसरा वर्ग असून त्याला स्वातंत्र्य अगदींच बेताचें. तें इतकें कीं, त्याच्या राज्यांतील एकादें गांव इनाम देण्यास सम्राटाला दिक्कत वाटूं नये. अशा प्रकारचें एक गांव महासामंत प्रचंडदंडनायक चन्द्रगुप्त याच्या हद्दींतील दुसऱ्या कृष्णराजानें दिलें. असल्या चिमुकल्या संस्थानिकांना सम्राटापुढेंच काय पण त्याच्या मंत्र्यापुढेंहि वचकून राहावें लागे. एकादा संस्थानिक बंडखोर निघाला तर त्याच्या अप्रतिष्ठेस सीमा नसे. तिसऱ्या गोविंदानें वेंगीच्या चालुक्य मांडलिकास आपले तबेले झोटावयास लावले होते. मग त्यांचा खजिना, नर्तकी, घोडे, हत्ती सम्राटानें त्यांजपासून अराजनिष्ठेबद्दल हिरावून घेतल्यास नवल कसलें?

पण जर कां मध्यवर्ती सत्ता दुर्बल बनली तर मांडलिकांचा शिरजोरपणा विचारूंच नये. सम्राटानें त्यांजवर केलेल्या जुलुमाचें उट्टें काढण्यास ते

टपलेले असत. सम्राटास मदत द्यावयाची तेव्हां त्याजपासून ते हव्या त्या अटी कबूल करून घेत. त्यांतल्या त्यांत राजपदाबद्दल भावांत भांडण जुंपल्यास ते एकाद्या भावाची बाजू घेऊन त्याला हातचें बाहुलें करून ठेवीत. क्वचित् ते दुष्ट सम्राटास तुरुंग दाखविण्यासहि कमी करीत नसत. ध्रुव, अमोघवर्ष पहिला व अमोघवर्ष तिसरा यांना सिंहासन ब-याच अंशीं मांडलिकांच्या मदतीनेंच मिळवितां आलें.

## कल्याणचे चालुक्य

राष्ट्रकूट सम्राट गादीवर बसतांना ज्या सामासिक पदवीचा शेवट वर्ष या शब्दानें होतो अशी पदवी आपल्या नांवास लावीत. जसें अमोघवर्ष, अकालवर्ष इत्यादि. यांतील वर्ष शब्दाचा अर्थ वृष्टि असून अमोघवर्ष म्हणजे यशस्वी वृष्टि पाडणारा व अकालवर्ष म्हणजे भलत्या वेळीं वृष्टि पाडणारा असा होतो. कल्याणचे चालुक्य सम्राट ज्यांत मल्ल शब्द आहे अशी पदवी आपल्या नावास जोडीत. मल्ल शब्दाचा अर्थ कुस्तीबाज, पैलवान, लढवय्या असा असून तो राजाच्या शौर्याला शोभणारा आहे. सर्व भारतीय राजांप्रमाणें चालुक्यांतहि पित्याच्या मृत्यूनंतर ज्येष्ठ पुत्रानें गादीवर यावें अशी पद्धत होती. पुत्रसंतान नसल्यास धाकट्या भावाची योजना करण्यांत येई. चालुक्यांतील सर्वांत पराक्रमी राजा सहावा विक्रमादित्य हा मात्र वडील भावास पदच्युत करून गादीवर बसला. वडील भाऊ सोमेश्वर गादीवर होता, तेव्हां विक्रमादित्यच मोहिमांवर जात असे. त्यामुळें राज्यांत त्यालाच सोमेश्वरापेक्षां अधिक मान मिळत होता. हें सोमेश्वरास न देखवल्यामुळें असो किंवा इतर कारणामुळें असो, सोमेश्वर त्याच्या पाडावाच्या मसलती करूं लागला. अखेर ही दुही असह्य झाल्यावर विक्रमादित्यानें सोमेश्वराला बाजूस सारून आपणच राज्य बळकावलें. विक्रमादित्यानें घालून दिलेला धडा त्याचा धाकटा भाऊ जयसिंह यानें गिरविला. पण विक्रमादित्यापुढें त्याचें कांहीं न चालून तो पकडला गेला. बदामीचे चालुक्य व राष्ट्रकूट यांजप्रमाणें कल्याणचे चालुक्यहि

आपल्या घराण्यांतील पुरुषांना कारभारात घेऊन त्यांना सामंतासारख्या मोठ्या हुद्याच्या जागांवर नेमीत. राजाचे ते जवळचे संबंधीं असल्यामुळें राज्यास बळकटी आणण्यास व राज्यविस्तार करण्यास त्यांची बरीच मदत होत असे यांत शंका नाहीं. तथापि एकादे वेळीं राज्यांत यादवी माजवून राजाविरुद्ध बंड उभारण्यासहि ते मागें पुढें पहात नसत. त्यांनीं बंड न केलें तर सेनापति, सामंत व मांडलिक हेहि बंड उभारीत. सारांश काय कीं स्वतः राजा शूर व समर्थ असला तरच त्याचें राज्य टिकावयाचें. चालुक्याचें राज्य ज्यानें बुडविलें तो विज्जल त्यांचा महाप्रधान व सेनाधिपति होता हें विसरतां कामा नये. चालुक्य विक्रमादित्य सहावा व सोमेश्वर तिसरा हे गुणज्ञ व विद्वान राजे झाले यावरून त्यांच्या काळांत राजपुत्रांना उच्च शिक्षण देण्याची वहिवाट असावी असें वाटतें.

कल्याणवासी चालुक्याच्या राज्याची वांटणी वंशपरंपरागत मांडलिक राजे व अधिकारी यांजमध्यें झालेली होती. पैकीं वंशपरंपरागत मांडलिक बरेच असल्यामुळें खुद्द सम्राटाच्या अंमलाखालचा प्रदेश सहाजिकच थोडा होता. महाराष्ट्रांत सेऊण देशचे यादव, कोंकण व कोल्हापुर येथील शिलाहार घराणीं गोंव्याचें कदंब घराणें, शिरवळचें छोटें चालुक्य घराणें, जुन्नरचें सिंद घराणें यांचा समावेश त्या मांडलिकांतच होतो. जुन्नरच्या सिंदांचा उल्लेख शक ९३३ व शक १२१६ तील लेखांत आढळतो. त्यावरून तें घराणें बहुधा कल्याणवासी चालुक्यांच्या प्रारंभापासून तों थेट यादव घराण्याच्या अखेरीपर्यंत नांदत असल्याचें सूचित होतें. या सर्वांस कमीअधिक प्रमाणांत स्वातंत्र्य उपभोगावयास सांपडत होतें.

महाराष्ट्र वगळून उरलेला प्रदेश म्हणजे कर्नाटक व तैलंगण. कर्नाटकापैकीं विजापूर व धारवाड जिल्हा यांच्या कांहीं टापूंत येलबुर्ग येथें एक सिंद घराणें, धारवाड जिल्ह्याचा कांहीं भाग, म्हैसूर प्रांताचा पश्चिम भाग व उत्तर कानडा यांत हनगलचे कदंब, बेळगांव जिल्ह्याचा पश्चिम भाग व

गोंवें यावर कदंबांचें दुसरें घराणें, म्हैसूरच्या पूर्व भागांत होयसळ, बेळगांव जिल्ह्याच्या पूर्व भागांत सौंदत्तीचे रट्ट आणि विजापूर जिल्ह्याच्या उत्तर भागात कलचुरी व तैलंगणांत काकतीय यांचीं राज्यें होतीं.

राजपुत्र व राजबंधु यांजकडे वंशपरंपरेनें राज्यें देण्यांत आलेलीं दिसत नाहींत. राण्यांकडेहि राज्यकारभार कांहीं प्रमाणांत आढळतो. परंतु त्यांजवर विशेष जोखमीचें काम टाकण्यांत येत नसे. सहाव्या विक्रमाची पट्टराणी लक्ष्मादेवी पिरियरसी ही विक्रम मोहिमेवर गेला असतां कल्याणास कारभार पाहात असली तरी तो केवळ गौरवार्थच समजला पाहिजे. देवब्राह्मणांना अग्रहार दिलेले असत. स्त्रियांची धर्मनिष्ठा व देवब्राह्मणांवरील श्रद्धा लक्षात घेऊन त्यांजकडे अग्रहारांची व्यवस्था सोंपविण्यांत येत असे. उदाहरणार्थ विक्रमादित्य ६ वा याची एक राणी तारादेवी इ. स. १०७७ मध्यें नारायण मंगल या अग्रहाराची व्यवस्था पाहात होती. राण्यांना खाजगी खर्चासाठीं कांहीं उत्पन्नहि तोडून देण्यांत येत असून त्यास अंगभोग अशी संज्ञा होती. तारादेवीला नारायण मंगला अग्रहारांतील उत्पन्नाचा सरकारी अंश अंगभोगार्थ मिळत होता.

संस्थानिकांना मंडलिक, महासामंत, मंडलेश्वर, महामंडलेश्वर व महामंडलेश्वराधिपति अशा पदव्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें व राजाच्या मर्जीप्रमाणें दिलेल्या असत. मंडलिकाचा दर्जा सर्वांत कमी. रट्टराज शिलाहार हा मंडलिक होता. त्याचें राज्य दक्षिण कोंकणावर सत्याश्रय चालुक्याच्या कारकिर्दींत होतें. मंडलेश्वर हा मंडलिकाच्या जोडीचा दिसतो. त्याहून महामंडलेश्वराचा दर्जा साहजिकच वरिष्ठ. विक्रम ६ वा याचा सासरा जोगमरस उर्फ जोगमराणा हा महामंडलेश्वर असून मंगळवाडचा मंडलेश्वर होता. मंगळवाडाशिवाय दरि काडूनाड हाहि प्रदेश त्याच्या ताब्यांत होता. त्या प्रदेशाचा तो महामंडलेश्वर होता. ज्याच्या हुकमतीखालीं अनेक मंडलेश्वर आहेत, तो महामंडलेश्वर. मंडलेश्वराचा अधिकार वेगळा असल्यामुळें एकच

अधिकारी एका प्रदेशाचा महामंडलेश्वर तर दुसऱ्याचा क्वचित मंडलेश्वरहि असे. महामंडलेश्वर व महासामंत यांची योग्यता जवळ जवळ सारखी दिसते. कारण यादवांपैकीं भिल्लम तिसरा हा महासामंत असून त्याच्या नंतरचा सेऊणचंद्र दुसरा महामंडलेश्वर होता. महासामंताधिपति व महामंडलेश्वराधिपति या पदव्या महासामंत व महामंडलेश्वर यांजहून वरिष्ठ प्रतीच्या. अनेक महासामंतांवरचा प्रमुख तो महासामंताधिपति व अनेक महामंडलेश्वरांवरचा प्रमुख तो महामंडलेश्वराधिपति. उत्तर कोंकणाचा राजा अनंतदेव शिलाहार याच्या पराक्रमावर खुष होऊन विक्रम चालुक्य सहावा यानें त्यास या दोन्ही पदव्या दिल्या होत्या.

पिढीजाद संस्थानिकांशिवाय आजीव स्वरूपाचे सरकारी अधिकारी असंख्य असत. एकाच घराण्यांत एकामागून एक लायक असे पुरुष निर्माण होत गेल्यास तेंच घराणें पिढिजाद संस्थानिकांत स्थान पटकावून बसे. बिज्जल कल्चुरी यास चालुक्य राजवटींत संस्थानिकाचा दर्जा दोन पिढ्यांत प्राप्त झाला. मंडलेश्वर, महामंडलेश्वर व महामंडलेश्वराधिपति या पदव्या फक्त पिढीजाद संस्थानिकांच्या. त्या अधिकाऱ्यांच्या वांट्यास येत नसत. अधिकारी महासामंत, महासामंताधिपति व महामंडलाधिपतिहि होत. त्याप्रमाणें विक्रम सहावा याच्या कारकिर्दीत नोळंबवाडीचा अधिकारी ब्रम्मरस हा महाप्रधान व दंडनायक असून महामंडलाधिपतीहि होता. तसेंच त्याच्याच कारकिर्दीत दंडनायक गोविंदरस हा महासामंताधिपतीहि होता.

अधिकाऱ्यांचे हुद्दे दंडनायक, महासामंत, महाप्रधान, महासामंताधिपति, महासेनाधिपति, महादंडनायक, संधिविग्रहिन्, अन्तःपुराध्यक्ष, भानसवेगाडे असे असत. भानसवेगाडे म्हणजे महानसावरील—मुदपाकखान्यावरील अधिकारी. हा हुद्दा अर्थात् कानडी आहे. दंडनायक याला " हिरिये " हा कानडी प्रत्यय क्वचित् लागला असून त्याचा अर्थ थोरला म्हणजे मोठा असा आहे. दंडनायक असें सेनापतीस व न्यायाधीशासहि म्हणत. चालुक्यांच्या राजवटींत

एकाच वेळीं अनेक दंडनायक व महादंडनायक आढळतात. त्यावरून दंडनायक म्हणजे न्यायाधीश दिसतो. गोंव्याचा कदंबराजा जयकेशिन् तिसरा याच्या कारकिर्दींत एका खटल्यांत पक्षकारांनीं दिव्य केलें त्या वेळीं महाप्रधान व दंडनायक हे उभयतां हजर होते. तें लक्षांत घेतां दंडनायक म्हणजे न्यायाधीश व महादंडनायक म्हणजे वरिष्ठ न्यायाधीश असें म्हणावें लागतें. हा फरक सबजज्ज व डिस्ट्रिक्ट जज्ज यांच्यासारखा जाणावा. एकाच अधिकाऱ्याकडे विविध अधिकार दिलेले आढळतात. उदाहरणार्थ सोमेश्वर तिसरा याच्या कारकिर्दींत इ. स. ११४३ मध्यें वनवासी द्वादश सहस्रावरचा अंमलदार ब्रमणय्य ऊर्फ ब्रमदेवरस हा महाप्रधान, सेनाधिपति, कन्नडसंधिविग्रहिन् व हिरीय दंडनायक होता. कन्नडसंधिविग्रहिन् म्हणजे कर्नाटकांतील राजे-रजवाड्यांमधील किंवा यांस उद्देशून असणारे राजनैतिक व्यवहार पाहाणारा. महाप्रधानांची संख्या इतकी मोठी वाटते कीं ते सर्व राजाचे सल्लागार नसून ते ज्या प्रांतावर असत त्याचे कारभारी ( Administrator ) असावे. वरील दिव्याचा दाखला डोळ्यांपुढें ठेवल्यास हल्लींच्या भाषेंत बोलावयाचें तर कलेक्टर व डि. जज्ज याच्या नजरेखालीं तें दिव्य झालें. हल्लीं जिल्ह्याच्या कलेक्टराकडेहि विविध अधिकार सोंपविले असतात. तसेंच चालुक्यांनीं ते ब्रमदेवरसाकडे सोंपविले असून तो वनवासीचा कारभारी, तेथील फौजेवरचा मुख्य अंमलदार, त्या प्रांतांतील राजे-रजवाड्यांचे राजनैतिक प्रश्न सोडविणारा पोलिटिकल एजंट व न्यायाधीश होता असें दिसून येतें. महाप्रचंड दंडनायक हा हुद्दा विरळा आढळतो. त्यावरून तो सबंध राज्यांत मुख्य न्यायाधीश म्हणजे चीफ जस्टिस समजावा.

ग्राम, भुक्ति, विषय व राष्ट्र असे राज्याचे राजकीय विभाग असले तरी त्यांशिवाय ग्रामसमूह हा घटक धरून त्याजवर उभारलेल्या राजकीय विभागांना चालुक्यकाळीं प्राधान्य असलेलें आढळतें. त्या दृष्टीनें पाहिल्यास गंगवाडी ९६००० हा सर्वांत मोठा विभाग, तर बेळुग्राम ७०, बागडगे ७०

किंवा कुक्नूर ३० हा लहान विभाग. विभाग लहान असल्यास अनेक विभाग एकाच अंमलदाराच्या ताब्यांत देत. त्याप्रमाणें दंडनायक महादेव याजकडे सोमेश्वर तिसरा याच्या कारकिर्दीत बेळवोले ३०० व पुलेगेरे ३०० हे दोन विभाग असून त्यांवर तो न्यायाधीश होता. अर्थात् इतर कामें पाहण्यास याच्याशिवाय इतर अधिकारी असतीलच.

संस्थानिकांवर नियंत्रण ठवण्यास साम्राटाचे बंधु व पुत्र असत. अथवा तें शक्य नसेल तेव्हां साम्राज्यसरकार इतर अधिकाऱ्यांना नेमून पाठवी. त्या नियमास अनुसरून विक्रम सहावा याच्या काळीं महामंडलेश्वर उदयादित्य गंग पेर्माडी हा वनवासी १२००० चा राजा असतां नागवरमय्य हा बेळवोले ३०० व पुलेगेरे ३०० यांजबरोबर वनवासीचाहि महाप्रधान व दंडनायक नेमण्यांत आला होता. बहुतेक सर्व मोठे अधिकारी क्षत्रिय वंशांतील वा राजवंशाशीं संबंध असणाऱ्या थोर घराण्यांतील असत. त्यांचा हा संबंध त्यास अरस ( अरसू ) हें उपपद लावण्यांत येत असे त्यावरून अजमावतां येतो. याचीं उदाहरणें विपुल आढळतात. सोमेश्वर दुसरा याच्या कारकिर्दीतील महासामंत कलियमरस हा जीमूतवाहन वंशांतील बहुधा शिलाहार असावा. विक्रम सहावा याच्या कारकिर्दीत इ. स. ११०२ मध्यें गोविंदरस हा दंडनायक व कर वसूल करणारा अधिकारी असून पुढें तो महादंडनायक, महासामंताधिपति व महाप्रधान झाला. श्रीपातियरस, बरमदेवरस, लक्ष्मरस हीं नांवें या प्रकारचीं होत. याचा अर्थ असा कीं, या काळीं क्षत्रिय जात प्रबळ असून राज्यकारभारांतील मुख्य अधिकाराचा वांटा त्यांनींच उचलला होता. क्षत्रियांच्या खालीं ब्राह्मणांचा क्रम लागतो. अमूक नांवें ब्राह्मण अधिकाऱ्याचीं असें बिनचूक सांगणें कठीण असलें तरी कांहीं नांवांचे बाबतींत अंदाज सहसा फसणार नाहीं. सोमेश्वरभट्ट, केशवादित्यदेव, बलदेवय्या हीं नांवें ब्राह्मणांचीं दिसतात. यापैकीं सोमेश्वरभट्ट हा दुसऱ्या सोमेश्वराच्या काळात महासामंताधिपति, दंडनायक, महाप्रधान व हिरीय महासंधिविग्रहिन्,

केशवादित्य देव दंडनायक आणि बलदेवय्या हा महाप्रधान, हिरीयसंधिविग्रहिन्, सेनाधिपति व दंडनायक होता.

याकाळीं न्यायदानाच्या बाबतींत पक्षकारांना तसें पसंत पडल्यास दिव्याचाहि अवलंब करण्यात येत असे. एकदां कित्तुर येथील काळेश्वर देवाचा आचार्य ( पुजारी ) शिवशक्ति व मूलस्थान देवाचा आचार्य कल्याणशक्ति यांजमध्यें जमिनीच्या स्वामित्वाविषयीं वाद उत्पन्न झाला. दोन्ही पक्षकार महाप्रधान व दंडनायक ईश्वर याजपुढें हजर होऊन त्यांनीं दिव्यानें निर्णय लावून घेण्याचें ठरविलें. नंतर इ. स. १२०१ मध्यें आषाढ वद्य सप्तमीचे दिवशीं रविवारीं प्रमुख ग्रामस्थांसमोर देगवे गांवीं मल्लिकार्जुनाच्या देवळांत ते दोघे हजर झाले. त्यावेळीं कल्याणशक्तीनें डोक्यावर मुद्रा ठोकून जमीन मूलस्थान देवाची आहे असें शपथेवर सांगितलें. आणि शिवशक्तीनें तापवून लाल केलेला बाण हातांत घेऊन ती जमीन काळेश्वर देवाची आहे असें शपथेवर म्हटलें. दुसऱ्या दिवशीं मुख्य ग्रामस्थांनीं शिवशक्तीचा हात तपासला. पण त्यास कांहींहि इजा झाली नाहीं असें पाहून त्यांनीं शिवशक्तीच्या बाजूचा न्याय दिला. ( Bom. Gaz. Vol. I, Part II, P. 571).

बदामीचे चालुक्य, राष्ट्रकूट व कल्याणचे चालुक्य या तिन्ही साम्राज्यांत दोन घटना स्पष्टपणें आढळतात. पहिली अशी कीं त्यांचीं साम्राज्यें कोणी परकीय राजांनीं येऊन न बुडवितां त्यांच्या मांडलिकांनीं वा सेनापतींनीं बुडविल्यामुळें राज्यक्रांतीचे अनिष्ट परिणाम त्यांजवर पडले नाहींत. दुसरी अशी कीं चातुर्वर्ण्य किंवा ज्ञातिव्यवस्था देशांत प्रचलित असतां सम्राटांना सैनिकांचा तोटा कधींच पडला नाहीं. त्यांना जरूर तितके सैनिक सर्व जातींतून मिळत असत. कारण इतर जातींतील शूर लोक स्वेच्छेनें क्षात्रवृत्ति स्वीकारण्यास पुढें येत.

सोलापूर जिल्ह्याजवळ तुळजापूर तालुक्यांत सावरगांव येथें कदंबराज मारडदेव याचा शक १०८६ तील शिलालेख सांपडला आहे. त्यांत नाण्यां-

पैकीं दाम व विसोवे म्हणजे विश्वे हीं नाणीं आढळतात. कल्याणवासी चालुक्याचे समकालीन असे माळव्याचे परमार यांच्या राज्यांत रूपक ( रुपया ) अर्धरूपक ( अधेली ) द्राम व विंशोपक ( विश्वे ) हीं नाणीं चालू होतीं. त्यावरून महाराष्ट्रांतहि तीं नाणीं यावेळीं सुरू असतील असे समजण्यास जागा आहे. त्याच काळांतील अर्थात् शक १०७३ मधील कोल्हापूरचा विजयादित्य शिलाहार याचा कागलपासून नैऋत्येस अडीच कोसावर बामणी या गांवीं जैन देवळाच्या दरवाजांत एक शिलालेख आहे. त्यांत भूमिमापनाचीं निवर्तण, स्तंभ, हस्त हीं मापें सांगितलीं आहेत. तीं लक्षात घेतल्यास आठ यव=एक अंगुळी, चोवीस अंगुळें=एक हस्त, चार हस्त=एक स्तंभ किंवा दण्ड, एक सहस्रदण्ड=एक कोस व चार कोस=एक योजन हें कोष्टक या काळांत चालू होतें असें मानतां येतें. दहा हस्तांचा एक वंश होत असे. वीस वंश लांब व वीस वंश रुंद यांचें जें चतुर्भुजक्षेत्र तें निवर्पण किंवा निवर्तन.

## यादव घराणें

यादवराजे राष्ट्रकुटांच्या आमदानींत उदयास आले. यादवराजा दुसरा भिल्लम हा राष्ट्रकूटांचा महासामंत होता. पुढें राष्ट्रकूट सत्ता बुडून कल्याणच्या चालुक्यांकडे सम्राटपद गेल्यावर यादवांनीं चालुक्यांचें मांडलिकत्व पत्करलें. कालाच्या ओघांत हेहि चालुक्य रसातळास गेले व कलच्युरी यांजकडे कांहीं काळ राज्य आलें. त्यांजपासून चालुक्यांचा उत्तरेकडील मुलूख जिंकून यादवराजा चौथा भिल्लम स्वतंत्र झाला. यादवकाळांत राष्ट्र, विषय हे विभाग मागें पडून देश हा राजकीय विभाग बराच वापरला जाऊं लागला. देशमुख, देशपांडे या पदव्या व वतनें हीं यांच्या किंवा कल्याण चालुक्यांच्या काळांत महाराष्ट्रांत विशेष रूढ होत चाललीं असावीं. नाईक, महाजन, पाटील गुरव, कुलकरणी व तराळ यांचीं वतनें व हुद्दे एव्हां स्थापन झाले होते.

महारकी, जोसकी, कुंभारकी हींहि वतनें यावेळीं जारी होतीं. नाण्यांत दाम, विश्वा, निष्क, धरण हीं नाणीं आढळतात.

त्यावरून वीस वराटका = एक काकिणी, चार काकिण्या = एक पण, सोळा पण = एक द्राम (दाम), सोळा द्राम = एक निष्क, या कोष्टकांतील सोन्याचीं नाणीं, किंबहुना सर्व नाणीं या काळांत रूढ असावीं. तसेंच दोन यव = एक गुंज, तीन गुंजा = एक वल्ल, आठ वल्ल = एक धरण, दोन धरण = एक गद्याणक, हींहि वजनें चालू असावीं.

अग्निपुराणांत नाण्यांचीं कोष्टकें दिलीं आहेत. तीं पुढीलप्रमाणें—

३ यव = १ कृष्णल (गुंज), ५ कृष्णल = १ माष, १२ कृष्णल = १ कर्ष किंवा कार्षापण, १६ माष = १ सुवर्ण, ४ सुवर्ण = १ निष्क, १० सुवर्ण = १ धरण. कार्षापण हें नाणें बहुधा तांब्याचें असे.

८० कवड्या = १ पण, २०० पण = प्रथम साहस, ५०० पण = मध्यम-साहस, १००० पण = उत्तम साहस.

गुन्हेगारांसाठीं तुरुंग असून कैद्यांना खोडाबेडीसारख्या शिक्षा देत. सरकारी कामकाज करून घेण्याकरितां वेठबिगारीची पद्धत होती.

यादवांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हुद्दे श्रीकरणाधिप, सेनापति, कुल-करणाधिप, महापरमविश्वासिन्, महाप्रधान, दंडनायक, बहात्तर नियोगाधिपति, सर्वाधिकारी, हस्तिपकाध्यक्ष असे होते. श्रीकरणाधिप हा अर्थसचिव, कुलकरणाधिप हा जमीनमहसूल खात्याचा मंत्री वाटतो. या काळांत सेऊणदेश, आम्रदेश, माणदेश, मिरिंजदेश, कुंडीदेश असे देशवाचक पडलेले राजकीय विभाग नजरेस येतात.

गुप्तांच्या राजवटींतहि देश हा राजकीय विभाग होता. त्यांचा सर्वांत मोठा राजकीय विभाग देश, त्याहून लहान ती भुक्ति, भुक्तीहून प्रदेश लहान व

प्रदेशांहून विषय लहान. यावरून सर्व भरतखंडांत राजकीय विभाग सर्वसामान्य रीत्या कमी अधिक प्रमाणांत सारखेच असत.

ग्रामाधिकाऱ्यांपैकीं कुलकर्णी हा हुद्दा यादवकाळांत रूढ होता. तसा पाटिल हाहि हुद्दा रूढ असल्याचें महानुभावीय वाङ्मयांत दृष्टीस पडतें. माळव्यावरील परमार राजघराण्यानें पट्टलिक ( पाटिल ) हा हुद्दा या काळीं सुरू केला होता. माळव्यांत पट्टलिक, गुजराथेंत पटेल आणि महाराष्ट्रांत पाटिल हे हुद्दे समानार्थक होत. जोशी हाहि ग्रामाधिकारीच होय. तो हुद्दा खानदेशांतील दोंडाई येथील कृष्णदेव-यादव-कालीन शिलालेखांत महेश्वर ज्योतिषी या नांवांत सांपडतो. पण प्रत्यक्ष जोशी हाच हुद्दा गोंवेकर कदंबराजा जयकेशी ३ रा (इ. स. ११८७–१२१२ ) याच्या मणिगुंडगें येथील शिलालेखात ' मणिगुंडगें येथील बोम्मया जोशी ' या स्वरूपानें आला आहे.

## शिलाहार

शिलाहार राजघराणीं मांडलिक होतीं. शिलाहार राजे प्रथम राष्ट्रकूटांचे आणि मग चालुक्य व यादव राजांचे अंकित झाले. तथापि मांडलिकांत त्यांचा दर्जा वरचा राहिला. छोट्या मांडलिकांना या वेळीं साम्राज्य-सरकाराच्या परवानगीशिवाय जमिनी किंवा गांवें इनाम देतां येत नसत. पण शिलाहारांनी तीं देतांना आपल्या दानपत्रांत तसा उल्लेख केला नाहीं. मांडलिक या नात्यानें शिलाहार राजे साम्राज्य-सरकारास खंडणी देत व जरूर तेव्हां सैन्याची मदत पाठवीत. अन्तर्गत कारभारांत त्यांना पूर्ण स्वातंत्र्य होतें. त्यांनीं राज्यकारभाराच्या व्यवस्थेसाठीं नेमलेल्या प्रधानमंडळांत पांच-सहा प्रधान असत. त्या सर्वांत जो मुख्य, त्याचा हुद्दा मुख्य प्रधान. त्यास कोठें सर्वाधिकारीहि म्हटलें आहे. उत्तर कोंकण शिलाहारांचा श्रीकरण हाहि एक मंत्री होता. परराष्ट्रमंत्र्याकडे युद्ध किंवा तह करण्याचें काम. त्याला महासान्धिविग्रहक असा हुद्दा होता. शिलाहारांभोंवतीं अनेक राज्यें पसरलीं होतीं.

महासंधिविग्रहकाचा कारभार एका मंत्र्यास उरकणारा नसल्यामुळें त्याच्या मदतीस दुय्यम मंत्री देण्यांत येत. त्यांचे हुद्दे त्या त्या राष्ट्रावरून ठरत. उदाहरणार्थ कर्नाटकांतील चालुक्यांशीं ज्याचा संबंध तो कर्नाटकसंधिविग्रहक. जमाबंदीचें काम पाहाणारा भाण्डागारिक. त्याकाळीं जमीन महसूल व इतर कर जिनसांच्या रूपानें घेत असल्यामुळें या मंत्र्यास असें नांव देण्यांत आलें. त्याच्या मदतीस एक दुय्यम अधिकारी असे. निरनिराळ्या अधिकाऱ्यांचा पगार भाण्डागारिकामार्फत मिळे. त्याशिवाय सेनापति, न्यायाधीश इत्यादि इतर मंत्री असत.

राज्यांतील मोठ्या शहरांचा कारभार पंचांमार्फत चाले. गुणपुर नांवाच्या नगरांत सन ९९७ सालीं पंचायत होती. तिजमधील पांच सभासदांचीं नावें भडाणें येथील ताम्रपटांत नमूद आहेत. यांतील बहुसंख्य सभासद व्यापारी वर्गांतील होते. ते लोकनियुक्त कीं सरकारनियुक्त होते हें समजत नाहीं.

राज्याचे विभाग पाडले असून त्यांना विषय म्हणत. त्यांवर विषयपति नांवाचे अधिकारी नेमले जात. सरकारी कर वसूल करणें व अन्तस्थ शांतता राखणें हीं त्यांचीं मुख्य कामें असत. पाटील व कुळकर्णी यांचीं कामें वंशपरंपरेचे अधिकारी करीत. ते गांवपंचायतीच्या मदतीनें आपल्या गांवांची व्यवस्था ठेवीत. जमिनीवरील कर, आयात जकात, मालावरील कर, सरकारी जमिनी व अरण्यें यांचें उत्पन्न या सरकारी उत्पन्नाच्या बाबी असत. शिलाहारांच्या राज्यांत बंदरें पुष्कळ असल्यामुळें त्यांना आयात जकातीचें उत्पन्न चांगलें येई. परदेशांहून येणाऱ्या जहाजांवर स्वदेशी बंदरांतून येणाऱ्या जहाजांपेक्षां आधिक जकात घेत असल्याचें रट्ट राजाच्या ताम्रपटांत दिसतें. शिलाहारांस समुद्र किनारा असल्यामुळें त्यांजपाशीं आरमार असेलच. उत्तर कोंकणाचा राजा सोमेश्वर याजवर महादेव यादवानें स्वारी केली असतां तो जहाजांत बसून पळाला. महादेवानें त्याजवर आरमारी हल्ला चढविला.

त्याजबरोबर सोमेश्वर नावेंत बसून लढला व शेवटीं नाव व तो दोघेंहि बुडालीं. यावरून शिलाहारांपाशीं आरमार असलें पाहिजे.

शिलाहारांपैकीं फक्त छित्तराजदेवाचीं चांदीचीं नाणीं सांपडलीं आहेत. त्यांच्या एका बाजूस एक अत्यंत असमाधानकारक कोरलेला लेख असून दुसऱ्या बाजूस राजाचें नांव दोन ओळींत लिहिलें आहे. ठाण्यांत एका गटाराखालच्या भांड्यांत ४१० नाणीं १९२४ सालीं सांपडलीं. प्रत्येक नाण्याचें वजन पांच आणे भरलें. धरण व गद्याणक हीं सोन्याचीं नाणीं प्रचारांत होतीं.

शिलाहारांच्या काळांत कोंकणपट्टींत अरबांची व्यापाराच्या निमित्तानें हळूहळू वस्ती वाढत चालली होती. गोंव्याचा कदंबराजा दुसरा जयकेशी यानें एका अरबास प्रधानहि नेमलें होतें. उत्तर कोंकणाचा राजा अनंतपाल याच्या खारेपाटण येथील ताम्रपटांत वासैद म्हणजे सय्यद हें नांव आढळतें. शिलाहारांच्या एका लेखांत हंजुमान अर्थात् मुसलमानांच्या अंजुमान या संस्थेचा निर्देश आलेला आहे ( Notes on political & cultural History of Konkan by M. G. Dixit, Bulletin of the Deccan College Research Institute, June 1943. ). अरब संख्येनें मोठे, प्रबळ व सुसंघटित होऊन गोंव्यापासून वसईपर्यंत कसे स्थायिक बनले होते याचें हें गमक नव्हे काय ?

## गोंव्याचे कदंब

गोंव्यांतील राज्यपद्धति इतर ठिकाणच्या राज्यपद्धतीहून फारशी वेगळी नव्हती. तेथील कदंबराजे राष्ट्रकूट, कल्याणकर चालुक्य व यादव यांचे मांडलिक असल्यामुळें त्यांजवर देखरेख ठेवण्याकरितां दण्डनायक किंवा सामन्ताधिपति या हुद्याचा अधिकारी सम्राटाकडून नेमलेला असे. त्याच्या मदतीस त्याच्या हाताखालीं पेरगडे, नाडगौंडा व नाडप्रभू हे अधिकारी देत. त्याशिवाय सम्राट एखाद्या वेळीं खास राजधानीहून महासामन्तास

तपासणी करण्यास पाठवी. दण्डनायक साम्राज्य-सरकारांकरितां जकातीचें उत्पन्न वसूल करून घेई. कदंबांना महामंडलेश्वर हा किताब होता. त्यांच्या सभेंत त्यांचे मांडलिक, प्रधान, उमराव व पुरोहित बसत. सभेंत पंडित तत्त्वज्ञानासारख्या विषयांवर वादविवाद करीत व त्यांत राजे स्वतः विद्वान् असले म्हणजे सामील होत, त्यामुळें वादास रंग चांगला चढे. राजापाशीं खाजगी काम पाहाण्यास मनेवरगडे म्हणजे खाजगी कारभारी, तंत्रपाल, तांबूलकरंकवाहक असत. मंत्री नीतिमान्, विद्वान्, न्याय व राजनीति यांत निपुण असावे लागत. योद्धा व मुत्सद्दी या उभयतांचे गुण त्यांच्या अंगीं वसत. राजाच्या खाजगी चिटणिसाला रहस्याधिकारी म्हणत. मुख्य न्याया-धीश म्हणजे धर्माध्यक्ष. त्याजपुढें खटले चालत. त्याहून महत्त्वाचे खटले राजा चालवी. दण्ड घेऊन आरोपीवरील वधाची शिक्षा रद्द करण्यांत येई. राज्यांत तालुक्यासारख्या लहान विभागावर (कंपन) मनेय नांवाचे अधिकारी नेमीत. राजे भार्या अनेक करीत. त्याशिवाय ते जिंकलेल्या शत्रूंच्या स्त्रियांनाहि अन्तःपुरांत घेत. राण्या अनेक असल्यामुळें त्या एकमेकींशीं चुरशीनें वागत.

राजा स्वतः युद्धास जात असे. त्याच्या हाताखालीं जगदळ म्हणजे सेनापति, दंडनायक व नायक असत. पायदळ, घोडदळ व हत्ती हीं सैन्याचीं तीन प्रमुख अंगें. त्यांशिवाय रथ हेंहि चौथें अंग कांहीं प्रमाणांत होतें. क्वचित् उंटहि आढळत. राजाच्या अनेक खेळांत हत्तीवर बसणें हा एक खेळ होता. घोडदळांत इकडील घोड्यांच्या भरतीस इराण, अरबस्तान व अफगाणिस्तान यांतील जातिवंत घोडेहि येत. तिकडील मुसलमान लोक घोडे विकावयास इकडे येत, त्यांना तुरुष्क असें सामान्य नांव असे. स्वार अंगांत चिलखत घालीत. कांहीं घोड्यांनाहि चिलखतें चढवीत. स्वाराचें चिलखत गुडघ्या-पर्यंत असून ते डोक्यावर शिरस्त्राण ठेवीत. स्वारापाशीं भाला, तलवार व ढाल हीं आयुधें असत. रथ दुचाकी किंवा चारचाकी करीत. त्यांत राजा

किंवा सेनापति बसे. दुचाकी रथ हलके व जलद धांवत. रथावर राजचिन्हांकित ध्वज फडके. रथीपाशीं धनुष्यबाण व तलवार चमके. पायदळ, हंगामी व कायम असें द्विविध ठेवीत. त्यांतील सैनिकाच्या अंगावर चिलखत व डोक्याला शिरस्त्राण असे. त्यांचें मुख्य शस्त्र तलवार, ती लांब असून ते ढाल गोल घेत. त्याशिवाय धनुष्यबाणहि ते बाळगीत.

कदंबांच्या सैन्यांत तीस सहस्रापर्यंत स्वार होते. वाद्यांत शंख, भेरी व शिंग. ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं योद्धे जिवावर उदार होऊन लढत. तशीच वेळ आल्यास ते मारीन किंवा मरेन अशा प्रतिज्ञेनें सेनापतीपासून विडा उचलून रणांगणावर तळपत. युद्धांत शौर्य गाजवून जे देह ठेवीत त्यांच्या स्मरणार्थ वीरगल तयार करून गांवांतील देवालयासारख्या प्रसिद्ध ठिकाणीं ठेवीत.

एका लांबट दगडाचे तीनचार विभाग पाडतात. खालच्या भागांत युद्धाच्या धुमश्चक्रींत प्रस्तुत वीर घुसून लढतां लढतां मरून पडला आहे, मधल्या भागांत त्यास देवदूत कैलासाला घेऊन जात आहेत व शेवटच्या भागांत कैलासांतील श्रीशंकराचें देवालय दाखवून त्यास कैलासवास घडला आहे असें दृश्य असतें. किंवा श्रीविष्णूचें देवालय दाखवून मृतास वैकुंठप्राप्ति झाल्याचें सूचित करण्यांत येतें. कांहीं वीरगलांवर पुढीलप्रमाणें मजकूरहि खोदलेला आढळतो. धारवाड जिल्ह्यांत हनगल येथें तारकेश्वरास जावयाच्या मार्गावर पुढील आशयाचा कानडींत लेख आहे—' रणांगणावर सर्वत्र लढून, रक्ताचा सडा घालून व सहाणींचा ( कुल ) पराक्रम व श्रेष्ठपद प्रत्ययास आणून सहाणादित्य पतन पावला व अशा रीतीनें स्वर्गीय अप्सरांशीं रममाण होण्यास गेला. ( कारण ) युद्धांत विजयश्रीनें माळ घातल्यास संपत्ति व ऐश्वर्य लाभतें आणि मरण आल्यास स्वर्गीय अप्सरा प्राप्त होतात. ...... मग रणांगणावर येणाऱ्या मृत्यूची कां फिकीर बाळगावी ? '

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्। जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ॥ या भगवद्गीतेंतील उक्तीची वरील उतारा वाचून कोणास आठवण होणार नाहीं ?

सैनिकांत निर्भयवृत्ति व ईर्षा उत्पन्न करण्याचे उपाय कोणते असत याची कल्पना वीरगलांतील मजकुरानें सहजच येते. ही निर्भयवृत्ति केवळ सैनिकांतच नसून एकंदर जनसमूहांत बाणलेली होती. आत्मरक्षणार्थ ब्राह्मणांसुद्धां सर्व जातींना शस्त्र वापरण्याची अत्यंत जरूरी असे. वेदाध्ययन करून अग्रहारांत राहाणाऱ्या ब्राह्मणांनींहि अग्रहाराच्या रक्षणार्थ शेजारच्या गावकऱ्यांशीं युद्ध केल्याचीं उदाहरणें कदंब राज्यांत घडलीं आहेत. पांडव विराटाच्या घरीं अज्ञातवासांत असतां त्यांचा छडा लावण्याकरितां कौरव विराटच्या गाई पळवून नेण्यास सैन्यानिशीं आल्याची कथा महाभारतांत आहे. त्या धर्तीवर एका गांवच्या लोकांनीं दुसऱ्या गांवच्या गाई चोरून नेण्याची चाल या काळापर्यंत आली होती. कदंबांचें राज्य व त्या शेजारचीं राज्यें डोंगराळ व जंगली मुलुखांत असल्यामुळें याप्रकारचे घाले तेव्हां वारंवार पडत आणि त्यांत दोन गांवांचें चांगलेंच युद्ध जुंपून माणसें जखमी होत व प्राणासहि मुकत, असें कित्येक वीरगलांवरील मजकुरांतून प्रत्ययास येतें. पुरुष लढाईत मरत त्याजप्रमाणें स्त्रियाहि सती जात. या योगानें पुरुष व स्त्रिया यांना मरणाची भीति वाटत नसल्यामुळें सर्व समाजांत निर्भयपणाचें वारें भरलें होतें. राजनिष्ठा हें तत्कालीन राजसत्तेचें खरें सामर्थ्य होतें. जपानांतील हाराकिरीसारखें आत्मयज्ञाचें व्रत इकडील लोकहि पाळीत. तैलराजा मेला, तेव्हां त्याचा तंत्रपाल तेपण्णा यानें स्वतःचें बलिदान केलें. बहुधा राजा मरतांच त्याजबरोबर मरण्याची शपथ त्यानें घेतली असावी. महामंडलेश्वर सोवीदेवरस याची राणी लछलादेवी निवर्तली तेव्हां तिच्या पदरच्या बोका मनाक नोकरानें पूर्वी शपथ वाहिल्याप्रमाणें स्वतःचे प्राण अर्पण केले. शांतिवर्मा राजास पुत्र व्हावा यासाठीं हव्ये येथील देवीस शिर वाहाण्याचा नवस एका इसमानें केला होता. त्याप्रमाणें राजास पुत्र झाला. तें समजतांच

तो इसम राजसेवकांच्या स्वाधीन झाला व त्याचा शिरच्छेद करण्यांत आला. सदर इसमाची उत्तरक्रिया योग्य रीतीनें पार पाडण्यासाठीं राजानें ब्राह्मणांना दक्षिणा दिली. कदंब बोप्परसराजा व त्याची राणी यांना पुत्र होण्यासाठीं एका गवळ्यानें स्वतःस सुळीं देण्याची प्रतिज्ञा केली व ती त्यानें शेवटास नेली. ही गोष्ट इ. स. ११२३ मध्यें घडली. कित्येक जैन प्रायोपवेशन करून प्राण देत. गंगराज मारसिंह दुसरा यानें तीन दिवस उपोषण करून मरण पत्करलें. नागरखंडची नालगौंडा जक्कीयावी हिनें दुखण्याला कंटाळून देहत्याग केला. कित्येक लोक जलसमधीहि घेत. या उदाहरणांवरून मृत्यूविषयीं समाजाला क्षिति कशी वाटत नव्हती हें लक्षांत येतें. वीरगळ हें जसें वीरांचें स्मारक तसें मस्तिकल हें सती गेलेल्या स्त्रियांचें स्मारक होय. मस्तिकल ही एक वीरगलाप्रमाणें शिला असून तिच्या खालच्या भागांत हात वर केलेलें स्त्रीचें चित्र खोदलेलें असतें व वरच्या भागांत शंकराचें देवालय म्हणजे कैलास दाखविलेला असतो. हीं स्मारकें कर्नाटक व महाराष्ट्र यांत सर्वत्र आढळतात. अशा प्रकारें मृत्यूस कवटाळणारे असंख्य स्त्रीपुरुष ज्या राष्ट्रांत होते त्या राष्ट्रांना शत्रूचें भय काय वाटणार ?

कदंबांच्या सैन्याप्रमाणें त्यांचें आरमारहि प्रबळ होतें. या नाविक बलाच्या सहाय्यानेंच त्यांनीं उत्तर शिलाहारांचा अनेकवार पाडाव केला. त्यांच्या राज्यांत अरब लोक व्यापारासाठीं येऊन राहिले. त्यांचा प्रवेश कदंबांच्या राज्यकारभारांतहि झाला असून पहिल्या जयकेशीनें सदानो ( Sadano ) अर्थात् सय्यद नामक अरबास कोंकण प्रांतावर आपला प्रधान नेमलें होतें. जयकेशीच्या दरबारांत त्याचें वजन इतकें वाढलें कीं तो सर्वाधिकारीच बनला. अशा स्थितींत नौकानयनांत जात्याच कुशल असलेल्या अरबांची भरती कदंबांच्या नाविकदलांत झाली नसली तरच आश्चर्य. जयकेशीचा बाप षष्ठदेव याच्या कारकिर्दींत कदंबांचें नाविकदल किती मोठें होतें याची कल्पना नरेंद्र गांवच्या

शिलालेखांतील पुढील उताऱ्यांत प्रतिबिंबित झाली आहे. "त्यानें (षष्ठदेव) कवडीद्वीप व इतर प्रदेश घेतल्यावर लंकेपर्यंत पोंचणारा नावांचा पूल बांधला व रानटी लोकांकडून खंडणी वसूल केली. कदंबराज्याची ही भरभराट पाहून रामराज्याची स्थापना करणारें हें धर्मराज्य आहे असें लोक म्हणूं लागले." यांतील अतिशयोक्तीचा भाग गाळला तरी कदंब-नाविकदल प्रबळ असल्याचें कबूल करावें लागतें.

कदंबांचीं नाणीं सोनें व चांदी या दोन धातूंचीं होतीं. त्यांजवर सिंह राजाचें नांव व शकवर्ष कोरलेलें आढळतें. त्यांनीं राज्याच्या बंदोबस्तासाटीं दुर्ग व गढ्या बांधल्या होत्या. दुर्ग उंच जागेवर, त्यांचे तट दगडी असत व दोन दगडांच्या मध्यें चुना भरीत नसत. तटाची रुंदी पायापाशीं १५ फूट व उंची ३५।४० फूट असे. कोंपऱ्या कोंपऱ्यावर बुरूज व भोंवतालीं खंदक खणीत. दुर्गांत विहिरी, तळीं व टांकीं खणून पाण्याची समृद्धि करीत. चालुक्यांची राजधानी कल्याण, राष्ट्रकूटांची राजधानी मालखेड व यादवांची राजधानी देवगिरी येथील दुर्ग काहींसे याच धर्तीवर बांधलेले आहेत.

---

# प्रकरण सतरावें

## सहा राजधान्या

### पैठण

पैठण ही शातवाहनांची राजधानी. तिला पश्चिम महाराष्ट्रांतून जाण्यास दोन मार्ग आहेत. एक अहमदनगराहून शेवगांवावरून व दुसरा मनमाडाहून औरंगाबादेवरून. औरंगाबादेपासून पैठण सोळा कोस आहे. मोटारीनें हा प्रवास अवघा दोन तासांचाहि नाहीं. मोटार सुटली व चालूं लागली तरच दोन तासांत पोंचावयाची. पण राज्य मुसलमानांचें असल्यामुळें तेथें नवीन सोयी सहसा व्हावयाच्या नाहींत व झाल्याच तर सोयींतून गैरसोयी उत्पन्न करण्यांत मुसलमानांचा हात कोणीहि धरूं शकावयाचा नाहीं. खरें पाहातां मोटारीचा धंदा अगदीं खाजगी व मी पैठणास गेलों त्यावर्षीं तो तसा होताहि. पण मोगलाईत या धंद्यांत एकटे मुसलमानच. याचें कारण काय तर मुसलमानांशिवाय हिंदूंसारख्यांना मोटारी भाडोत्री ठेवण्याचें धैर्यच होत नसे. मोटारींतून प्रवास करणारांत सामान्य शिपायापासून तों मोठ्या अधिकाऱ्यापर्यंत लोक असावयाचे. त्यांतील बहुतेकजण मुसलमान. अंमलदार मोटारींत बसण्यास आला म्हणजे बहुधा भाड्याऐवजीं जबरीच दाखविण्याच्या विचारांत. त्याला एकेरीवर येऊन नमविण्याची छाती हिंदूंना नाहीं. पण मोटरवाला मुसलमानच असला म्हणजे खरजेला सोटा छाप भेटल्याप्रमाणें दोघांची गांठ पडून काम बिनतक्रार चालतें. अशी स्थिति असल्यामुळें औरंगाबादेस पैठणाला जाण्याकारितां मला जी मोटार मिळाली ती मुसलमानाचीच होती. मोटार चार वाजतां खास सुटणार असें मोटारवाल्यानें सांगितलें व त्याच्या सांगण्यावर विश्वास न ठेवतांहि दुसऱ्या साधनाच्या अभावीं तीन वाजतांच मी तिच्यांत बसलों. ती चार वाजतां न सुटली, तरी पांच

वाजतां सुटेल इतकी मी मनाची तयारी करून ठेवली होती. तिच्यांत तेरा माणसें बसण्याची सोय होती तरी एकंदर रागरंग पाहून सतरा स्वाऱ्यांकडूनही स्वतःस चेंगरून घेण्यास मीं कबूल झालों. पण ही माझी दुहेरी तयारी अखेर अपुरीच ठरली. मोटार ५ वाजतांहि न सुटतां सहा वाजतां सुटली व मोटारींतील स्वाऱ्यांची भरती सत्रावरही न थांबतां विसावर गेली, आणि एकदाचें आमचें लटांबर औरंगाबादेच्या बाहेर पडलें. जुलुमाविरुद्ध ओरड करण्याची मोगलाईतील हिंदूंना संवय नसल्यामुळें मोटारवाल्याला अलाह हजरतच्या जागीं समजून ते स्वतःची कंबख्ती निमुटपणें सोशीत होते. पण मी ब्रिटिश हद्दींतला पडल्यामुळें माझी आरंभापासूनच ह्याविरुद्ध तक्रार होती. तिचा फायदा मला मिळाल्याशिवाय राहिला नाहीं. पैठण गोदावरीच्या तीरावर आहे. त्यामुळें औरंगाबादेहून पैठणाला जाणाऱ्या रस्त्याला क्वचित् ढाळ आहे. औरंगांबादेच्या आसपास दौलताबाद, वेरूळ, सातारा इत्यादि डोंगरांच्या रांगा आहेत. सातारा हें लहानसें खेडें औरंगाबादेहून ४।५ मैलांवर डोंगराच्या पायथ्यास डाव्या हाताला आहे. तेथील खंडोबा तिकडे प्रसिद्ध आहे. या साताऱ्यावरून शाहू महाराजांच्या सातारा राजधानीची व त्यापलीकडील पालीच्या खंडोबाची आठवण सहजच झाली.

औरंगाबादेहून पैठणापर्यंतचा मुलूख सपाट व सुपीक दिसला. कपास बाजरी, तूर, हळद, ऊस व तंबाखू यांचीं पिकें जिकडे तिकडे उगवलीं होतीं. मधून मधून पावसाच्या सरी त्याजवर उतरत, रानांतून घाईघाईनें परत यावयास निघालेलीं गुरें वासरें त्यांत झांकून जात व भिजून चिंब होत. रस्त्याच्या आजूबाजूनें लहान लहान खेडीं आहेत. तीं २।३ हजार वर्षांत कांहींही फरक न होतां जशींच्या तशींच राहिलीं आहेत. भोंवताली तट, चार अंगांना चार वेशी व मुख्य वेशीसमोर उघड्यावर गांवाबाहेर हनुमान असा प्रत्येक गांवाचा थाट. तट बऱ्याच ठिकाणीं पडलेला व वेशी कोठें झुकलेल्या. माणसांचीं घरें व गुरांचे गोठे जवळ जवळ सारखेच व माणसांची व गुरांची

स्थितीही सारखीच! शिक्षणाचा प्रसार नाहीं, जगाचें ज्ञान नाहीं, आधुनिक सुखाचीं साधनें नाहींत व विचारपूस करणारा सत्ताधीश नाहीं. यादवराज्य आलें, गेलें. ब्रह्मनीराज्य आलें, गेलें. पेशवाई झाली, बुडाली. तरी तेथील समाजांत सुधारणा अशी काहीं घडून आलीच नाहीं. तशांत अलीकडे राज्य मुसल्मानांचें. सारा धटिंगणांचा कारभार. त्यांना भिऊन वागावें, ईश्वरास भजावें, शेतांत खपून मिळेल तें खावें आणि मरेपर्यंत जगावें ही इकडील जनरहाटी.

आमची मोटार पैठणीं पोंचण्यास रात्रींचे आठ वाजले. पैठण ही शालिवाहनाची (शातवाहन) राजधानी, विद्वानांचें आगर, एकनाथांचें स्थान व पीतांबर-पागोट्यांची पेठ. रात्रींच्या अंधुक प्रकाशांत पैठणाची नीट कल्पना मला न आल्यामुळें त्याच्या पूर्वलौकिकास धरून मी सुंदर चित्र मनांत रंगवीत होतों. सकाळीं उजाडल्यावर गोदावरीवर जाऊं, तेथील घाटाची शोभा पाहूं, स्नानाकरितां लोटणाऱ्या जनसंमर्दांत घुसूं, नाथांचा वाडा व समाधी यांचें दर्शन घेऊं व हरिनामाचा गजर ऐकूं, ह्या मनोराज्यांत मी दंग होतों. भाद्रपद मासांतल्या रात्री ल्हानच, पण मला उत्सुकतेमुळें ती रात्र मोठी वाटली.

दुसरा दिवस उजाडला, पण तो कळावयास मला बराच वेळ लागला. मी उतरलों होतों तो एकजात चिरेबंदी वाडा होता. त्या वाड्यापेक्षां एकादें भुयार बरें. त्यांत वाऱ्याचा एक बिंदु शिरावयाचा नाहीं कीं सूर्याचा एक किरण फिरकावयाचा नाहीं. वाडा जुना व दिवस पावसाळ्याचे. या मराठवाड्यांत मावळासारखी बुरबूर लागत नाहीं. शीघ्रकोपी माणसाच्या रागाप्रमाणें तो एकदम येऊन पडून मोकळा होतो व आकाश निर्मळ करतो. मात्र एकाद्या वर्षी रापांचा मात्र नेम नसतो. राप लागली कीं रात्रंदिवस अनुधार पाऊस. तिकडील धाब्यांच्या घरांना असा पाऊस सहन होत नसल्यामुळें तीं अभिषेकपात्रासारखीं गळत असतात. घरावरची पावसाची

धार संपली तरी घराच्या फिलचांतून घरांत पाणी जेथें तेथें ठिपकत असतें व घरांतली जागा अंगणाहूनहि ओली होते. मी पैठणास आलों त्यापूर्वी एक-दोनच दिवस सुरू झालेली राप थांबली होती. तथापि घराचें अंतरंग ओलेंचिंब बनलें असल्यामुळें अंग थंडावून जात होतें. ऊन्हवाऱ्याशीं वांकडें धरणारीं हीं घरें पुढें आट आठ दिवस वाळत नाहींत. अशा घरांचा पहिला मजला म्हणजे विहिरीचा किंवा खंदकाचा तळ. त्यांतील हवा कुंद व रोगट. भर बारा वाजतां सूर्य डोक्यावर येऊन त्याला चौकांत डोकावून पाहावयास मिळालें तर त्या सूर्याचें सुदैव. दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यां-वरील लोकांना दिवस उगवल्याचा शोध सहाण्यांतून दुर्बिण लावली तरच लवकर लागावयाचा. अशा घरांत राहाणाऱ्या माणसांत उत्साह कसला, आरोग्य कोठलें व तेज तरी काय म्हणून दृष्टीस पडावें ?

सकाळीं मी रस्त्यांत आलों तेव्हां पैठणाकडे पाहून मला कसेंसेंच वाटूं लागलें. रस्ते अरुंद व फरसबंदी आणि त्यांच्या दोन्ही अंगांना उंच उंच हवेल्या, एक एक हवेली लाख लाख रुपये किंमतीची. हवेलीच्या दिवाण-खान्यांत लांकडाच्या तुकड्यावर नकशी इतकी उत्कृष्ट कीं पाव आण्याच्या तुकड्याला पांच रुपयेहि कमीच ठरावे. पण आतां तो पांच रुपये किंमतीचा नकशीदार तुकडा फुकट घेणारा देखील कोणी उरला नाहीं. सबंध आळयांच्या आळया अगदीं ओस. पन्नास माणसेंहि ज्या हवेलीला थोडीं दिसावीं त्या हवेलींतून नुसतें फिरावयाला एकहि मनुष्य राहिलेलें नाहीं. कांहीं हवेल्यांच्या दरवाजांना कुलुपेंसुद्धां नाहींत. त्यांचे दरवाजे आपोआप लागावे व वाऱ्यानें न उघडले तर गाढवां-डुकरांनीं उघडावे. ते उघडून आंत डोकावण्याची छाती रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या माणसांना दिवसा ढवळयाहि होत नाहीं. अशा हवेलींतून एकादा मनुष्य चुकून बाहेर आलाच तर तो मनुष्य आहे म्हणून त्याचें स्वागत किंवा अभिनंदन व्हावयाचें दूरच राहून त्याला पाहून दचकून धूम पळणारेच बहुधा सगळे. अशा आळयांच्या रस्त्यांत घटका-

घटका उभें राहिलें तरी दोन पायांचा सजीव प्राणी आढळावयाचा नाहीं व घटका भरल्यावरहि प्रथम पाण्याची माकण वाहणारा चार पायांचा बैल पुढें यावयाचा व मागाहून त्याला हांकणारा दोन पायांचा माणूस ( ! ) दृष्टीस पडावयाचा. वास्तविक मोगलाईतील बैलात आणि माणसांत पायांचाच काय तो फरक ! बाकी स्थितींत मात्र दोघेहि सारखेच.

अशा ओसाड गांवांत मशिदीवरून वाद्यें वाजवीत जाण्याचें हिंदुमुसलमानांत भांडण. जेथें माणसेंच नाहींत, तेथें भांडावयाचें कोणाशीं ? ज्या मशिदी म्हणून मला दाखविण्यांत आल्या त्या मशिदी आहेत असें सांगितल्यामुळेंच मला पटवून घेणें भाग पडलें. जी स्थिति मशिदींची तीच देवळांचीहि. पैठणांत देवळें काय थोडीं आहेत ? व तीं काय लहान आहेत ? त्या देवळांतील देवांइतकेहि त्यांच्या दर्शनार्थ येणारे भक्त पैठण क्षेत्रात नाहींत त्यांच्या दर्शनास यावयाचें म्हणजे त्यांच्या दीनवाण्या स्थितीबद्दल अश्रुसिंचन करवयाचें. पैठणांतील शिवदिन-केसरीचा मठ केवढा विस्तीर्ण आहे ! त्याला जितके खण आहेत तितकीं माणसें तरी तीनशें साठ दिवसांतून एका दिवशीं त्यांत एकत्र जमत असतील कीं नाहीं कोण जाणें ! देवळांप्रमाणें घाटांनाहि दैन्य आलें आहे. पैठणास गोदावरीचें पात्र फारच रुंद आहे. त्र्यंबकेश्वरीं गटारांतून नागझरीसारख्या वाहणाऱ्या गोदेनें शंभर कोसांवरील पैठणापाशीं आपलें नशीब काढलेलें पाहून तिजविषयीं धन्योद्गार काढावेसे वाटतात.

मात्र त्र्यंबकेश्वराचें बाल्यावस्थेंतील सौंदर्य पैठणास उरलेलें नाहीं. त्र्यंबकाचा ब्रह्मगिरी किती वृक्ष-वेलींनीं नटलेला आहे व त्यावरून खालीं कुंडांत गळणारे गोदेचे थेंब कसे मुक्तामालेप्रमाणें तेजस्वी दिसतात ! पैठणास गोदावरीची तऱ्हा काहीं वेगळीच आहे. तिनें आपले दोन्ही अंक झाडांनीं झांकलेले नाहींत. भाद्रपद मासाच्या पर्जन्यकाळींहि या कांठापासून त्या कांठापर्यंत पाण्याचा प्रचंड व लाल प्रवाह पसरला असून तो वहातांना भीति उत्पन्न

करीत होता. त्या प्रवाहावर आडवें झालेलें आकाश दृष्टीनें एकसारखा पाठ-लाग केला तरी कित्येक कोसपर्यंत संपत नव्हतें. ती नदी उन्मत्त स्थितींत वहात असल्यामुळें अक्राळविक्राळ दिसत होती व तिच्या कांठावर बांधलेल्या घांटांना तुच्छतेनें झिडकारून देत होती. पैठण क्षेत्र नदीच्या कांठानें एक मैल लांबीचें तरी वसलेलें आहे. एकनाथांची समाधी हें त्याचें एक टोंक व दुसरें मुसलमानांच्या दर्ग्याचें टोंक. या एक मैलाच्या टप्प्यांत अंतराअंतरावर बरेच घांट असून ते लाखों रुपये किंमतीचे आहेत. पण ते घांट माणसां-वांचून शून्य दिसतात.

या घांटांच्या कडेनें थबकत थबकत हिंडा किंवा पेठेंतून बारीक नजरेनें पाहात फिरा, जेथें तेथें मृत्यूनें मारलेली मगरमिठीच प्रत्ययाला येते. पण पैठण काय पूर्वी असलें क्षुद्र गांव होतें ? ज्यानीं तें पाहिलें नाहीं पण त्याचें नांव ऐकलें आहे त्यांच्या कानीं पैठण हें नांव पडतांच किती तरी सुंदर व पवित्र भावनांचे तरंग अन्तःकरणांत उठतात. पैठणचा एकनाथ कोणाला माहीत नाहीं ? ज्ञानेश्वरांनीं रेड्याच्या मुखानें वेद बोलवून तीं अक्षरें ज्या दगडावर पाडलीं तो दगड पैठणचे लोक अद्यापि यात्रेकरूंना भाविकपणानें दाखवितात. मुसल्मानांची असहिष्णुता व हिंदूंची सहनशीलता कोणत्या थराला पोंचली होती याचें प्रत्यंतर एकनाथाच्या कथेंतच काय, पण पैठणच्या विद्यमान मशिदींतहि दृष्टीस पडतें. येथें गोदातीरीं उंचवट्यावर बंदेनवाजाची मशीद आहे. त्या मशिदीस जाण्यास पायऱ्या असून प्रत्येक पायरीला हिंदू देवतांच्या छिन्नविच्छिन्न मूर्तींचे दगड बसविले आहेत. ते दगड पायाखालीं घालावे तेव्हांच मशिदीचा मार्ग चालावा. या मूर्ती शेंकडों वर्षें हिंदूहि मुसल-मानाबरोबर तुडवीत आले असून त्याबद्दल त्याच्या मनाला खंती वाटत नाहीं. खरोखर त्या मूर्ती तुडविल्या जात नसून जिवंत हिंदूच परकीयांच्या पायांखालीं तुडविले जात आहे.

पैठणास हिंदू मनाला आराम देणारें स्थळ म्हणजे नाथांची समाधि. ही समाधि गांवापासून बाहेर गोदातीरीं आहे. तिची व्यवस्था समाधानकारक

असून नाथषष्ठीस सहस्रावधि भगवद्भक्त पैठणास त्या समाधीच्या दर्शनास लोटतात. पण खरें म्हटलें तर पैठण ही शातवाहनांची राजधानी. त्या राजधानीच्या खुणा आख्यायिकांच्या रूपानेंच काय त्या पैठणास शिल्लक आहेत. एका आवारांत शातवाहनकालीन एक विहीर काय ती दाखवितात. निजाम सरकारानें कांहीं उत्खननहि करून पाहिलें. तेव्हां सोळा फुटांखालीं इमारतींचे अवशेष आढळले. त्याशिवाय स्वास्तिक व बोधिवृक्ष या चिन्हांनीं युक्त अशीं आन्ध्र नाणींहि मिळालीं. शातवाहनांच्या पैठणाशीं सध्यांच्या पैठणाचा संबंध जोडणारा हाच एक धागा !

## बदामी

हुबळीहून एम्. एस्. एम्. रेल्वेचा जो फांटा जी. आय्. पी. रेल्वेस मिळण्यास विजापूराहून हुटगीकडे जातो, त्यावर बदामीचें विरामस्थान आहे. तेथून बदामी गांव तीन मैल दूर आहे. गाव तालुक्याचा असून त्याला जाण्यास पक्की सडक आहे. तो डोंगराच्या पायथ्याशीं वसला असल्यामुळें त्याचा डोंगराकडील भाग चढणीला आहे. डोंगर हेंच बदामीचें खरें आश्रयस्थान व भूषण आहे. तसेंच त्यावर गांवाचें जीवनहि अवलंबून आहे. कारण याच डोंगरावर बदामीचे इतिहास-प्रसिद्ध शैलदुर्ग व लेणीं आहेत आणि त्यानें बनविलेल्या वर्तुळांत विस्तीर्ण तडाग आहे. गांव डोंगराच्या एका अंगास व तडाग दुसऱ्या अंगास असला तरी ग्रामस्थ त्याचेंच पाणी धुण्याला व वरखर्चाला वापरतात. राजधानी वा मोठें नगर वसविण्यास डोंगर व जलाशय या दोन सोयी पूर्वकालीं मुद्दाम लक्षांत घ्याव्या लागत. कारण त्यांपैकीं डोंगरानें किल्ला बांधणें सोपें जाई व किल्ल्यावर तर राजधानीच्या व राज्याच्या रक्षणाची भिस्त. जलाशयासाठीं नदी असल्यास उत्तमच; पण ती नसेल तर तडाग बांधून तिची उणीव भरून काढण्यांत येई. बदामी या दोन्ही दृष्टींनीं राजधानी बनविण्यास उत्कृष्ट स्थळ आहे यांत शंका नाहीं.

चालुक्यांनीं ती आपली राजधानी करण्यापूर्वी सहाव्या शतकांत पल्लवांचें तें उत्तरेकडील एक मजबूत ठाणें होतें.

इतर अनेक जुन्या राजधान्यांप्रमाणें बदामीनेंहि गेल्या दीड सहस्र वर्षांत अनेक राजवटी पाहिल्या आहेत. पल्लवांपासून पहिल्या पुल्केशीनें इ. स. ५५७ च्या सुमारास बदामी घेतल्यानंतर ती त्यांची पुढें दोनशें वर्षेंपर्यंत राजधानी राहिली. कल्याणचा चालुक्यराजा जगदेकमल्ल यानें बाराव्या शतकांत येथील योगेश्वरास देणगी दिली. त्यावरून त्याचें लक्ष बदामीवर होतें असें दिसतें. त्यानंतर बदामीचें नांव लोपलें, तें मुसलमानांच्या काळापर्यंत. पुढें इ. स. १३३९ त विजयनगरचा राजा हरिहर पहिला यानें ती दोन सहस्र महाजनांना दिल्याचा उल्लेख आढळतो. विजयनगराच्या ताब्यांत दोनशें वर्षें राहिल्यानंतर तिचा कबजा विजापूरचा बादशहा इस्माइल अदिलशहा याजकडे गेला. विजापूरची बादशाही बुडाल्यावर सावनूरच्या नबाबानें तिचा उपभोग घेतला व इ. स. १७४६ मध्यें सदाशिवराव भाऊ पेशव्यानें नबाबाशीं तह करून तिचें स्वामित्व मराठ्यांना मिळवून दिलें. इ. स. १७७८ मध्यें हैदर अल्लीनें बदामी बळकावली म्हणून नाना फडणविसानें तिला चार आठवडेपर्यंत संस्मरणीय वेढा घालून मराठ्यांच्या ताब्यांत ती सन १७८६ मध्यें आणिली. पेशव्यांच्या वतीनें रास्ते तिची व्यवस्था पाहात असत. पण इ. स. १८१० मध्यें दुसऱ्या बाजीरावानें ती रास्त्यांपासून काढली व अखेर इ. स. १८१८ मध्यें पेशवाईचें उदक इंग्रजांच्या हातावर त्यानें सोडलें त्याबरोबर बदामीहि गेली.

विजापूर जिल्हा मुंबई इलाख्यांत सामान्यतः निर्जल व उजाड समजला जातो. त्यांत बदामीसारखीं निसर्गसुंदर स्थळें फारच थोडीं. सौंदर्याच्या दृष्टीनें बदामी ही पश्चिम महाराष्ट्रांत सह्याद्रीच्या लगत्यास असलेल्या सातारा, वाई, भोर या स्थळांशीं स्पर्धा करणारी आहे. लाल मातीमुळें तिला

बेळगांवासारखा नाजूकपणा आला आहे. इतर नगरांना एखादा दुर्गहि असण्याची पंचाईत, पण बदामीला एक सोडून दोन दुर्ग असून ते दोन्ही एकमेकांपासून अवघे तीनशें यार्डांचे अंतरावर आहेत. पैकीं उत्तरेकडील दुर्गाला बावन बन्देकोट व दक्षिणेकडील दुर्गाला रणमंडल असें नांव आहे. हे दुर्ग सांप्रत नादुरुस्त स्थितींत असून त्यांपैकीं उत्तर दुर्गावर पाण्याचे चार हौद होते. दाक्षिण दुर्गाला दोन चिलखतें होतीं. त्यावर पाण्याकरितां फक्त एकच हौद होता.

बदामीचीं प्रसिद्ध लेणीं दक्षिण दुर्गाच्या डोंगरांत आहेत. बदामींतील चालुक्यकालीन शिल्प काय तें लेण्यांमधीलच. एकंदर लेणीं चार व पश्चिमाभिमुखी आहेत. पैकीं तीन लेणीं हिंदूंचीं व एक लेणें जैनांचें. हिंदूंच्या तीन लेण्यांतहि एक शिवाचें व दोन विष्णूचीं आहेत. शिव-लेण्यांत शिवाचीं शिवलिंग, तांडवनृत्य करणारा शिव व अर्धनारी-नटेश्वर शिव अशीं वेगळालीं रूपें आहेत. त्याशिवाय पार्वती, गणपति, स्कंद व नंदी या शिवपंचायतनांतील मूर्ती आणि शृंगी, भृंगी, गोमुखी व घोडमुखी इत्यादि गण आहेत. तांडवनृत्य करणारा शिव पांच फूट उंचीचा व आठरा हातांचा आहे. पार्वतीचा बुचडा मद्रासेकडील खालच्या जातीच्या स्त्रिया आजहि बांधतात तसला आहे.

डोंगर जसजसा चढून जावा तसतशीं हीं लेणीं प्रत्येक टप्प्यावर भेटतात. शिवलेण्यानंतरचें दुसरें लेणें विष्णूचें आहे. त्याचें तोंड उत्तरेकडे असून त्यांतील पडवीच्या उजव्या टोंकाला वराह अवतार व डाव्या टोंकाला वामन-अवतार आहे. पडवीच्या आंत सभामंडप ३३ फूट ४ इंच लांब, २३ फूट ७ इंच रुंद व ११ फूट ४ इंच उंच आहे. त्याला आठ चौकोनी खांबांच्या दोन रांगा आहेत. खांबांना वरच्या अंगास हत्ती, सिंह व मनुष्यें यांच्या मूर्ती कोरल्या आहेत. एकंदरींत या लेण्याची गणना चांगल्या शिल्पांत करण्यासारखी आहे.

दुसऱ्या लेण्यापेक्षां तिसरें लेणें पुष्कळच सरस असून तें हिंदुस्थानांतील उत्कृष्ट लेण्यांपैकीं एक समजलें जातें. हें लेणें पहिल्या पुलकेशीचा दुसरा पुत्र मंगलीश यानें निर्मिलें. सर्व लेण्यांत तें मोठेंहि आहे. त्याच्या पडवीची लांबी ७० फूट व उंची १५ फूट आहे. पडवीच्या पूर्वेस टोंकाला चतुर्भुज विष्णु शेषावर बसला आहे, त्याचा डावा हात गाईवर व उजव्या हाताशीं गरुड आहे. गरुडासमोर लक्ष्मी आहे. पडवीच्या पश्चिम बाजूला वामन असून त्याला विराट रूप म्हणतात. तो अष्टभुज आहे व त्याच्या समोर बळी, बळीची पत्नी व गुरु शुक्राचार्य आहेत. पडवीशिवाय मुख्य देऊळ बारा फूट रुंद व १५ फूट उंच आहे. या लेण्यांतील आणखी एक मोठी मूर्ती हरिहराची. त्याचें एक अंग विष्णूचें व दुसरें शिवाचें दाखविलें आहे. या लेण्यांतील खांब, छत व भिंती यांवरील चित्रें व शिल्प, कलाकुसरीचें व उत्कृष्ट आहे. तिसऱ्या लेण्यापलीकडील चौथें लेणें जैनांचें आहे. लेण्याच्या गाभाऱ्यांत महावीराची मूर्ती सिंहासनावर बसली आहे. खांबावर तीर्थंकरांच्या अनेक मूर्ती आहेत. येथील एका मूर्तीच्या डोक्यावर नागांनीं फण्या धरल्या आहेत. हें लेणें इ. स. ६५० च्या सुमारास खोदलें गेलें असावें. महाराष्ट्रांतील लेणीं व बदामीचीं लेणीं यांत फरक हा आहे कीं, महाराष्ट्रांतील लेणीं काळ्या कातळाचीं आहेत आणि बदामीचीं लेणीं तांबूस व पांढुरक्या गारेच्या दगडाचीं आहेत.

बदामी गांव कांहीं वर्षें मुसलमानांच्या ताब्यांत गेल्यामुळें मुसलमानांकित कित्येक गांवांप्रमाणें येथेंहि त्यांनीं हिंदू देवळांच्या विध्वंसानें आपलें धर्मवेड प्रकटविलें आहे. लेण्यांतून खालीं उतरलें कीं मुसलमानांचा दर्गा दृष्टीस पडतो. त्याच्या बांधकामाला पाडलेल्या देवळाचे दगड बसविलेले आहेत. मुसलमानांच्या गांवावरील उदासीनतेची कळा बदामीवर पसरलेली असली तरी जवळच्या तळ्यानें गांवाला कांहींशी शोभा आणिली आहे यांत शंका नाहीं. हें तळें चोहोंकडून वृक्षांनीं व डोंगरांनीं वेढलें असल्यामुळें तळ्यानें

डोंगरांना सौन्दर्य दिलें आहे व डोंगराचें सौन्दर्य तळयावर उतरलें आहे. तळयाचा प्रदेश जुनाट देवळांनीं व शिलालेखांनीं गजबजला आहे. हे शिलालेख चालुक्य-काळापासून अर्वाचीन काळापर्यंतचे आहेत. तळयाच्या उत्तरतीरावर तेगिन्ना इराप्पाचें देऊळ असून त्यांतील लेख सहाव्या शतकांतला आहे. सदर लेखांत बदामीचें नांव वातापी असें दिलें आहे. तळयाच्या धक्क्यावरून मध्यभागीं असलेलें मूळ योगेश्वराचें देऊळ आतां यल्लमाचें झालें आहे. त्यांतील लेख चालुक्य राजा जगदेकमल्लाच्या वेळचा, म्हणजे बाराव्या शतकांतला आहे. या बंधाऱ्याच्या तळाशीं काळया पाषाणावर दहाव्या शतकांतील कानडी लेख असून त्यावर ब्रह्मा, विष्णु, महेश यांच्या मूर्ती खोदल्या आहेत. खुद्द बदामी गांवात काळा मठ नांवाचें देऊळ आहे. वरील लेख संस्कृत प्राकृत-मिश्रित व विजयादित्य चालुक्याच्या वेळचा ( शक ६२१ ) आहे व त्यांत ब्रह्मा, विष्णु, महेश या मूर्तींच्या स्थापनेचा व ह्यास दिलेल्या देणगीचा उल्लेख आहे. उत्तरेकडील दुर्गांतही कित्येक लेख आहेत. पैकीं एक विजयनगरचा राजा पहिला हरिहर याचा ( इ. स. १३३९ – शक १२६१ ) व दुसरा सदाशिवदेवराय कालीन नायकाचा ( इ. स. १५४२–१५७३ ) आहे.

बदामीचें तळें सोडल्यावर बदामीजवळच्या दोन रमणीय स्थळांचा निर्देश केल्यावांचून बदामीचें वर्णन पुरें होणार नाहीं. बदामीपासून अर्धा मैल डोंगर चालून गेल्यावर महाकूट नामक पवित्र तीर्थ आहे. तेथें दोन गुहा आहेत व खडकावर खोदलेल्या विष्णु आदिकरून देवतांच्या तीस-चाळीस मूर्ती आहेत. एक कुंड असून त्यांत झऱ्याचें पाणी येऊन पडतें. मूर्तींच्या रांगेपलीकडील संस्कृत शिलालेखांत कोल्हापूरची महालक्ष्मी येथें आल्याचें नमूद केलें आहे. हा लेख सोळाव्या-सतराव्या शतकांतील असावा.

दुसरें स्थळ बनशंकरी. हें गांवापासून दोन मैलांवर आहे. बनशंकरीच्या एकांत व प्रशांत देवळाच्या पिछाडीकडून एक ओढा वाहात असून त्यास

धरण बांधल्यामुळें त्यांतील पाणी पोहोण्याजोगें विपुल झालें आहे व त्याच्या दोन्ही कांठांना मनोहर व गडद वृक्षराजी आहे. त्याशिवाय देवळासमोर मोठा तडाग आहे व त्यावर चारी बाजूंनी शेंकडों खणी एकेरी दगडी सोपे आहेत. येथें जेव्हां यात्रा भरते तेव्हां यात्रिकरूंना उतरण्याची ही सोय करण्यात आली आहे. यात्रा नसतांनाहि देवीच्या दर्शनास येणारे भक्तजन ओढ्यांत स्वेच्छेनें जलविहार करतात व देवळांत स्वयंपाक करून व बन-शंकरीस नैवेद्य दाखवून वनभोजनाचें सौख्य लुटतात.

## मालखेड

राष्ट्रकूटांना सम्राट्पद मिळण्यापूर्वीपासून त्यांचीं अनेक घराणीं महाराष्ट्रांत वावरत होतीं. राष्ट्रकूट घराण्याचा मुख्य संस्थापक दन्तिदुर्ग याचा निकट संबंध कर्नाटकापेक्षां महाराष्ट्राशींच प्रथम आला. त्याचे पूर्वजहि महाराष्ट्रांत सत्ताधीश होते. त्यांचें वास्तव्य लातूर, एलिचपूर या ठिकाणीं तर होतेंच, पण त्याशिवाय नाशिक व वेरूळ यांच्या आसपासहि झालें असलें पाहिजे. नाशिक जिल्ह्यांतील मयूरखिंडी या दुर्गात तिसऱ्या गोविंद राष्ट्रकूटाचा मुक्काम बरेच दिवस होता. कझिन्स याच्या मतें दंतिदुर्गाच्या काळांत राष्ट्रकूट वेरूळच्या जवळ राहात असावे. यावरून अधिकार व परिस्थिति जशी हिंडवितील तशी त्यांची वस्ती बदलत गेली; तथापि ही सगळी अदलाबदल महाराष्ट्राच्या टापूंतच बव्हंशानें होत गेली. याचा अर्थ असा कीं बदामीच्या चालुक्यांशीं युद्धप्रसंग येण्यापूर्वी राष्ट्रकूट हे महाराष्ट्राचे कायमचे रहिवासी झाले होते.

दन्तिदुर्गानें प्रथम गुजराथ, माळवा, मध्य-हिंदुस्थान व उत्तर-महाराष्ट्र हे प्रदेश जिंकले व शेवटीं त्याचा युद्धप्रसंग बदामीचा चालुक्य राजा दुसरा कीर्तिवर्मा याजबरोबर घडला. तरी पण त्याचा पूर्ण मोड दन्तिदुर्गास करतां आला नाहीं. तें कार्य त्याच्या पश्चात् त्याचा चुलता कृष्णराज यानें पुरें केलें. अर्थात् कृष्णराजाच्या कारकीर्दीपर्यंत राष्ट्रकूटांची राजधानी बदामी नव्हती व मालखेड म्हणजे मान्यखेट सुद्धां नव्हती. मान्यखेटाचा उल्लेख तिसऱ्या

गोविंदाच्या कारकिर्दीत आढळतो. तिसऱ्या गोविंदापूर्वी दन्तिदुर्ग, पहिला कृष्ण, दुसरा गोविंद, ध्रुव राजा धारावर्ष हे सम्राट् होऊन गेले. तिसरा गोविंद इ. स. ७९३ मध्यें गादीवर बसला, म्हणजे त्याच्या पूर्वी राष्ट्रकूट सम्राटांनीं सुमारें ६० वर्षें राज्य केलें. त्या काळांत त्याचा साम्राज्य-विस्तार उत्तरेस कनोज, पूर्वेस बंगाल, व दक्षिणेस रामेश्वर व सिंहलद्वीप येथपर्यंत झाला होता. गोविंदानें गंगवाडी, केरल, पाण्ड्य व चोल येथील राजांचा पराभव केलेला ऐकून भयभीत झालेल्या सिंहलद्वीपाच्या राजानें शरणागतीचें चिन्ह म्हणून आपला व आपल्या प्रधानाचा पुतळा गोविंदाकडे पाठविला. हे दोनहि पुतळे गोविंदानें मान्यखेटास शंकराच्या देवालयापुढें उभे केले. यावरून मान्यखेटास प्रथम राजधानीचा मान त्यानें दिला असें वाटतें.

गोविंद इ. स. ८१३ मध्यें मरण पावल्यावर त्याचा पुत्र अमोघवर्ष सम्राट्-पदीं चढला; त्या वेळीं तो सहा वर्षांचा अर्भक होता. त्यानेंच मान्यखेट नांवा-रूपास आणिलें. अमोघवर्षानें त्याची तटबंदी पुरी केली. तो संस्कृत व कानडी या दोन्ही भाषांत निपुण होता. त्यानें प्रश्नोत्तररत्नमालिका व कविराज-मार्ग हे दोन संस्कृत ग्रंथ रचले. त्याजवर दिगंबर जैन पंथांतील साधूंची छाप असल्यामुळें राज्यकारभार मधून मधून आपल्या प्रधानावर सोंपवून तो गुरु-पाशीं अध्यात्मचिंतन करीत बसे. त्याच्या उत्तेजनामुळें जैनांच्या तत्त्वज्ञानपर वाङ्मयांत बरीच भर पडली. अमोघवर्ष वयाच्या ८० व्या वर्षी मरण पावला. त्याचा पुत्र दुसरा कृष्ण सन ८८० मध्यें गादीवर बसला. कृष्ण हाहि बापा-प्रमाणेंच जैन गुरूंच्या भजनीं होता. त्याच्या गुरूचें नांव गुणभद्र; यानें आदिपुराणाचे शेवटचे पांच खंड लिहिले आहेत. कृष्णाच्या कारकीर्दीत जैन मंदिरें बांधण्यांत आलीं. कृष्णाचा पुत्र तिसरा इन्द्र इ.स. ९१४ मध्यें अभि-षिक्त झाला. त्याचा सेनापति श्रीविजय हाहि जैन होता. राष्ट्रकूटांपैकीं चौथा अमोघवर्ष इ. स. ९६८ मध्यें सम्राट्पदावर आला. त्याच्या कारकिर्दीत

राष्ट्रकूट राज्यास उतरती कळा लागली. माळव्याचा परमार राजा हर्ष यानें मान्यखेट घेतलें व त्याच्या सैन्यानें त्यास आगी लावून लुटलें. त्यानंतर मान्यखेटांत दुष्काळ पडला. हर्षाची महत्त्वाकांक्षा राष्ट्रकूटांचें सिंहासन बळकावण्याचीच होती. पण त्याचा तो बेत गंगांचा शूर राजा दुसरा मारसिंह हा अमोघवर्षाच्या मदतीस आल्यामुळें फसला. पण पुढें अमोघवर्षामागून कर्क गादीवर आल्यानंतर त्याचा सांमत तैलप चालुक्य यानें यादवांच्या मदतीनें बंड उभारून सन ९७३ मध्यें कर्काला ठार मारलें, मान्यखेट लुटलें व राष्ट्रकूट साम्राज्य धुळीस मिळविलें.

राष्ट्रकूट राजा तिसरा कृष्ण हा राष्ट्रकूट वंशांतील शेवटचा पराक्रमी सम्राट्. त्यानें इ. स. ९३९ ते ९६८ पर्यंत राज्य केलें. त्याच्या, म्हणजे राष्ट्रकूटांच्या अखेरच्या काळांत पुष्पदन्त नामक एक मोठा कवि होऊन गेला. तो मूळचा शैव ब्राह्मण, पण मागाहून त्यानें दिगंबर जैन पंथ स्वीकारला. त्याला कृष्णराजाचा प्रधान भरत यानें आश्रय दिला. त्यानें भरताच्या सांगण्यावरून जैनपंथांपैकीं महापुराण हा प्रचंड ग्रंथ लिहिला. भरताच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र नन्न यास प्रधानपद मिळालें. त्याच्या आग्रहावरून पुष्पदन्तानें यशोधरचरित व नागकुमारचरित हीं दोन पुस्तकें लिहिलीं. कृष्णराजामागून अमोघवर्षाची कारकीर्द व त्या कारकिर्दीत मान्यखेटाची झालेली धूळधाण पाहून तो महापुराणांत म्हणतो,

दीनानाथधनं सदा बहुजनं प्रोत्फुल्लवल्लीवनम् ।
मान्याखेटपुरं पुरन्दरपुरीलीलाहरं सुंदरम् ॥
धारानाथनरेंद्रकोपाशिखिना दग्धं विदग्धप्रियम् ।
क्वेदानीं वसतिं करिष्यति पुनः श्रीपुष्पदन्तः कविः ॥

वरील श्लोकांत मान्यखेटाची वस्ती मोठी होती, तें विद्वानांना आवडणारें, लता-वृक्षांनीं वेढलेलें, इन्द्राच्या राजधानीस लाजविणारें व सुंदर असल्याचें पुष्पदन्त सांगतो.

आतां सध्यांचें मान्यखेट–मालखेड कसें आहे तें पाहूं. मान्यखेटास त्या भागांतील लोक मलखेड म्हणतात. वाडी जंक्शनपासून हैदराबादेकडे जाणाऱ्या लोहमार्गावर मालखेड हें तिसरें स्टेशन आहे. या स्टेशनावर एक जाणारी व एक येणारी गाडी थांबते. जाणाऱ्या गाडीची वेळ सोयीची नसून ती रात्रीं ३ वाजतां वाडी स्टेशनाहून निघते व ४ वाजतां मालखेडास पोंचते. इतक्या अपरात्रीं येणारी गाडी निदान स्टेशनाच्या धक्क्याला लागावी; पण ती धक्क्यापाशीं न येतां पलीकडच्या रुळांवर थांबत असल्यामुळें, गाडींतून खालीं उतरताना प्रवाश्याला जमिनीवर उडीच टाकावी लागते म्हटलें तरी चालेल ! तशांत प्रवाश्याबरोबर सामान असल्यास त्याच्या हालांना पारावारच नाहीं. सामान त्याचें त्यानेंच स्टेशनाच्या विरामालयांत वाहून न्यावें. हिंवाळ्यांत या हालांना थंडीची आणखी भर. दिवस उगवेपर्यंत दोन-अडीच घन्टे कुडकुडत काढल्यावर वाहनांचा विचार सुचावयाचा. स्टेशनावर आयतें वाहन मुळींच नसतें. आपणच आजूबाजूच्या वस्तींत हिंडून एकादी बैलगाडी हुडकून काढावी तेव्हां मिळाली तर मिळावयाची. बैलगाडीनें मालखेड दोन कोस आहे. तेथें जाण्यास रानांतला गाडीरस्ता आहे, पक्की सडक नाहीं. बैलगाडीचा मंद प्रवास आतां दुर्लभ झाल्यामुळें सकाळच्या थंड वेळांत पांघरुणानें अंग गुरगुटून घेऊन दोन्ही बाजूंचीं हिरवींगार शेतें उगवत्या सूर्यनारायणाच्या प्रकाशांत पाहात जाणें आल्हादप्रद होतें. भूमि इतकी सुपीक आहे कीं, तिच्यांत उत्तम पीक येण्यास थोडाच पाऊस हवा असतो. म्हणून अवर्षणामुळें दुष्काळ पडण्याची चिंता कृषीवलांना नाहीं म्हटलें तरी चालेल. पश्चिम महाराष्ट्रांत पाणस्थळ जमिनींतच मिरचीचें पीक येतें. पण इकडची भूमि नुसत्या पावसावर हें पीक देते. ज्वारीचें पीक मुख्य, त्याशिवाय तंबाखू, हरभरा, जवस इत्यादि पिकें मिळतात. स्टेशनापासून मालखेडापर्यंतचा भूभाग या नाहीं त्या पिकानें, मी गेलों त्या वेळीं ( हिंवाळ्यांत ), व्यापलेला होता. कल्याणाशीं ( मोगलाईतल्या ) तुलना करतां ही जमीन पिकाऊ यांत शंका नाहीं.

शहाबादी फरश्या त्यांचा मऊपणा, ठिसूळपणा व अखंडपण या गुणांनीं महाराष्ट्रभर प्रसिद्धी पावल्या आहेत. महाराष्ट्रांतील पुरां-नगरांत आतां असें एकहि चांगलें घर दृष्टीस पडणार नाहीं कीं, ज्यांतील भुई शहाबादी फरश्यांनीं सुशोभित व सुखदायक केली नाहीं. शहाबाद माल्खेडापासून अवघ्या पाच सात कोसांवर असल्यामुळें त्या जातीच्या शिळांशिवाय दुसऱ्या शिळा माल्खेडाच्या शिवारांत मुळींच दृष्टीस पडत नाहींत. माल्खेडास जातांना या शिळांची लयलूट पाहून आश्चर्य वाटतें. त्या प्रकारच्या शिळांचा कोणत्या कामाकडे उपयोग करावयाचा यासंबंधी तेथील रहिवाश्यांचा विवेक सुटल्या-सारखा भासला. घरावरील आच्छादन वा कडीपाट याच शिळांचा, घरांना कुसवाच्या भिंती याच शिळांच्या, शेतांना कुंपणें याच शिळांचीं व सबंध घरच्या घर केवळ याच शिळांचें बनविलेलें. लंकेंत न्हाव्याला हजामतीबद्दल द्यावयाचें नाणें म्हणजे सोन्याच्या विटा व पायखान्यास लावावयासहि सोन्याच्याच विटा ! खुद्द माल्खेडापाशीं गेल्यावरहि तेथील ओढ्यांतील खडक पाहावे तों शहाबादी दगडांचेच. जसे नदीला घांट बांधून काढावे, तसे या ओढ्यांचें सबंध पात्रच्या पात्र निसर्गानें अखंड शहाबादी शिळांचें घडविलेलें. जणू काय एखाद्या आधुनिक कारखान्यात तें ओतूनच काढलेलें आहे. ओढा ओलांडून पलीकडच्या मैदानावर चढलें, तरी स्टेशनावरील सीमेंट–कांक्रिटच्या प्लॅटफार्मप्रमाणें जिकडे तिकडे एकसंधि साफ व गुळगुळीत फरसबंदी. शहाबादी पाषाण शुभ्र व ठिसूळ असल्यामुळें त्याचें सीमेंटहि होतें. अशा पाषाणांच्या बांधलेल्या इमारती दुरून चुना फांसल्याप्रमाणें पांढऱ्या सफेत दिसतात.

माल्खेडांतील म्हणजे मलखेडांतील खेड हा शब्द अर्थपूर्ण आहे. त्याचा अर्थ मल्लांचें म्हणजे योद्धयांचें खेडें, असा असू शकेल व तो राष्ट्रकूटांसारख्या शूरांच्या राजधानीस शोभतोही. ज्यावेळीं ती राष्ट्रकूटांसारख्या बलाढ्य सम्राटांची राजधानी होती, तेव्हां अफाट नगराच्या वैभवास चढून त्यांतील खेड हा शब्द

विनयनिदर्शक वाटत होता. पण आतां मात्र तें अगदीं खेडेंच उरल्यानें मालखेड हें त्याचें नांव सार्थ झालें आहे. गांव कागना व वेण्णीतोरा या दोन नद्यांच्या संगमापाशीं वसलें आहे. गांवाप्रमाणेंच या दोन्ही नद्या लहान असल्या तरी त्यांतील निर्मल उदकानें त्या माननीय वाटतात. गांवापासून सुमारें अर्ध्या मैलावर नदीतीरीं जयतीर्थ व अक्षोभ्यतीर्थ या दोन वैष्णव स्वामींचीं वृंदावनें आहेत, व शेजारींच बहुधा राष्ट्रकूटकालीन अशी दगडी ओवऱ्यांची चौसोपी आहे. या स्थळास मठ म्हणतात. त्याची स्वच्छता हेवा करण्यासारखी आहे. वाळवंट इतकें निर्मळ कीं, त्यावरून माझ्यापूर्वीं कोणीहि माणूस फिरकला नसावा ! नदीचें उदक इतकें स्फटिकतुल्य कीं, त्याला माझ्यापूर्वीं कोणींहि स्पर्श केला नसावा. निःशब्द एकांत व तीरावरील तरुवर स्वयंसेवकांप्रमाणें त्याचें रक्षण करण्यास तत्पर. या मठांतच यदृच्छेनें देशपांडे उपनामक एक अनोळखी गृहस्थ भेटले; ते गुलबर्ग्याचे रहिवाशी. माझ्यापूर्वीं फक्त आठच दिवस मालखेडास आलेले. पण गृहस्थ भला खटपटी. त्याची मालखेडच्या मुसलमान जहागीरदाराशीं जानपछान. त्या छोट्या गांवाची त्याला माहिती केव्हांच झाली होती. ओळखीच्या माणसापेक्षांहि अधिक आगत्य करून मालखेडांतील प्रमुख स्थळें दाखविण्यास ते मजबरोबर आले.

मालखेडाभोंवतालचा तट अद्यापि बराचसा टिकून आहे. त्याला कित्येक वेशी असून एका वेशीचें नांव संगमी वेस, दुसरीचें शेडम वेस. नदीच्या संगमाकडे जिच्यांतून जावयाचें तिचें नांव संगमीवेस. मुख्य वेशींतून थेट दुर्गाकडे रस्ता जातो. हीच मालखेडाची बाजार पेठ. मुख्य वेस खूप उंच व भव्य आहे. पण तिच्या दरवाज्याच्या दोन फळ्यांपैकीं एक फळी काळाच्या भक्ष्यस्थानीं केव्हांच पडून दुसरी उभी फळी त्याचीच वाट पाहात आहे. ती झडत झडत इतकी रोड झाली आहे कीं, तिच्या त्या हिडिस सांगाड्याची भीतिच वाटते. वेशीच्याबाहेर भलें थोरलें मैदान असून त्याजमधील पारावर व

झाडाच्या सांवलीखालीं गुराख्यांचीं पेरें बसतात व गुरें स्वैरसंचार करतात. कल्याणाप्रमाणें दुर्ग गांवाच्या टोंकाला आहे. गांवच्या देशमुखाची गढी गांवकुसापाशीं आहे. गांवांत महाराष्ट्रांतल्याप्रमाणेंच देशमुख–देशपांडे या वतनदारांचीं घरें आहेत. दुर्ग राष्ट्रकूटकालीन दिसत असून त्याला एकांत एक चारपांच दरवाजे आहेत. बाहेरचा दरवाजा मुसल्मानांनीं बांधलेला आहे. दर दरवाजागणिक दुर्ग उंच होत गेला असून त्याच्या माथ्यावरून सबंध गांव व दूरचा प्रदेश नजरेसमोर येतो. हा दुर्ग शहाबादीसारख्या पाषाणांचा बांधला असल्यामुळें बाहेरून अगदीं ढांसळून गेला आहे. असल्या भयाण खिंडारांत मालखेडचा मुसलमान जहागीरदार राहातो. त्याजकडे गांवचा दिवाणी-फौजदारी अधिकार नसून तो केवळ काळीच्या उत्पन्नाचा धनी आहे; तरीहि त्याचा गांवाला दरारा फार आहे. गांव कल्याणापेक्षां लहान आहे. वस्ती दोन-तीन सहस्रांच्या आंतबाहेर असेल. एकंदरीनें तो ओसाड वाटला. त्याचा विस्तारहि बेताचा आहे. त्यात आडबाजूला अशीं दोन मंदिरें आहेत. तींच काय तीं गांवाच्या प्राचीनत्वाची व वैभवाची साक्ष देतात. एक मंदिर महादेवाचें आहे व दुसरें पार्श्वनाथ–महावीरादिकांचें आहे.

राष्ट्रकूटांपैकीं कांहीं सम्राट् शिवभक्त व जैन मतानुयायी असल्यानें हीं दोन मंदिरें मालखेडांत असावीं हें स्वाभाविक होय. महादेवाचें मंदिर लहान आहे. गाभाऱ्यांतील लिंगाकडे बारकाईनें पाहिल्यास पिंडी राष्ट्रकूटकालीन वाटते. पण त्या भोंवतालची शाळुंका मात्र मुसलमानांनीं फोडल्यावर मागाहून बांधलेली दिसते. नंदीहि शाळुंकेबरोबरच बसविलेला आहे. तो गाभाऱ्याबाहेरच्या मंडपांत न बसवितां गाभाऱ्यांतच स्थापलेला आहे. कारण गाभारा जितका बंदिस्त आहे तितका मंडप नाहीं. गाभाऱ्यांतील चार खांब प्राचीन व उत्कृष्ट नकशीचे आहेत. गाभाऱ्यांतून बाहेर येऊन सभोंवारच्या भिंतींकडे नजर टाकतांच एका भिंतींतून प्राचीन घोटीव व सुंदर पण भंगलेला नंदी डोकावूं लागतो. तो सामान्य दगडांत गणला

जाऊन भिंतींत गाडला गेला आहे. त्याला वाचा असती तर त्यानें राष्ट्रकूटांपासून इस्लामी काळापर्यंतची आपली दुःखद कहाणी सांगितली असती! देवळाच्या बाहेरच्या आवाराला दरवाजा वगैरे कांहीं नाहीं. तिसऱ्या गोविंदाकडे सिंहलद्वीपाच्या राजाकडून आलेले पुतळे याच आवारांत रोंवले असतील काय? या देवळाभोंवतीं मुसलमानांची वसति आहे.

रा. देशपांडे व त्यांनीं बरोबर घेतलेला जवान हे भराभर बोळ ओलांडीत होते. ते दोघे मला एका मोठ्या पण पडक्या वाड्यांत घेऊन गेले. वाडा अगदीं ओस होता. आंत चिटपांखरूंहि नव्हतें. वाड्यांतून बरेंच चालून गेल्यावर देशपांडे एका दरवाजापाशीं थांबले. त्यांनीं दरवाजाला बसविलेलें नळीचें कुलूप उघडलें व आंत पाहातों तों जैनमंदिर. मंदिरांत देव्हारा असून त्यांत पार्श्वनाथ, महावीर इत्यादिकांच्या लहानमोठ्या पण सुरेख मूर्ती आहेत. एक पाषाणाचा रथहि आहे. मंदिर प्राचीन राष्ट्रकूटकालीन आहे. मंदिराचा मालक मुसलमान जहागीरदाराशीं वांकडें येऊन त्याच्या भयानें मालखेड सोडून आळंद येथें गेला असल्याचें समजलें. पहिला अमोघवर्ष व दुसरा कृष्ण हे जैन मतानुयायी व जैन गुरूंच्या भजनीं होते. त्यांच्याच कारकिर्दीतील तर हें जैन मंदिर नसेल? व येथेंच ते केव्हां केव्हां गुरुसन्निध येऊन बसत नसतील?

मालखेड बरेंचसें कर्नाटकांत आहे. तेथील भाषा मुख्यतः कानडी आहे. पण मराठी बहुतेकांना समजतें. ब्राह्मणांतील प्रौढ पुरुषांना मराठी येतें, पण स्त्रियांना येत नसावें. एका दुकानांत मी कलदार देऊन हालीं नाणें घेण्यासाठीं थांबलों असतां तेथें दुकानचा जिन्नस नेण्यास आलेल्या ब्राह्मण बटूला मराठींतूनच नांव विचारतां त्याला माझा प्रश्न समजला नाहीं. तोच हिंदींतून विचारल्यावर त्यानें 'भीमसेन आचारी' असें चटकन् उत्तर दिलें. यावरून व इतर प्रमाणांवरून ब्राह्मणांची घरची बोली कानडी व ब्राह्मण लोक मध्वसांप्रदायी वैष्णव असल्याचें स्पष्ट झालें. राष्ट्रकूटांची मालखेड ही

राजधानी होती तेव्हां त्यांचें राज्य कर्नाटक व महाराष्ट्र या दोनहि प्रांतांवर अमल्यामुळें मालखेडांत तेव्हां दोनहि भाषा चालत असतील. धारवाड, म्हैसूर हीं नगरें ऐन कर्नाटकांत आहेत, तितकें मालखेड कर्नाटकांत नसून महाराष्ट्राच्या सीमेपासून जवळ आहे हें विसरतां कामा नये. पण स्वतः राष्ट्रकूटांची भाषा कोणती असेल? ते महाराष्ट्रांत कित्येक शतकें राहात होते त्यावेळीं त्यांची भाषा महाराष्ट्रीय व कर्नाटकांत राहावयास आल्यावर कानडी भाषेचा त्यांनीं क्रमशः स्वीकार केला असावा हेंच संभवनीय वाटतें.

## कल्याण

महाराष्ट्रांत कल्याण नांवाचीं दोन गांवें आहेत. ठाणें जिल्ह्यांतील जी. आय्. पी. रेल्वेचें प्रसिद्ध विरामस्थान कल्याण सर्वांना माहीत आहेच. त्याशिवाय मोगलाईंत दुसरें कल्याण आहे. त्याला तिकडील कित्येक लोक कल्याणीहि म्हणतात. ठाण्याजवळच्या कल्याण–भिवंडीहून त्याचें भिन्नत्व दर्शविण्याकरितां कल्याण–कुलबर्गा असेंहि त्यास संबोधण्याची वहिवाट आहे. या कल्याणाकडे कोणाचें एरवीं लक्षहि गेलें नसतें. परंतु महाराष्ट्राचे पूर्वकालीन सम्राट् चालुक्य यांची ती राजधानी असल्यामुळें इतिहासभक्तांना तें कितीहि अडचणीच्या जागीं असलें, तरी त्याची आराधना करावी लागते. महाराष्ट्रावर राज्य करणारीं दोन चालुक्य घराणीं झालीं. पैकीं पहिल्या चालुक्य घराण्याची राजधानी बदामी असून, त्या घराण्यानें इ. स. ५०० पासून ७५० पर्यंत म्हणजे सुमारें २५० वर्षें राज्याचा उपभोग घेतला. त्यांच्यानंतर राष्ट्रकूटांनीं इ. स. ९७३ पर्यंत सत्ता गाजविल्यावर पुनः चालुक्य हेच महाराष्ट्राचे सम्राट झाले. आतां हे चालुक्य बदामीच्या चालुक्यांचे वंशजच कीं काय याविषयीं ठाम निर्णय देववत नाहीं हा भाग वेगळा.

या दुसऱ्या चालुक्यांचा पहिला सम्राट् तैल किंवा तैलप तथा आहवमल्ल हा राष्ट्रकूटांचा प्रधान असून, त्याच्या जहागिरींत विजापूर, धारवाड व

कलबर्गे या जिल्ह्यांचा कांहीं भाग मोडत असे. तैलप सम्राट् झाल्यावर त्याची सत्ता कर्नाटकांत म्हैसूर प्रांताचा कांहीं भाग, अनंतपूर व ब्रह्मारी यांवरहि पसरली. राष्ट्रकूटांची राजधानी मान्यखेट हीच तैलपाचीहि इ. स. ९९३ मध्यें राजधानी असल्याचा दाखला सांपडतो. तैलपामागून सत्याश्रय व सत्याश्रयामागून विक्रम हे दोघे सम्राट्पदावर आरूढ झाले. त्यांच्यामागून इ. स. १०४० मध्यें सोमेश्वर पहिला सिंहासनाधिष्ठित झाल्यानंतर त्यानें कल्याण नगर वसवून ती आपली राजधानी बनविली. सोमेश्वरानें इ. स. १०६८ मध्यें जलसमाधि घेतली. मान्यखेटास बरींच वर्षे राहून राज्य केल्यानंतर चालुक्य कांहीं दिवस यादगिरीस होते व त्यानंतर त्यांनीं कल्याण ही आपली राजधानी केली.

सोमेश्वर समाधिस्थ झाल्यावर त्याचा पुत्र दुसरा सोमेश्वर यानें आपणास राज्याभिषेक करून घेतला. पण त्याची अपात्रता नजरेस आल्यामुळें त्याला बाजूस सारून त्याचा धाकटा भाऊ विक्रमादित्य गादीवर आला; व त्यानें इ. सन १०७६ पासून पुढें ५० वर्षेपर्यंत कल्याणास राज्य केलें. कल्याणच्या सर्व चालुक्यांत विक्रमादित्य हा महापराक्रमी व कीर्तिमान् सम्राट् होऊन गेला. त्यानें आपल्या नांवाचें विक्रमपूर नगर वसविलें व त्याशेजारीं विष्णुमंदिर बांधून समोर एक तळें खोदलें. विक्रमादित्य गुणज्ञ, रसिक व विद्याभिलाषी असल्यामुळें त्याच्या आश्रयास दूरदूरचे कवि व पंडित येऊन राहिले. प्रसिद्ध कवि बिल्हण त्यांपैकीं एक असून, तो काश्मिरांतून कल्याणास आला. विक्रमादित्यानें त्याच्या विद्वत्तेस साजेल अशा ‘ विद्यापति ’ या पदवीनें त्यास गौरविलें. बिल्हणानें विक्रमादित्याच्या स्तवनार्थ विक्रमांकदेवचरित नामक लिहिलेल्या काव्यांत कल्याणाचें वर्णन पुढील आशयाचें केलें आहे.

‘ कल्याण येथील हर्म्यें इतकें उंच आहेत कीं त्यांवरील दीपज्योतींनीं रात्रीं काजळासारखें काळें आकाश प्रकाशतें. स्त्रियांचे स्तन मोठे असून

चंदनानें चर्चून शुभ्र करण्यांत येतात. त्यांच्या श्वासोच्छ्वासांतून मलयवातासारखा सुगंध सुटतो. तेथील जलाशयांतील उदक निर्मळ असतें व त्यावरील आकाश कालिंदीच्या डोहाप्रमाणें शोभतें. कल्याणाभोंवतीं तट आहे व त्या तटाला स्फटिकाची मुंढरी ( वप्र ) आहे. नगरांतील घरांच्या स्फटिकमय भूमीच्या प्रकाशापुढें आकाश काजळासारखें काळें दिसतें. कल्याण नगरापाशीं राजानें बांधलेल्या तडागाभोंवतीं वृक्षांनीं गर्दी केली आहे. राजानें पांथस्थांकरितां पाणपोयी घातली आहे. घरांच्या गच्च्यांवर रेशमाचे ध्वज फडकत आहेत. कल्याण नगराभोंवतालचा तट दुर्जनांनाहि अनुल्लंघनीय आहे. तेथील सौध इतके उंच आहेत कीं, त्यावर चंद्र टेंकल्यासारखा वाटतो.'

बिल्हणाप्रमाणें विक्रमाच्या राजसभेंतील दुसरा विख्यात पंडित विज्ञानेश्वर यानें याज्ञवल्क्यस्मृतीवर मिताक्षरा नामक लिहिलेली टीका सांप्रतहि सर्वत्र मान्यता पावली आहे. या टीकेच्या शेवटीं विज्ञानेश्वर हा विक्रमादित्य, कल्याण व आपण यांची पुढील शब्दांनीं स्तुति करतो—

नासीदस्ति भविष्यति क्षितितले कल्याणकल्पं पुरम् ।
नो दृष्टः श्रुत एव वा क्षितिपतिः श्रीविक्रमार्कोपमः ॥
विज्ञानेश्वरपण्डितो न भजते किंचान्यदन्योपमः ।
चाकल्पं स्थिरमस्तु कल्पलतिकाकल्पं तदेतत् त्रयम् ॥

विक्रमादित्यामागून त्याचा पुत्र तिसरा सोमेश्वर इ. स. ११२६ मध्यें गादीवर बसला. त्याच्या नांवावर 'अभिलषितार्थचिंतामणि' तथा मानसोल्लास नांवाचा ग्रंथ मोडतो. हा ग्रंथ सोमेश्वरानें रचला असल्यास तो स्वतःच पंडित ठरेल. इतर पंडितांकडून त्याची रचना झाली असल्यास कल्याण हें त्याच्याहि काळांत विद्वानांचें माहेरघर होतें असें मान्य करावें लागेल.

सोमेश्वरानंतर चालुक्य घराण्यास पडता काळ येऊन तिसरा तैलप गादीवर असता त्याचा दंडनायक म्हणजे युद्धमंत्री विज्जण यानें इतर सरदारांच्या मदतीनें इ. स. ११५७ मध्यें त्यास अटकेंत ठेवून राज्य बळकावलें. विज्जण हा कलचुरी घराण्यांतील असल्यामुळें विज्जणापासून कल्याणास कलचुरी सत्ता स्थापन झाली. ही सत्ता फारच अल्पकाल अर्थात् २६ वर्षें टिकली. कलचूरीचा हा अल्पकाल अतिशय धामधुमीचा गेला. त्याच्या कारकीर्दींत धर्मक्रांति घडून येऊन लिंगायत पंथ उदय पावला व तोच कलचूरींच्या नाशास कांहीं अंशीं कारण झाला म्हटलें तरी चालेल. या क्रांतीचा प्रवर्तक बसव असून, विज्जणाचा मुख्य प्रधान बलदेव हा त्याचा मामा. बलदेवानें आपली कन्या बसवास देऊन त्याच्याशीं जांवयाचें नवीन नातें जोडलें. बसव जातीचा ब्राह्मण. त्याची बहीण नागलंबिका हिचा पुत्र चन्नबसव याच्या साहाय्यानें बसवानें लिंगायत पंथ स्थापला. या पंथांत लिंग व नंदी यांना अग्रस्थान आहे. नवीन पंथाकरितां जंगम नांवाचा पुरोहितवर्ग बसवानें निर्मिला व बलदेवाच्या मरणोत्तर बसव हाच विज्जणाचा मुख्य प्रधान झाला; तेव्हां तो जंगमाप्रीत्यर्थ राजाच्या कोशागारांतून मनसोक्त पैसा खर्चूं लागला.

विज्जणाचा मंचण्णा हा दुसरा प्रधान होता. त्यानें बसवाच्या धर्मपंथाविरुद्ध राजाचें मन दूषित केल्यामुळें असो वा इतर कारणामुळें असो, बसव व विज्जण यांच्यांत वितुष्ट आलें. बसवास याचा सुगावा लागतांच तो राजधानी सोडून चालता झाला. राजानें त्याच्या पाठलागास सैन्य पाठविलें. त्या सैन्याची व बसवाच्या अनुयायांची लढाई होऊन तींत विज्जणाचें सैन्य पराभव पावलें. तेव्हां राजानें बसवास पुनः प्रधानपदावर नेमून घेतलें, तरी राजाचा त्याच्यावरील राग कायमच राहिला. विज्जणाचा विचार बसवाच्या नवीन पाखंडी मताचें निर्मूलन करण्याचा होताच. त्यानें लिंगायत पंथाचा छळ मांडला. बसवाचे दोन पट्टशिष्य हल्लेयाग व

मधपुय्या यांना धरून त्यानें त्यांचे डोळे काढविले. हें भयंकर वर्तमान कल्याणांतील लिंगायतांना समजतांच त्यांचीं मनें प्रक्षुब्ध बनलीं व ते सर्व पुढील उपाययोजनेसाठीं बसवाच्या मठांत जमले. त्यांच्या बैठकींत राजाला ठार मारण्याचा कट होऊन, बसवानें ही कामगिरी जगदेव या शिष्यावर सोंपविली. मालय्या व बोमय्या या दोन साथीदारांसह जगदेव थेट राजवाड्यांत गेला आणि भोंवतालचे दरबारी लोक व सरदार यांच्यामधून वाट काढून त्या सर्वांनीं हत्यार चालवीत राजाचा शिरच्छेद केला. त्याबरोबर राजपक्षीयहि खवळले. दोनहि पक्षांपाशीं शस्त्रास्त्रें व सैनिक यांची वाण नव्हती. माणसाला माणूस, घोड्याला घोडा व हत्तीला हत्ती भिडून कल्याण नगरांत मोठाच संग्राम माजला. त्या मारामारींत विज्जणपक्षाचें फार नुकसान होऊन कल्याण नगराची राखरांगोळी झाली. तेथून बसव मलप्रभा व कृष्णा यांच्या संगमावरील संगमेश्वराच्या देवालयांत गेला व तेथें संगमेश्वरापाशीं तपश्चर्या केल्यावर त्याच्या मनाला शांति मिळाली.

चालुक्य व कलचुरी यांच्या कारकिर्दींत कल्याणास झालेल्या घडामोडींचें इतकें विस्तृत वर्णन कल्याण नगराची नीट कल्पना येण्यासाठीं दिलें आहे. पश्चिम महाराष्ट्रांतील लोकांना या कल्याणाची माहिती नाहींच म्हटलें तरी चालेल, मग त्यास जावयाच्या मार्गाविषयीं तर बोलावयासच नको. शिवाय आज कल्याण मोठ्याशा खेड्यांतच जमा असल्यानें त्याची माहिती कां असावी ? कल्याण गांव बराच आडवळणी आहे. म्हणजे लोहमार्गापासून तो पुष्कळच दूर आहे. त्याला नजीकचीं मोठीं नगरें कलबुर्गें व बेदर. या दोन नगरांना लोहमार्ग आहे. तेथून पुढें सडकेचाच आश्रय करावा लागतो. सडकेनें कलबुर्ग्यापासून कल्याण साठ मैल आहे व बेदरापासून कदाचित् त्याहूनहि दूर आहे. पण कल्याणास जाण्यास कलबुर्गेंच सोयीचें. तेथून माणिकप्रभूचें हुमणाबाद चाळीस मैल व हुमणाबादेहून कल्याण वीस मैल.

कलबुर्ग्यापासून हुमणाबादेपर्यंत एक बस असून, हुमणाबादेहून कल्याणास जाणारी दुसरी बस आहे. सारा प्रवास अवघा तीन साडेतीन तासांत संपतो. पण जेव्हां बस नव्हती तेव्हां तीन दिवसहि पुरत नव्हते. या कारणानें बसच्या आगमनापर्यंत कल्याण सुखदायक एकांताचा उपभोग घेत बसलें होतें. त्याच्या या समाधीचा भंग आतां झाला असला तरी कल्याणांत तसें आकर्षण कांहींच नसल्यानें त्याची समाधि अजूनहि पुरी उतरली आहे .असें म्हणवत नाहीं.

मोगलाईच्या या भागांतील जमीन काळीभोर व सुपीक असल्यानें यंदा कांहींसें आवर्षण असतांहि कलबुर्ग्यापासून कांहीं अंतरापर्यंत ज्वारीच्या हिरव्यागार पिकाची थाप लागून राहिली होती. परंतु हुमणाबादेपासून बरेंच अंतर चालून गेल्यावर जमिनीचा रंग पालटून जिकडे तिकडे तांबडी माती दिसते व थोडेंसें खुरटें अरण्यहि भेटतें. कल्याणाची भूमि यामुळें तांबडीच आहे. गांवांतील वस्तीच्या मानानें गांवटाण फार विस्तृत आहे. यावरून कल्याणाची वस्ती दोन तीन ठिकाणीं तुटलेली होती कीं काय असें वाटतें; किंवा जाळपोळींत हें अंतर पडलें असेल. गांवाच्या साधारणपणें मध्यभागीं एक टेंकडी असून तिजवर चढलें म्हणजे गांवाची नीट कल्पना येते. या टेंकडींत कांहीं पडक्या गुहा अद्यापि आहेत. तेथून गोसाव्यांचे वाडे व समर्थ-पंचायतनांतील शिवरामस्वामी यांच्या वंशजाचें घर दिसतें. शिवरामस्वामी कल्याणास राहात असत व गोसावी हे पुण्यांतील गोसावीपुऱ्यामधील गोसाव्यांप्रमाणें सावकारी करीत. उत्तरेस अगदीं टोंकाला जुना भूदुर्ग आहे व दाक्षिणेस दुसऱ्या टोंकाला सदानंदांचा मठ आहे. सदानंदस्वामींच्या मठापासून दुर्गापर्यंत जो रस्ता जातो तोच गांवाचा मुख्य रस्ता किंवा पेठ. त्या रस्त्याची लांबी एक मैल भरेल. याच रस्त्यांत मुख्य दुकानें व सावकारांचीं घरें आहेत. त्यांस जोडणाऱ्या फूटरस्त्याला ब्राह्मणआळी आहे. या रस्त्याला एक-दोन वेशीहि आहेत. त्या बहुधा अर्वाचीन

मुसलमानी काळांतील दिसतात. गांवाभोंवतीं चालुक्यांनीं तट बांधला होता व त्यांत अर्थात् वेशी असतीलच. त्यांची मुसलमानांनीं नंतरच्या धामधुमीच्या काळांत दुरुस्ती केली, तेव्हांच्या या वेशी असाव्या. बिल्हण कवीनें वर्णनाच्या भरांत ज्या तटाला स्फटिकाची मुंढरी ( वप्र ) आहे असें म्हटलें, त्या तटाचे अवशेष अजूनहि कल्याणांत आढळतात. कांहीं थोरा-मोठयांच्या घरांना आजहि सौध आहेत; पण बिल्हणानें प्रशंसिलेल्या सौधां-इतके ते चन्द्रचुंबित खास नाहींत.

कल्याणांत पाणी आड-विहिरीचें आहे. वाहातें पाणी नाहीं. पण पाण्याचा तुटवडा बिलकूल नाहीं. गांवाच्या पश्चिमेस विहिरी व त्यांच्या आश्रयानें मळे व बागा आहेत. वाहात्या पाण्याची उणीव विक्रमादित्यानें बांधलेल्या तलावानें बरीच भरून निघाली आहे. हा तलाव गांवाबाहेर नैर्ऋत्य दिशेस अर्ध्या पाऊण मैलावर आहे. तेथें गांवांतील बायकामुलें स्नानास व वस्त्रें धुण्यास जातात. तलावाकडे जातांना रानोमाळ जुने अवशेष विखुरलेले आढळतात. कल्याणात लिंगायत पंथाची स्थापना झाल्यावर नंदींना व लिंगांना काय कमी ! त्यांतला किंवा चालुक्य काळापर्यंत आपली जन्मकथा भिडविणारा एक नंदी भग्नावस्थेंत एका शेताच्या कडेस, त्याची जणूं काय रात्रंदिवस राखण करीत बसला आहे. तेथून एक लवण उतरून वर गेलें म्हणजे जुनी बुजलेली विहीर दिसते. तिच्या बगाडामधील तोडींच्या एका थरांत चालुक्यकालीन सुबक हत्तींची घडीव दगडी रांग असून, तिच्या भाविक लोकांनीं केलेल्या पूजेंतील शेंदूर, गंधादि खुणांनीं ती दृग्गोचर होते. सदानंदस्वामींच्या मठांत एक उत्तम बांधीव विहीर आहे. तिच्या बांधकामांत ठायींठायीं चालुक्यकालीन सुंदर मूर्ति बसविल्या आहेत. त्या तळें उपशीत असतां निघाल्याचें सांगतात.

वर निर्देशिलेला तलाव बराच मोठा आहे. त्रिपुरांतकाचा तलाव म्हण-तात तो हाच. सदर तलाव विक्रमादित्यानें बांधल्याचें बिल्हण सांगतो.

तलावाचा परिघ अंदाजीं एक मैलाचा असून त्यांत उतरण्यास घांट व बसावयास मोठमोठया ओवऱ्या आहेत. ओवऱ्यांच्या पिछाडीस एक फरसबंदी सोपा आहे व त्याच्या भिंतींत गणपतीची मूर्ति आहे. सोप्याचे कांहीं खांब पंचकोनी व सुंदर नकशी काम केलेले आहेत. सोप्याच्या आवारांत बाहेरून येण्यास एक दरवाजा असून त्याला चालुक्य पद्धतीचीं उग्र सिंहमुखें आहेत. सोप्याच्या कोपऱ्यांत एक खोली आहे व तीच बसवेश्वराची तपश्चर्येस बसण्याची जागा. स्थळ रम्य, प्रसन्न, निवांत आहे. उदकाच्या सान्निध्यानें त्याची रम्यता अधिकच वाढली आहे. भोंवतालीं वृक्षांची गर्दी आहे. विज्जण राजास ठार मारण्याचा गुप्त कट याच मठांत झाला असावा व येथूनच जगदेव आपल्या दोन साथीदारांसह सध्यांच्या एक मैल लांबीच्या मार्गानें भू-दुर्गांतील राजवाड्यांत गेला असावा. या मठांत वरील गुप्त कट झाला असेल, तर त्याला योग्य असा एकांत प्रकृत स्थळीं सध्यांप्रमाणें तेव्हांहि असला पाहिजे. सांप्रत मठांतील एका खोलींत जंगम राहातो. तो गांवांतून आदरणीय अशा वेषानें भिक्षा मागून मठाकडे परत जातांना मला दुपारीं अडीच वाजण्याच्या सुमारास भेटला.

कल्याणच्या पूर्वकालीन स्थळांपैकीं तडाग व मठ हीं स्थळें होत. येथून सुमारें एक मैल दूर दुर्ग आहे. गांवांतील बाजार, दुकानें, खाटकांची, चांभारांची, शिंप्यांची व वाण्याउदम्यांची वस्ती याच रस्त्यावर आहे. दुर्ग गांवाच्या अगदीं टोंकाला असल्यानें गांवाचें सर्व स्वरूप वाट चालतांना दृष्टीस पडतें. मधून मधून मुसलमानांच्या मशिदी, दर्गे व थडगीं यांनीं सर्व प्रदेश चिताडला गेल्यानें गांवावर स्मशानाची कळा पसरली आहे व शांततាहि स्मशानवतच आहे. कारण थडग्यांची बांधणीच अशी असते कीं, ती पाहून प्रेताची भीतिकारक आठवण व्हावी. दुर्गापुढें मैदान बरेंच विस्तृत असून, त्याचा बाह्य देखावा भव्य व डौलदार आहे. जुन्या दुर्गांत मुसलमानांनीं मागाहून बरेच फेरबदल केले आहेत. बाहेरचा पहिला तट व

दरवाजा मागाहून बांधलेला स्पष्टच दिसतो. त्याच्या आंत थडगीं आहेत; तीं थोर मुसलमानांचीं असावीं. हा दरवाजा सोडून आंत आणखी तीनचार दरवाजे आहेत. ते मात्र चालुक्यकालीन वाटतात. दुर्गाच्या एका आवारांत तत्कालीन मूर्ती अवशेष म्हणून ठेवल्या आहेत. एका दगडी चौथऱ्यांत त्या-काळचा पाषाणाचा सुंदर हत्ती आहे. दुर्गाची रचना अशी आहे कीं, त्याचा आंतील भाग क्रमानें, भराव टाकीत टेंकडीसारखा चढता केला असल्यानें शेवटचा भाग गांवाहून फारच उंच वाटतो व तेथून दूरवर नजर पोंचते. कल्याण गांव एका मुसलमान जहागीरदाराचा असून सध्याचा जहा-गीरदार सहकुटुंब दुर्गांत राहातो.

कल्याणांतील सद्यःकालीन रम्य स्थळ म्हणजे सदानंदस्वामींचा मठ. त्यांत शिरण्याचा दरवाजा खूप मोठा आहे. पण भोंवतालीं हवार झालें असल्या-मुळें दरवाजाला न विचारतां परभारें मठात मनुष्य जातो. वाटेंतच एक पायऱ्यांची व मजबूत बांधणीची बारव आहे. त्याशिवाय एक आडहि असून त्यावरील चाकाचा कर्णमधुर ध्वनि दुरून ऐकूं येतो. मठाभोंव-तालच्या जमीन-जुमल्याचा हा भाग झाला. चिंच, आंबा इत्यादि विशाल वृक्षांनीं छाया व गांभीर्य असा दुहेरी लाभ त्यास घडला आहे. रस्त्यानें जाणारे-येणारे गाडीवान या वृक्षांच्या छायेंत आपल्या गाड्या सोडतात, बैलांना विसांवा देतात, आपण न्याहारी करतात व शिळोप्याच्या वेळीं मार्गस्थ होतात. हा भाग संपवून खास मठांत प्रवेश मात्र दरवाजावांचून शक्य नाहीं. खास मठ अगदीं बंदिस्त आहे. गतकालीन शांततेचें, स्वास्थ्याचें व पवित्र-तेचें तें जणूं काय आगरच आहे. तेथील मठपति व त्यांचे तरुण शिष्य पोथी वाचण्यांत निमग्न आहेत. बाहेर अंगणांत खुंट्याला बांधलेलें चपळ हरिण प्रतिबंधांतहि बागडत आहे, कुत्रीं सावधपणें बसलीं आहेत, पाळीव मांजरें पायांत घोंटाळत आहेत व शेंपटीचा गोंडा येणाऱ्या-जाणाराच्या अंगाला स्नेहभावानें लावीत आहेत, गायी-वासरें गोठ्यांत डोळे मिटून रवंथ

करीत आहेत. इतरत्र न आढळणारा पाळीव प्राणी वानर हें एक ल्हान पिल्लूं असून, मठांत सर्वत्र वावरतें व ओळखीच्याच्या पाठीवर वा खांद्यावर अचानक जाऊन बसतें व त्याला घाबरवून सोडतें. मठपति उतार वयाचा ब्रह्मचारी आहे. त्याचीं सारीं कामें सकाळपासून संथपणानें चालतात. त्याला घाई अशी माहीतच नाहीं. अगदीं स्वच्छंदीपणा. यामुळें मठांतील भोजनास सायंकाळचे चार-पांच वाजतात. चालुक्यकालीन निर्जीव मूर्ती अवशेषरूपानें सर्वत्र पडल्या आहेत. त्यांपैकीं ही हिंडती फिरती सजीव मूर्ति तर नसेलना !

कल्याण गांवाची वसति पांच–सहा सहस्र सहज आहे. गांव तालुक्याचा व जहागिरीचा आहे. लातूर, बिदर व कलबुर्गे हीं तीनहि नगरें या गांवापासून सामान्यतः समान अंतरावर आहेत. हा गांव महाराष्ट्रांतला कीं कर्नाटकातला ? येथील चालुक्य राजांना कवि बिल्हण यानें कर्नाटकेन्दु म्हटलें आहे. चालुक्य राजे मुख्यतः कर्नाटकाचे समजले जात होते याचें हें प्रमाणच आहे. याचा अर्थ असा कीं, मूळचे ते कर्नाटकाचे राजे व मागाहून त्यांची सत्ता इतर प्रांतावर पसरत गेली. विक्रमादित्य चालुक्यास बिल्हणानेंच ' कुंतलक्ष्मातिलक ' ही पदवी दिली आहे. कुंतल देश म्हणजे दक्षिण महाराष्ट्र. त्यांत बेळगांव, कोल्हापूर इत्यादि प्रदेश मोडत असे. महाराष्ट्र हा देश कर्नाटकापेक्षां फार मोठा असल्यानें त्यांतील निरनिराळ्या प्रदेशांना निरनिराळीं देशवाचक नांवें प्रचलित होतीं. जसें सेऊण देश, कोंकण, विदर्भ, कुंतल इत्यादि. कल्याणवासी चालुक्यांच्या काळीं सेऊण देशावर चालुक्यांचे मांडलिक यादव यांचें राज्य असून, तो देश कल्याणच्या उत्तरेस होता व वायव्येस कुंतल देश होता. कुंतल देशाचा कांहीं भाग व कर्नाटक खास चालुक्यांच्या राज्यांत असल्यामुळें बिल्हणानें चालुक्यांना ' कर्नाटकेन्दु ' व ' कुंतलक्ष्मातिलक ' हीं विशेषणें लावलीं असावीं. आणि कुंतल देश हा तर महाराष्ट्राचाच भाग म्हणून कल्याणचे चालुक्य हे कर्नाटक व महाराष्ट्र-विभाग यांवर राज्य करणारे असल्यानें कल्याण गांव

महाराष्ट्रांत तेव्हां नसेलच असें म्हणवत नाहीं. बहुधा तो गांव महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या सीमेवर असावा.

आज कल्याणची भाषा मराठी आहे. तेथील ब्राह्मणांच्या घरांत बायका-मुलांचीहि बोलण्याची भाषा मराठीच आहे. गांवांतील सर्व लोकांना मराठी भाषा चांगली समजते व विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरेंहि ते मराठींतूनच देतात. चांभार, धनगर या जातींच्या लोकांशीं मीं बोलून पाहिलें. त्यांनीं मला काय पाहिजे तें मराठींतूनच सांगितलें. चांभाराच्या घरांतील बोलीहि मला मराठीच ऐकूं आली. उलटपक्षीं तेथील लोकांना कानडीचें बोलण्या-जाणण्याचें ज्ञान नाहीं असें मात्र नाहीं. कानडी व मराठी या दोनहि भाषा बोलणारे व जाणणारे लोक त्या गांवीं पुष्कळ आहेत. कांहींची घरची भाषा कानडीहि असेल. परंतु कानडीपेक्षां मराठी ज्यांची स्वभाषा आहे अशांची वसति अधिक आहे यांत शंका नाहीं. यावरून आजहि महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या सीमेवरील हा गांव आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. हीच स्थिति बहुशः चालुक्यकाळीं असावी. चालुक्य हे सम्राट् असल्यामुळें त्यांच्या साम्राज्यांत जे प्रांत मोडत, त्या प्रांतांतील लोक कल्याण राजधानींत राजकीय व इतर संबंधांमुळेंहि कायमचे वसति करून राहिले असतील. या सर्व दृष्टींनीं पाहतां कल्याणवासी चालुक्य हे जितके कर्नाटकी तितकेच महाराष्ट्रीयहि कालेंकरून बनत गेले. कल्याणच्या स्त्री-पुरुषांची महाराष्ट्रीयांप्रमाणेंच चेहऱ्याची व शरिराची ठेवण असून, ते त्यांच्यासारखेच काळे-सांवळे, ठसठशीत, घट्टेकट्टे व एकंदरीनें ठीक दिसतात. सोलापुराकडील लोकांसारखेच ते झोंकदार रुमाल बांधतात व स्त्रिया लुगडीं नेसतात. ज्वारी, तूर, हरबरा, गहूं, ऊंस, केळीं इत्यादि सर्व महाराष्ट्रीय पिकें या प्रदेशांत होतात.

## देवगिरी

देवगिरीचें हल्लींचें नांव दौलताबाद. देवगिरी हें नांव उच्चारतांच दुर्गाचा बोध होतो. पण दौलताबाद या नांवानें श्रीमंत शहराची कल्पना येते.

देवगिरी ज्यावेळीं यादवांनीं आपली राजधानी केली त्यावेळीं तेथील सर्व वस्ती किल्ल्यांत होती व किल्ल्याबाहेर शहराचा विस्तार बिलकुल नव्हता असें म्हणवत नाहीं. कारण यादवांसारख्या एवढ्या मोठ्या सम्राटांची राजधानी दुर्गाच्या मर्यादित क्षेत्रांत मावणें शक्य नव्हतें. देवगिरीपूर्वीची मोगलाईतील राजधानीचीं नगरें मान्यखेट व कल्याण हीं लक्षांत घेतल्यास तेथें दुर्ग असून दुर्गाबाहेर वेगळीं नगरें होतींच. तोच न्याय देवगिरीसहि लागू असल्यामुळें दुर्गांत व बाहेर अशी दोन्ही ठिकाणीं लोकवस्ती असल्याचें अनुमान निघतें. सांप्रतहि दौलताबादेच्या किल्ल्याबाहेर पडकें व ओसाड गांव आहे. मुसलमानांची राजधानी असतां तें चांगलें भरभराटीचें शहर होतें. मुसलमानांच्या आक्रमणानें एक सत्ता जाऊन दुसरी सत्ता आली एवढाच फरक झाला. बाकीची व्यवस्था बऱ्याच अंशीं पूर्वीचीच कायम राहिली.

देवगिरीचा किल्ला दुरून एकाद्या पार्थिवासारखा दिसतो. तो कांहींसा भू-दुर्गासारखा व कांहींसा शैल–दुर्गासारखा आहे. किल्ल्याला आरंभ भूमीपासून झाला आहे या दृष्टीनें तो भू-दुर्ग आहे, पण तो खडकाचा आहे या दृष्टीनें तो शैलदुर्ग आहे. पश्चिम महाराष्ट्रांत डोंगरी किल्ले आहेत. पण त्यांचा मागमूस आपण सर्व डोंगर चढून माथ्यापाशीं पोंचेपर्यंत लागत नाहीं. माथ्याजवळ किल्ल्याचे दरवाजे व तटबंदी दृष्टीस पडली म्हणजे किल्ल्यावर आल्याविषयीं खात्री पटते. देवगिरीचें मात्र तसें नाहीं. तेथील किल्ल्याला पायथ्यापासूनच सुरुवात होते. किल्ला दुरुस्त स्थितींत असल्यामुळें निजाम सरकारनें त्याचा बंदोबस्त चांगला ठेवला आहे. किल्ल्याच्या पहिल्या दरवाजापाशीं पहारा आहे. त्या दरवाजापासून अगदीं शेवटपर्यंत सात दरवाजे आहेत. पहिल्या दोन दरवाजांमधील अंतर अगदीं थोडें आहे. हे दोन दरवाजे दोन तटांना असून पहिला तट ही नुसती भिंत आहे व दुसऱ्या तटांत बुरुज आहेत. एक तट डोंगराच्या अंगचाच खोदलेला आहे. दुर्गाभोंवतीं एकांत एक असे दोन खंदक असून त्यांत पाणी आहे. शत्रूचा

दुर्गांत प्रवेश न होण्याकरितां दुर्ग बांधणारांनीं शक्य तितकी खबरदारी घेतली आहे. इतकी खबरदारी इतर कोणत्याहि दुर्गावर क्वचितच आढळेल. खंदकावरून नेहमीं जाण्यायेण्यास सरक-पूल आहे. तो सरकपूल काढून घेतला कीं मार्ग बंद. किल्ल्याच्या बांधकामांत व अंतर्गत रचनेंत हिंदु व मुसलमान या उभयतांनीं हात चालविला आहे.

या किल्ल्यांत यादव, अल्लाउद्दिन खिलजी, महंमद तघलख व औरंगजेब यांनीं वास्तव्य करून निरनिराळ्या स्वरूपाचीं आपलीं स्मारकें मागें ठेवलीं आहेत. दोन तट ओलांडून आंत शिरल्यावर एक पटांगण विस्तारलें असून त्यावर अल्लाउद्दिनानें आपला मनोरा बांधला आहे. तो दिल्लींतील कुतुबमिनारच्या धर्तीवर व पांच मजली आहे. हें एक जसें अल्लाउद्दिनाचें स्मारक तसें कुतुबुद्दिन मुबारकाचें स्मारक म्हणजे मशीद. हिंदूंचें देऊळ पाडून त्याची मशीद बांधल्याच्या खुणा तिच्यांत अद्यापि दिसतात. किल्ल्याच्या एका लहान बुरुजावर मेंढा नांवाची तोफ आहे. ती आपली आहे हें पाहाणाराच्या मनावर ठसविण्याकरितां औरंगजेबानें तिजवर ‘ महंमद औरंगजेब बादशहा गाझी ’ असें स्वतःचें नांव खोदलें आहे. मुसलमान-पूर्वकालीन खुणा येथें दाखवावयाच्या झाल्यास येथील हेमाडपंती ओसाड देवालय व दुसऱ्या दरवाजाच्या आंतील दोन्ही बाजूंचे दोन दगडी हत्ती यांजकडे बोट करावें लागतें. कारण हिंदूंच्या प्राचीन लेण्यांतून व देवळांतून असे हत्ती आढळतात. किल्ल्यांत कोरीव लेणींहि आहेत. वर सांगितलेल्या इमारतींशिवाय आणखी एका इमारतीचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. तिला चिनी महाल म्हणत असून तींत औरंगजेबानें संभाजीच्या बायकामुलांस कैदेंत ठेवलें होतें.

देवगिरीचा दुर्ग बांधण्यांत ठिकठिकाणीं कल्पकता लढविण्यांत आली आहे. कारण पटांगणाच्या पुढचा डोंगर चढण्याचा मार्ग उघडा न ठेवतां डोंगर पोखरून त्यांतून काढला आहे. त्याला मोठी अंधारी म्हणतात.

तिच्यांतून चालतांना उजेडाकरितां मशाली घेऊन पायऱ्या चढाव्या उतराव्या लागतात. त्या अंधारीच्या एका कोंपऱ्यांतील भुयारांतून कोणास खालीं ढकलून दिल्यास त्याचा पत्ताहि लागत नाहीं असा समज आहे. अंधारींतून बाहेर पडण्याच्या दारावर तवा आहे. तो लोखंडी पत्रा असून त्यावर सर्पण रचून तें पेटवून दिलें कीं तो धूर आंधारींत शिरतो व आंतील माणूस गुदमरतो. तव्यांतून बाहेर पडून ८३ पायऱ्या चढून गेल्यावर एक देऊळ भेटतें. त्यातील गणपतीस फेंकून देऊन त्याच्या जागीं पीर बसविलेला आहे. दुर्गाच्या अगदीं माथ्यापाशीं मुसलमानांची बारद्वारी आहे. हिंदूंना पवित्र वाटणारें येथील स्थळ म्हणजे एकनाथांचे गुरु जनार्दनस्वामी यांची समाधि. ती भुयारांत आहे, व तेथून कांहीं अंतरावर नाथांच्या अनुष्ठानाची जागा व गुहा आहे. मी भाद्रपदमासीं गडावर गेल्यामुळें त्या भुयारांत गुडघ्याइतकें पाणी होतें. त्या पाण्यांतून व आंधारांतून समाधीचें दर्शन फार प्रयासानें घडतें. भुयाराच्या एका कोंपऱ्यांत समाधीची जागा आहे, दुसऱ्या कोंपऱ्यांत दत्तात्रयाच्या पादुका आहेत व या भुयाराच्या टप्प्यावरून आणखी थोडेंसें चढून गेल्यावर दुर्गा नांवाची तोफ दृष्टीस पडते. गडावर मोठ्या तोफा तीन असून त्या तेवीस ते सत्तावीस विती लांब आहेत.

देवगिरीच्या या माथ्यावरून किती तरी दूर अंतरापर्यंत नजर पोंचते. उत्तरेकडील वेरूळच्या डोंगरांची रांग सोडल्यास पूर्व, पश्चिम व दक्षिण या दिशा अगदीं खुल्या आहेत. या तिन्ही दिशांस जिकडे पाहावें तिकडे पुराण्या व पडक्या झडक्या इमारतीच इमारती आढळतात. त्यांतच रंगमहाल, वैजापूर, औरंगजेबाची खुलदाबाद व त्या शेजारचा तलाव पाहून अनेक विकार मनांत उद्भवतात. पावसाळ्यांतहि तेथील हवा कोरडी व प्रसन्न वाटते. गडावरून उतरतांना एक म्हातारी ब्राह्मण विधवा भेटली. ती जनार्दनस्वामींच्या समाधीची पूजा करून परत चालली होती. समाधीस कायमचें उत्पन्न कांहींच नसून दर्शनास येणारे लोक समाधीपुढें ठेवतील तीच काय

ती म्हातारीला प्राप्ति. तिला प्रत्यहीं गड चढण्या-उतरण्याचे श्रम सहन होत नसल्यामुळें व गरिबींत ते करावे लागत असल्यामुळें ती एकीकडे दुःखाचे उसासे टाकीत होती व दुसरीकडे काठी टेंकीत टेंकीत पाय उचलीत होती. गडावर बसण्याजोगें स्थळ म्हणजे बारद्वारी. ही साधी पण नवी व स्वच्छ इमारत आहे. तेथून सातारें गांवाकडे नजर जाते. साताऱ्यास खंडोबाचें देऊळ असून त्याचें नांव उच्चारतांच मराठ्यांच्या सातारा राजधानीची आठवण सहजच होते.

खुद्द दौलताबादेचें दैन्य गडाच्या पायथ्यापेक्षां गडाच्या माथ्यावरूनच अधिक प्रत्ययास येतें. देवगिरीस दौलताबाद हें नांव महमद तघलखानें दिलें. तें काय पाहून देण्यांत आलें याची कल्पना आज मुळींच करवत नाहीं. 'कारण नांव सोनूबाई नि हातीं कथलाचा वाळा' अशी त्याची स्थिति आहे. नांवास शोभेशी त्यांत दौलत नाहीं व तें आबादहि नाहीं. उलटपक्षीं हिंदूंच्या काय, पण मुसलमानांच्याहि प्राचीन वैभवाचें तें स्मशानच होय. गांवांत चार भिकार घरें आहेत. पण त्यापेक्षां थडगींच जास्ती असल्यामुळें दौलताबाद म्हणण्या-ऐवजीं कबराबाद म्हणणेंच अधिक शोभेल. तेथें हिंडणाऱ्या फिरणाऱ्या माणसांपेक्षां पुरलेलीं माणसेंच असंख्य ही कल्पना मनांत येतांच भोंवतालचीं हिंडतीं फिरतीं माणसेंसुद्धा भुताखेतांपैकीं नसतील ना असा आचका मनास बसल्याशिवाय राहात नाहीं.

देवगिरीचा दुर्ग कोणत्या काळांतील हा प्रश्न देवगिरी पाहून झाल्यावर मनांत आल्याशिवाय राहात नाहीं. जवळचीं वेरूळ येथील लेणीं व औरंगाबादेचीं लेणीं विचारांत घेतल्यास हा दुर्ग त्या लेण्यांच्या काळांतच बांधण्यांत आला असावा असें वाटतें. वेरूळच्या लेण्यांवर रा. त्रिंबक गंगाधर धनेश्वर यांनीं लिहिलेल्या पुस्तकांत राष्ट्रकूट वंशांतील राजे वेरूळ प्रांतांत राज्य करीत असतां त्यांनीं इ. स. ४०० च्या सुमारास हा दुर्ग खोदविल्याचें म्हटलें आहे. यादवराजा कृष्णदेव याचा शक ११७२ मधील ताम्रपट

सांपडला आहे. त्यांत चौथ्या भिल्लमास त्याचें श्रेय दिलें आहे. देवगिरी ही यादवांची राजधानी निर्विवाद होती, त्यावरून सदर दुर्ग त्यांनींच बनविला असल्याचें अनुमान सहजच बांधावेंसें वाटतें. त्यास वरील ताम्रपटानें पुष्टीहि मिळते. भिल्लम शक ११०० मध्यें गादीवर बसला व शक १११३ मध्यें मरण पावला. भिल्लमानें ११०९ च्या सुमारास देवगिरी ही आपली राजधानी केली. देवगिरीपूर्वी यादवांची राजधानी श्रीनगर तथा सिन्नर ही होती. देवगिरीचें वर्णन पुढीलप्रमाणें केलेलें आढळतें. 'तें त्रिभुवनसौंदर्याचें सारसर्वस्व आहे. तेथील घरांचीं शिखरें मेरुपर्वताच्या शिखरांशीं स्पर्धा करणारीं आहेत. सेऊण देश अतिसुंदर व मधुर आहे.' यायोगें देवगिरी सेऊण देशांत असल्याचें स्पष्ट झालें. सेऊणपूरहि सेऊण देशांतच असेल तर तें देवगिरीच्या आसपास कोठें तरी असलें पाहिजे. यादव राज्याची अखेर शक १२४० मध्यें झाली. तेथपर्यंत म्हणजे सव्वाशेंहून अधिक वर्षे राजधानीचा मान देवगिरीकडे राहिला असल्यामुळें तें नगर त्यावेळीं चांगलें भरभराटींत असलें पाहिजे. रामचन्द्रदेवानें अल्लाउद्दिनास खंडणी दिली तिच्यांत सहाशें मण सोनें, सात मण मोतीं, दोन रत्नें, एक सहस्र मण रुपें व चार सहस्र रेशमी वस्त्रें यांना तो मुकला असें म्हणतात. ही अपार संपत्ति ज्या नगरांतून अल्लाउद्दिनानें नेली त्यास दौलताबाद हें नांव खरोखर शोभेल. पण असलें समर्पक नांव अल्लाउद्दिनास देण्याचें न सुचतां त्याच्यामागून सुमारें बत्तीस वर्षांनीं महंमद तघलखास कसें सुचलें याचें आश्चर्य वाटतें.

## पुरी

कोंकणांत पुरी या नांवाचीं दोन स्थळें आहेत. एक मुंबईजवळची घारापुरी व दुसरी जंजिऱ्याजवळची राजपुरी. घारापुरी हें लहानसें बेट मुंबईपासून सात मैलांवर असून त्यालाच इंग्रजींत एलेफंटा म्हणतात. घारापुरी ही तेथील लेण्याविषयीं प्रसिद्ध आहे. त्या बेटावर उतरावयाच्या तीन धक्कयांना शेटबंदर, मोराबंदर व राजबंदर अशीं नांवें आहेत. येथून अगदीं

जवळचें बंदर उरण तीन मैलांवर आहे व ठाणें शहर पांच मैल दूर आहे. उरणासहि मोरा बंदर नांवाचा धक्का आहे. उरणापासून समुद्रांत जमिनीची एक चिंचोळी पट्टी घुसली असून ती घारापुरीहून एक मैल अंतरावर असेल नसेल.

घारापुरींत दोन टेंकड्या आहेत व त्या एका निरुंद दरीनें एकमेकींपासून विभागल्या आहेत. घारापुरीचा घेर ४॥ मैल आहे. भरती ओहोटीच्या मानानें बेटाचें क्षेत्रफळ ६ ते ४ चौरस मैलांपर्यंत चढतें व उतरतें. एखादें लहानसें नगर बसविण्यापुरतीहि बेटावर सपाट भूमि नाहीं. बेटावर राहाणारे लोक फार थोडे व त्यांचा धंदा मेंढ्या व कोंबड्या पाळण्याचा आहे. त्यांच्या विक्रीची पेठ मुंबई. हे लोक भोंवतालच्या गांवांतून गेल्या शतकांत घारापुरीस रहावयास आले आहेत. तिला तटबंदी नसल्यानें तिजवर कोणी-कडूनहि हल्ला चढवितां येण्यासारखा आहे. हवा एकंदरींत रोगट आहे. पावसाळ्यांत व त्यानंतर कांहीं दिवसपर्यंत तेथें हिंवतापादि आजारांचा जोर असतो. या बेटावर कधीं काळीं एखादें शहर वसलें असेल असें दाख-विणारा पुरावा अद्यापि पुढें आलेला नाहीं.

आतां राजपुरीचा विचार करूं. राजपुरीला दंडाराजपुरी असें संयुक्त नांव आहे. दंडा व राजपुरी या नांवाचीं दोन वेगळालीं गांवें आहेत. हीं दोन्हीं गांवें राजपुरी नांवाच्या खाडीवर असून वाळूचा दांडा पाण्याच्या लाटांनीं तेथें उत्पन्न होतो म्हणून त्या स्थळास दांडा किंवा दंडा म्हणतात. राजपुरीपासून दक्षिणेस राजपुरीची खाडी सुरू होते व तिजवर राजपुरीच्या दक्षिणेस दंडा आहे. राजपुरीच्या उत्तरेस दोन मैलांवर जंजिरा संस्थानाची सध्याची राजधानी मुरुड असून राजपुरी व मुरुड यांचे दरम्यान खाडी आहे. म्हणजे राजपुरीच्या उत्तरेस व दक्षिणेस खाड्या आहेत व पश्चिमेस समुद्र आहे. मात्र उत्तरेची खाडी दक्षिणेच्या खाडीइतकी मोठी नाहीं. याच समुद्रांत प्रसिद्ध जंजिरा किल्ला असून तो राजपुरी बंदरापासून पाव फर्लांगावरहि

नाहीं. हें अंतर इतकें थोडें आहे कीं किल्लयांतून मारलेली हांक राजपुरींत सहज ऐकूं येते. किल्ला चोहों बाजूंनीं पाण्यानें वेढलेला व राजपुरी खाडीच्या अगदीं तोंडावर आहे.

राजपुरीची सध्याची वस्ती अवघी तीनशें आहे. राजपुरीस जुन्या तटबंदीचे अवशेष आहेत व त्या तटांत दरवाजाहि आहे. राजपुरीचें बंदर उत्कृष्ट आहे व हवा चांगली आहे. गांवाकरितां शेजारच्या डोंगरावरून गोड्या पाण्याचे नळ आणिले आहेत व गावांत मशिदहि आहे. राजपुरीभोंवतीं ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाचीं व शेतीप्रधान गांवें आहेत. राजपुरीपासून राजपुरी खाडीला दोन फांटे फुटतात. एक फांटा म्हशाळ्याकडे व दुसरा मांदाडाकडे जातो. मांदाडाकडील फांट्याला मांदाडापाशीं दोन फांटे फुटतात. त्यांतील महत्त्वाचा असा फांटा घोसाळगडाकडे गेला आहे. मांदाड गांव राजपुरीपासून खाडींतून पांच मैल दूर आहे. मांदाड गांवापाशीं अगदीं टेंकून डोंगरांत कुड्याचीं प्रसिद्ध बौद्ध लेणीं आहेत. तीं महाभोज राजांनीं खोदलीं. त्यांना कुडें-मांदाडचीं लेणीं म्हणतात. राजपुरीपासून समुद्रकांठीं ११ मैलांवर दिवें बोरली हा गांव आहे. येथील सुपारी आजहि प्रख्यात आहे. श्रीवर्धनच्या रोठयाहूनीहि ती सरस आहे. दिव्यांतील नारायणाची मूर्ति प्रसिद्ध असून तिजवर दशावतार कोरले आहेत. दिव्यास श्रीनंद व महानंद या राजांच्या प्रशस्तिपर शिलालेख आहे. हे नंद संवत् ६७५ च्या सुमारास होऊन गेले. कदाचित् ते मौर्यांच्या मागून झाले असतील. दिव्यास इतरहि कित्येक पुसट लेख आहेत.

राजपुरीभोंवतालचीं प्रसिद्ध गांवें म्हटलीं म्हणजे मांदाड, मुरुड, खोकरी, दांडा, नांदगांव, म्हशाळें, श्रीवर्धन हीं होत. चेऊल व म्हशाळें हीं या भागांतील दोन प्राचीन उत्कृष्ट बंदरें असून त्यांच्यामध्यें राजपुरी हें तसेंच प्राचीन व उत्कृष्ट बंदर आहे. म्हशाळें हें टॉलेमीचें मुसापली होय. नांदगांव म्हणजे नंदराजांनीं वसविलेलें गांव. म्हशाळें राजपुरीपासून खाडींतून तीन

कोस आहे. राजपुरीभोंवतालीं सागाचें अरण्य व भात शेती मोठी असल्यानें येथून मोठा व्यापार चालत असे. अशा रीतीनें राजपुरी हें स्थळ राजधानी होण्यास नैसर्गिक अनुकूलता किती आहे, याची साक्ष पटते. शिवाय राजपुरी या नांवावरूनहि ती राजाची नगरी म्हणजे राजधानी होती हें स्वाभाविकच ठरतें.

आतां देवगिरीच्या यादवांपासून अर्वाचीन काळांत राजपुरीचा दर्जा काय होता हें पाहूं. यादवकाळीं ती एका जिल्ह्याची राजधानी होती. अहमदाबादेच्या सुलतानाच्या ताब्यांत ती असतां सरकार या राजकीय विभागाचें तें मुख्य ठाणें होतें. सोळाव्या शतकांत अहमदनगरच्या बादशहांनीं अहमदाबादेच्या सुलतानापासून ती घेतल्यावर राजपुरीचा बंदर या नात्याचा दर्जा चौलच्या खालोखाल होता. शिद्दीकडे याची हुकूमत गेल्यावर त्याच्या अमलाखालच्या मुलुखास ‘ दंडाराजपुरी जहागीर ’ असें म्हणत असत.

पेशवाईत मराठ्यांच्या स्वाऱ्या जंजिऱ्याच्या शिद्दीवर इ. स. १७३३ ते १७३७ पर्यंत एकसारख्या सुरू होत्या. त्यावेळीं राजपुरी हें महत्त्वाचें बंदर होतें ( पेशवा बाजीराव ॲन्ड मराठा एक्सपॅन्शन, दिघेकृत, पृष्ठ ८४ ). त्यानंतर मराठ्यांच्या भयानें शिद्दीनें आपली राजधानी तेथून जंजिऱ्यांत नेली. इ. स. १७२७ त जंजिऱ्याच्या शिद्दीनें पुण्यास पेशव्यांच्या घरीं मुंजीस जाण्यास कांहीं ब्राह्मणांना दस्तक दिला त्यांत जंजिऱ्याचा उल्लेख कोट जंजिरे राजपुरी असा आढळतो ( पे. द. ४३, पृ. १ ) तो राजपुरीचें प्रामुख्य सिद्ध करण्यास पुरेसा आहे. यावेळीं हल्लीचें मुरुड गांव असलेंच तरी अगदीं क्षुद्र असून त्यास महत्त्व पुढील काळांत शिद्दीनें ती राजधानी केल्यावर आलें.

इ. स. १८८६ च्या सुमारास मुरुड ही राजधानी झाली. मुरुडास राजधानी नेल्यापासून राजपुरीचें वैभव समूळ नष्ट होऊन तें मुरुडास प्राप्त झालें व आतां राजपुरीऐवजीं मुरुड ही शिद्दीची राजधानी आहे.

राजपुरीविषयीं कुलाबा गॅझीटियरनेंही कांहीं विधानें केलीं आहेत. तीं येथें विचारांस घ्यावयास पाहिजेत. तीं येणें प्रमाणें "कोंकणच्या इतिहासांत वेगळाल्या काळीं दंडा-राजपुरीस महत्त्व होतें. कोंकणच्या शिलाहारांची इ. स. ८१० ते १२६० पर्यंत पुरी म्हणून जी राजधानी होती ती राजपुरीच असें कांहीं समजतात. पण दंडा राजपुरीस प्राचीन अवशेष नाहींत व ती उत्तर शिलाहारांची राजधानी होण्याच्या दृष्टीनें दक्षिणेस फार दूर पडते. म्हणून तिजविषयीं संशय येतो. मोरे बंदर हें घारापुरी किंवा एलेफंटा यांवर उतरण्याचें ठिकाण आहे त्यावरून जर्विस यानें हीच पुरी असें म्हटलें आहे पण तेंहि संशयास्पदच आहे. राजपुरी हें १४ व्या शतकाच्या प्रारंभीं जिल्ह्याचें ठाणें होतें. इ. स. १४०० मध्यें निजामशाहीचा संस्थापक मलिक अहंमद यानें या नगराचा पाडाव केला. अहमदनगरची सत्ता होती तोंपर्यंत दंडा-राजपुरींत व्यापार बराच चालत होता. इ. स. १५१४ त बारबोसा यानें तिचा बंडा किंवा दंडा या नांवानें उल्लेख केला आहे व गुजराथेच्या इतिहासकारांनींहि ती एक व्यापारी पेठ व गुजराथ राज्याच्या वीस जिल्ह्यांपैकीं तो एक जिल्हा त्या सुमारास होता असें म्हटलें आहे."

यावरून गॅझीटियरकारांनाहि दंडाराजपुरीचें पंधराव्या शतकापासून पुढच्या काळांतील ऐतिहासिक महत्व पटलेलें दिसतें. त्यांची मुख्य शंका अशी कीं दंडाराजपुरी ही उत्तर शिलाहारांच्या राज्याच्या एका टोंकाला असतां ती त्या राज्याची राजधानी होईल कशी ? पण तिला उत्तर शिलाहार व त्यांजपूर्वीचे मौर्य यांच्या इतिहासांत मिळणार आहे. दंडाराजपुरी ही सहाव्या शतकांत मौर्यांची राजधानी होती तेव्हां मौर्य सत्ता उत्तर व दक्षिण या दोन्ही कोंकण पट्टीवर असल्यानें दंडाराजपुरी ही त्यांना मध्यवर्ती अशीच राजधानी होती. पुढें दोन कोंकणांवर शिलाहारांचीं दोन राज्यें झालीं तेव्हां पुरी म्हणजे दंडाराजपुरी ही प्रारंभीं उत्तर कोंकणाची राजधानी असली तरी मागाहून

त्यावर राज्य करणाऱ्या शिलाहारांनीं स्थानक म्हणजे ठाणें, ही आपली दुसरी राजधानी मुद्दाम सोयीकरितां केली. तसेंच जर्विस यानें घारापुरींतील मोरे किंवा मोराबंदर याजवर बोट ठेवून व त्याचा संबंध मौर्यांशीं जोडून घारापुरी हीच पुरी असावी असें दर्शविलें आहे. परंतु मोराबंदर जसें घारापुरीस तसें घारापुरीजवळच्या उरण बंदरांतहि आहे हें विसरतां कामा नये. 'मोरा' या शब्दाचाहि थोडासा खुलासा करणें आवश्यक आहे. 'मोरा' हा इंग्रजी उच्चार 'मोडा' या मराठी शब्दाचा असून मोडा म्हणजे लहानशी खाडी किंवा उतरण्याचें ठिकाण अथवा धक्का असा त्याचा अर्थ आहे. तो लक्षांत घेतल्यानें मोरा या शब्दानें होणारा भलताच समज आपोआप गळून पडतो व घारापुरी हीच पुरी असें मानण्याचा समूळ पायाच उखडला जातो.

आतां दंडाराजपुरी हीच शिलाहारांची पुरी समजण्यास कांहीं प्रमाणें सांपडतात कीं काय हें पाहूं. राजपुरी हें बंदर आहे व घारापुरी हें बेट आहे. त्यापुढें पुरी हें बंदर असल्याविषयीं कांहीं प्रमाण सांपडल्यास ती पुरी म्हणजे राजपुरीच, घारापुरी नव्हे असें आपोआपच सिद्ध होईल. बदामीचा प्रसिद्ध सम्राट् चालुक्य पुलकेशी दुसरा याच्या कारकिर्दींत बदामी जवळच्या ऐहोळी येथील जैन मंदिरांत रविकीर्ति नामक जैन कवीनें पुलकेशीच्या प्रशस्तिपर एक शिलालेख सहाव्या शतकांत लिहिला आहे. त्यांत पुलकेशीनें इ. स. ५११ चे सुमारास कोंकणच्या मौर्य राजावर केलेल्या स्वारीचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे.

अपरजलधेर्लक्ष्मीं यस्मिन्पुरीमभितप्रभे ।
मदगजघटाकारैर्नावां शतैरवमृन्दति ॥
जलदपटलानीकाकीर्णे नवोत्पलमेचकम् ।
जलनिधिरिवव्योम व्योम्नः समोभवदंबुधिः ॥

अर्थ—महाप्रभावी अशा ज्या राजानें ( पुलकेशी ) मदयुक्त गजपंक्ती प्रमाणें आकार असणाऱ्या अनेक नावांच्या सहाय्यानें पश्चिम समुद्राची लक्ष्मी अशा पुरी नामक राजधानीला वेढा देत असतां मेघ-समुदायानें व्याप्त आणि ताज्या उत्पलाप्रमाणें नीलवर्ण असें जें आकाश तें समुद्रासारखें झालें व समुद्र गगनासारखा झाला.

वरील वर्णन वाचून पुरी हें बंदर होतें कीं बेट होतें, याचा निर्णय लागत नाहीं. किंबहुना बंदरापेक्षां तें बेट असावें इकडे मनाचा कल धांवतो. तथापि राजपुरीच्या पश्चिम बाजूनें समुद्र, दक्षिणेस राजपुरीची मोठी खाडी व उत्तरेस लहान खाडी लक्षांत घेतां राजपुरीहि द्वीपप्रायच समजण्यास हरकत नाहीं. वरील श्लोकांत मदगजघट असे शब्द आहेत. त्यांचा अर्थ व्यंजनेनें घेतल्यास राजपुरीस वेढा देतांना पुलकेशीनें हत्तीहि लावले होते असें म्हणतां येईल.

पुलकेशीच्या स्वारीनंतर कित्येक शतकांनीं कल्याणचा चालुक्य राजा सत्याश्रय हा इ. स. ९९५ मध्यें पुरीवर चालून गेला. त्यासंबंधीं डॉ. आळतेकर पुढीलप्रमाणें लिहितात.

“ सत्याश्रयानें कोंकणाधिपतीस पळवून लावून आपलें राज्य समुद्रापर्यंत फैलावलें. कन्नड कवि रण्ण यानें या प्रसंगाचें हुबेहुब चित्र रेखाटलें आहे. एका बाजूनें समुद्राकडून व दुसऱ्या बाजूनें सत्याश्रयाच्या सैन्याकडून कोंडल्यामुळें शिलाहार राजा अपराजित हा दोन्ही टोकें पेटविलेल्या काडीवर चढलेल्या आळीप्रमाणें थरथर कांपूं लागला.’ प्रस्तुत वर्णन दंडाराजपुरीसारख्या बंदरासच लागू पडतें, घारापुरीस लागू पडत नाहीं, हें सांगावयास नकोच. शिवाय राज्याचा सर्व प्रदेश जमिनीवर असतां राजधानी अलग अशा बेटांत ठेवण्यांत अर्थ कांहींच नाहीं. कुलाबा गॅझीटीअरकारांनीं कोंकणाची राजधानी पुरी होती असें म्हटलें असलें तरी त्या विधानास स्वतंत्र आधार हवाच. तसा आधार शिलाहार राजा चित्तराजदेव यानें इ. स. १०२५ मध्यें दिलेल्या ताम्रपटांत आढळतो. त्यानें कोंकणाचें वर्णन ‘ पुरीप्रमुखचतु-

देश सतिसमन्वितसमस्तकोंकणभुवम्' असें एके ठिकाणीं केलें आहे. त्याचा अर्थ कोंकणांत १४०० गांवें असून त्यांतील प्रमुख गांव म्हणजे राजधानी पुरी ही होय. पण हें वर्णन उत्तर कोंकणास लागू पडतें, दक्षिण कोंकणास लागू पडत नाहीं असें तरी कशावरून? त्यास महामहोपाध्याय पांडुरंग वा. काणे यांनीं लिहिलेल्या 'Notes on the ancient history and geography ot the Konkan' या लेखांत मिळतो. ते म्हणतात 'फार प्राचीन काळांतील लेखांतून कोंकणाचा एक चौदाशें खेड्यांचा व दुसरा नऊशें खेड्यांचा असे दोन भाग पाडलेले आढळतात. ज्या प्रदेशांत १४०० खेडीं होतीं त्याची राजधानी पुरी असून त्यांत हंजामन (संजाण), सोपारें, ठाणें, कल्याण, चौल इत्यादि गांवें आणि ठाणें, कल्याण व रत्नागिरी जिल्ह्याचा कांहीं भाग मोडत होता.'

पुरीचा ज्यांत उल्लेख आहे असे ताम्रपट उत्तर कोंकणांत बरेच मिळाले आहेत. पण खुद्द पुरीपाशीं मुरुडास तशा प्रकारचे दोन ताम्रपट सांपडावे हा केवळ योगायोग नव्हे. राजपुरी तीच राजधानी पुरी असें सिद्ध करण्यास तो एक महत्वाचा पुरावाहि समजण्यास हरकत नाहीं. हे दोन ताम्रपट मुरुडास एका दगडी पेटींत होते व ते सन १९२३ सालीं बडोदा सरकारानें खरेदी करून आपल्या पुराणवस्तुसंग्रहांत ठेवले. हे दोन्ही ताम्रपट शिलाहार राजा अपराजित याचे आहेत. ज्या अपराजितावर सत्याश्रयानें सन ९९५ मध्यें स्वारी करून पुरीस वेढा दिला तोच हा अपराजित. अर्थात् त्या अपराजि-ताची राजधानी पुरी तीच ही राजपुरी असली पाहिजे. कारण राजपुरी व मुरुड यांजमध्यें एक खाडी असून त्या दोन्ही गांवांमधील अंतर फक्त दोन मैलांचें आहे. तेव्हां मुरुडांत सांपडलेले ताम्रपट हे राजपुरीचेच समजण्यास हरकत नाहीं. कारण मुरुडापूर्वी राजपुरी हीच सिद्द्यांची राजधानी होती व राजधानी झाल्यावर राजपुरीची वस्ती मोडून ती मुरुडांत येऊन राहिली.

असो. अपराजितदेवानें २ ताम्रपट शक ९१५ मध्यें रविवारीं श्रावण अमावस्येस सूर्यग्रहणसमयीं करहाटकचा ब्राह्मण कोलम यास देऊन, त्यास भूमिदान केलें. पहिल्या ताम्रपटांत पुरीप्रमुखचतुर्दशशतिसमान्वितकोंकणांतील चिखलाद विभागांत विहळें गांवचें एक शेत त्यास दिल्याचें म्हटलें आहे. दोन्ही ताम्रपटांत शिलाहारांचे सार्वभौम राष्ट्रकूट राजे यांचा निर्देश व तशींच मान्यखेट, तगर, संजान, पूनकदेश, चिपूळण, संगमेश्वर, पुरी, स्थानक यांचीं नांवें आहेत.

कोलम ब्राम्हणास ज्या गांवांत भूमि मिळाली तें विहळें गांव व ज्या परगण्यांत विहळें होतें तो चिखलाद परगणा यांस एक प्रकारचें वैशिष्ट्य प्रस्तुत प्रकरणीं लाभलें आहे. कारण हीं दोन्ही गावें राजपुरीच्या आसपास आजहि अवशिष्ट आहेत. विहळें याचें प्रचलित नांव विहळ असून तें कुलाबा जिल्ह्यांतील शेजारच्या माणगांव तालुक्यांत मोडतें आणि चिखलाद हें गांव तर खुद्द जंजिरा संस्थानांतच आहे. अशा रीतीनें पुरी येत येत अगदीं राजपुरींत अन्तर्भूत होऊन जाते.

रा. गद्रे यांच्या दुसऱ्या ताम्रपटासंबंधीं डॉ. मो. ग. दीक्षित, डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटच्या जून १९४३ च्या बुलेटिनमध्यें लिहितात, 'दुसऱ्या ताम्रपटांतील साळंका ( Salanka ) हें गांव पानाड विषयांत आहे. दुसरा एक ताम्रपट चित्तराजानें शक ९४८ मध्यें दिला आहे. त्यांतील मिळकतहि पानाड विषयांतच आहे. पानाड म्हणजे हल्लींचा पोयनाड गांव अलिबाग तालुक्यांत आहे. हा विषय कुलाबा जिल्ह्यांत समुद्रकांठावर असावा असें या ताम्रपटांवरून वाटतें. तो विषय शिलाहारांच्या ताब्यांतील महत्त्वाच्या मुलुखांत असावा.'

जंजिरा संस्थान व अलिबाग तालुका हीं दोन्ही एकमेकांस लागून असल्यामुळें हा सर्व प्रदेश शिलाहारांचा महत्त्वाचा म्हणजे राजधानीच्या भोंवतालचा होता. म्हणूनच वरील दानें त्या प्रदेशांत शिलाहार राजांनीं दिलीं असावीं.

यानंतर राजपुरी, ठाणें व घारापुरी यांचा समन्वय करावयाचा उरला. कोंकणावर मौर्यराजे सहाव्या शतकापर्यंत राज्य करीत होते. त्यांच्या मागून शिलाहार कांहीं काळानें राजे झाले. शिलाहारांचा संस्थापक कपर्दि पहिला हा नवव्या शतकांत उत्तर कोंकणाचा राजा झाला. त्या वेळीं पुरी म्हणजे राजपुरीच त्याची राजधानी असली पाहिजे. कारण त्याच्या वंशांतील पुढील राजा छित्तराज पुरीचा उल्लेख आपल्या ताम्रपटांत करतो. त्याच्या मागून अपराजितानें पुरी आपल्या राज्याच्या अगदीं दक्षिण टोंकाला पडते असें पाहून ठाणें ही दुसरी मध्यवर्ती अशी राजधानी केली.

चालुक्य राजा सत्याश्रय यानें पुरीस वेढा घालून ज्याचा पराभव केला व ज्यानें करहाटकच्या कोलम भटास ताम्रपट दिला, तोच हा अपराजित शिलाहार राजा. त्यानें पुरीशिवाय ठाणें ही नवी राजधानी करावी यांत विशेष अर्थ आहे. पुरी हीच जर घारपुरी असती तर ती ठाण्यापासून अवघी पांच मैल दूर असल्यानें अशा एकमेकीं शेजारी दोन राजधान्या स्थापन करण्यांत कांहींच प्रयोजन नाहीं. घारापुरीला महत्त्व तिजवरील प्रसिद्ध शिवलेण्यांमुळें आलें आहे. घारापुरीवरील शिवलेण्यांसारखींच लेणीं जोगेश्वरी व मंडपेश्वर येथेंहि आहेत. या सर्वांना ठाणें हें मध्यवर्ती ठिकाण समजल्यास येथून घारापुरी पश्चिमेस पांच मैल आणि जोगेश्वरी व मंडपेश्वर हीं उत्तरेस अंदाजीं तितकींच दूर आहेत. फर्ग्यूसन यांच्या मतें हीं लेणीं दहाव्या शतकांतील असावीं. वेरूळचें जगप्रसिद्ध कैलास लेणें हें शिवलेणेंच असून आठव्या शतकांतील आहे. घारापुरी, जोगेश्वरी व मंडपेश्वर येथील शिल्प कैलासाच्या व त्या शेजारील शिवलेण्यांच्या धर्तीवर आहे. हीं तिन्ही लेणीं ज्या अर्थी शिलाहारांच्या राज्यांत आहेत व शिलाहार राजे असतांना कोरलेलीं आहेत त्या अर्थी त्यांच्या निर्मितीचें श्रेय शिलाहारांनाच द्यावयास पाहिजे. शिवाय शिलाहार हे राष्ट्रकूटांचे मांडलिक असल्यामुळें त्यांनीं राष्ट्रकूटांच्या वेरूळ येथील लेण्यांचें अनुकरण करावें यांत नवल नाहीं. ठाण्यापासून वीस मैलांवर

अंबरनाथाचें शिवालय आहे. तें शिलाहार राजा छित्तराज किंवा त्याचा भाऊ मुम्मुणी यानें इ. स. १०३० च्या सुमारास बांधलें. झंझ यानें शंकराची बारा देवालयें बांधल्याचें खारेपाटण ताम्रपटांत म्हटलें आहे. शिलाहारांचा शेवटचा राजा सोमेश्वर यानें इ. स. १२६० मध्यें ठाण्याच्या उत्तरेश्वरास दान दिलें आहे. हें सर्व विचारांत घेतां शिलाहार राजे शिवभक्त असल्याचें सिद्ध होतें. त्यामुळेंहि शिलाहारांकडूनच वरील तीन लेणीं रचलीं गेलीं असावीं या अनुमानास पुष्टि मिळते. सारांश, ठाणें ही दुसरी राजधानी शिलाहारांनीं केली त्यापूर्वी किंवा त्यानंतर त्यानीं घारापुरी, जोगेश्वरी व मंडपेश्वर हीं लेणीं निर्मिलीं असावीं. त्यांपैकीं कोंकणांतील हवा उन्हाळ्यांत उष्ण व चिकट असतां शिलाहार राजे ठाण्याहून घारापुरीस श्रीसान्निध हवा खाण्यास व ईश्वराराधना करण्यास जाऊन राहात असावे. अशा रीतीनें विचार केल्यास राजपुरी ही शिलाहारांची परंपरागत पहिली राजधानी, ठाणें ही दुसरी राजधानी व घारापुरी हें महाबळेश्वरासारखें त्यांचें उन्हाळ्यांत हवा खाण्याचें ठिकाण असा या तिन्ही स्थळांचा समन्वय करतां येतो. सध्यांहि महाशिवरात्रीस सहस्रावधि यात्रेकरू घारापुरीस शिवदर्शनार्थ जात असतात. त्याची सुरुवात शिलाहारांच्या काळापासूनच झाली असली पाहिजे.

# सूचिपत्र

### ख



### ग



### घ



### च

छ



ज

झ



ट



ठ



ढ



त



द

ध



न



प

**ब**

भ

म

य



र

## ह



## क्ष



## ज्ञ

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|
| १० | २५ | इंडिका | इंडिया |
| १३ | २२ | मरुच्या उत्तरेचा | सुराष्ट्र व अपरान्त यांजमधील |
| ३२ | २७ | कान्हेरी | कान्हेरे |
| ६१ | २८ | गृहै | गृह |
| ६५ | १-२ | दिला | देण्याची आज्ञा त्यास केली व त्याजकडून तो बांधून घेतला. |
| ६६ | ७ | मही | माही |
| ७५ | ३ | इंद्र पहिला | इंद्र दुसरा |
| ७८ | ३ | नसरगी | नरसगी |
| ८२ | ९ | जयसिंह २ रा | जयसिंह तिसरा |
| १०५ | ७ | जयसिंह दुसरा | जयसिंह तिसरा |
| १०६ | २० | इरिव्ह | रविव्ह |
| १०६ | २१ | जयसिंह दुसरा | जयसिंह तिसरा |
| ११८ | १६, २०, २५ | वड्डिग | वड्डिग |
| ११९ | १ | बहिणीशीं | कन्येशीं |
| १२२ | १ | इ. स. ११७८ | इ. स. ११८७ |
| १२२ | १४ | जैत्रसिंह | जयसिंह |
| १३० | ६ | पुत्र व अंकित | अंकित |
| १३० | १३, १५ | लक्ष्मदेव | लक्ष्मीदेव |
| १३६ | १६ | लक्ष्मदेव | लक्ष्मणदेव |
| १८४ | २, ३ | लक्ष्मराज | लक्ष्मणराज |
| २१८ | ४ | पांड्यराजा | पांडवराजा |
| २२२ | २२ | जटिल परांतक | जटिल पराक्रम |
| ३ (सूचि) | २२ (स्तंभ २) | कर्ण | कर्ग |

# संदर्भ-ग्रंथ

१ **Early History of the Deccan,**
by Dr. R. G. Bhandarkar.

२ प्राचीन महाराष्ट्र– ले. : डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर.

३ मध्ययुगीन भारत, भाग १ ला– ले. : चिंतामण विनायक वैद्य.

४ **Rashtrakutas & their times,**
by Dr. A. S. Altekar.

५ **The Silahars of Western India,**
by Dr. A. S. Altekar.

६ **The Kadamb Kula,**
by George M. Moraes.

७ **Political History of Maharashtra,**
from the earliest times to circa 1000 A. D.
by V. R. Deoras M. A. Phd.
(Written in 1940 at London but unpublished).

८ **History of the Parmar Dynasty,**
by D. C. Ganguli, M. A., Phd.

९ **History of the Guptas.**
by R. N. Dandekar, M. A., Phd.

१० **Historical Inscriptions of Southern India.**

११ **The Cambridge History of India.**

१२ **Catalogue of the coins of the Andhra Dynansty,** the Western Kshatrapas, the Traikutaka Dynasty & the Bodhi Dynasty,
by Edward James Rapson, M. A.

१३ **Ancient History of the Deccan,**
by G. Jouveau-Dubercuil, Doctor of the University of Paris, Professor College Pondicherry.

१४ **भारतीय इतिहासकी रूपरेखा**– ले. : जयचंद्र विद्यालंकार.

१५ **Epigraphia Indica.**

१६ **दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें,** खंड १ ला व २ रा– ले. : गणेश हरि खरे, भा. इ. सं. मंडळ, पुणें.

१७ **चतुर्वर्ग चिंतामणि**– हेमाद्रिकृत.

१८ **विक्रमांकदेवचरित,** कवि बिल्हणकृत.

१९ **सूक्तिमुक्तावलि,**
Gaikwad's Oriental Series.

२० **शुक्रनीति**

२१ **मत्स्यपुराण**

२२ **मनुस्मृति**

२३ **याज्ञवल्क्य स्मृति**

२४ **Ashoka,**
by D. R. Bhandarkar.

२५ **Notes on the Ancient Geography & civilization of Maharashtra,**
by P. V. Kane.

२६ **Gazetteer of the Bombay Presidency**

२७ **Gazetteers of Thana, Nasik, Ahamadnagar, Bijapur, Khandesh, Poona & c**

## शातवाहन घराणें

१ शिमूक ( खि. पू. २३२ )

|

२ कृष्ण

|

३ शातकर्णी पहिला

( खि. पू. १६८ )

|

४ पूर्णोत्संग

|

५ स्कंधस्तंभी

|

६ शातकर्णी दुसरा

|

७ लंबोदर

|

८ अपिलक

|

९ मेघास्वति

|

१० स्वाती

|

११ स्कंदस्वाती

|

१२ कुंतल स्वातिकर्णी

|

१३ स्वातिकर्णी

|

१४ पुलोमावी

१४ पुळोमावी (पुढें चालू)

|

१५ अरिष्टकर्णी

|

१६ हला

|

१७ मंतलक

|

१८ सुंदर शातकर्णी

|

१९ चकोर शातकर्णी

|

२० शिवस्वाती

|

२१ गौतमीपुत्र शातकर्णी
(इ. स. १२४)

|

२२ वासिष्ठीपुत्र पुळुमावी
(इ. स. १३१)

|

२३ गौतमीपुत्र श्रीयज्ञशातकर्णी
(इ. स. १६९)

|

२४ विजय

|

२५ चंडश्री शातकर्णी
(इ. स. २१०)

|

२६ पुळोम

|

२७ यज्ञश्रीशातकर्णी

———

## वाकाटक घराणें

१ विन्ध्यशक्ति

| ( सुमारें इ. स. २४८ )

२ प्रवरसेन पहिला

| ( सु. इ. स. २६० )

३ रुद्रसेन पहिला

| ( सु. इ. स. ३२१ )

४ पृथ्वीसेन ( सु. इ. स. ३४५ )

|

५ रुद्रसेन दुसरा

| ( सु. इ. स. ३८० )

६ प्रवरसेन दुसरा

| ( सु. इ. स. ४२० )

७ नरेंद्रसेन ( सु. इ. स. ४३५ )

|

८ पृथ्वीसेन दुसरा

| ( सु. इ. स. ४७० )

९ देवसेन ( सु. इ. स. ४९३ )

|

११ हरिसेन

———

## बदामीचें चालुक्य घराणें

जयसिंह पहिला, इ. स. ५०० सुमारें
|
रणराग
|
(१) पुलकेशी १ ला. इ. स. ५५७
- (२) कीर्तिवर्मा १ ला, ५६६
  - (४) पुलकेशी २ रा इ. स. ६११
    - चंद्रादित्य
    - आदित्यवर्मा
    - विक्रमादित्य १ ला (५) इ. स. ६५४
      - (६) विनयादित्य इ. स. ६७८
        - (७) विजयादित्य इ. स. ६९६
          - (८) विक्रमादित्य २ रा इ. स ७३३
            - (९) कीर्तिवर्मा २ रा, ,, ७४७
  - कुब्ज विष्णुवर्धन
- (३) मंगलीश इ. स. ५७८
  - जयसिंह
    - नागवर्धन
  - इन्द्रवर्मन

## राष्ट्रकूट घराणें


कर्क १ ला
इंद्र १ ला
( २ ) कृष्ण पहिला
इ. स. ७५४
दन्तिदुर्ग ( १ )
इ. स. ७५०
( ३ ) गोविंद २ रा
इ. स. ७७३
( ४ ) ध्रुव
इ. स. ७८०
स्तंभ
( ५ ) गोविंद ३ रा
इ.स.७९३
इंद्र २ रा
( ६ ) अमोघवर्ष १ ला
इ.स. ८१३
( ७ ) कृष्ण २ रा, इ. स. ८८०
जगत्तुंग
कन्या
(पश्चिम चालुक्य अयनशीं लग्न
( ८ ) इन्द्र ३ रा इ. स. ९१५
( ९ ) अमोघवर्ष २ रा
इ. स. ९१७
( १० ) गोविंद ४ था
इ. स. ९१८
( ११ ) अमोघवर्ष ३ रा इ.स.९३५

( ११ ) अमोघवर्ष ( चालू )

- ( १२ ) कृष्ण ३ रा — इ. स. ९३९
- ( १३ ) खोट्टिग — इ. स. ९६६
- निरूपम
  - कक्कल (कर्क) — इ. स ९७३

**टीप**— डॉ. देवरस यांच्या मतें

| | |
|---|---|
| इंद्र तिसरा | इ. स. ९१३–९२८ |
| अमोघवर्ष २ रा | ९२८–९२९ |
| गोविंद ४ था | ९२९–९३५ |

## कल्याणचें चालुक्य घराणें

- (१) तैलप २ रा इ. स. ९७३ सुमारें
  - (२) सत्याश्रय २ रा, इ. स. ९९८
  - दशवर्मन्
    - (३) विक्रमादित्य ५ वा इ. स. १००८
    - अय्यन २ रा
    - (४) जयसिंह २ रा इ. स. १०१५
      - (५) सोमेश्वर १ ला, इ. स. १०४९
        - (६) सोमेश्वर २ रा इ. स. १०६८
        - (७) विक्रमादित्य ६ वा इ. स. १०७६
          - (८) सोमेश्वर ३ रा इ. स. ११२६
            - (९) जगदेकमल्ल २ रा इ. स. ११३८
            - (१०) तैलप ३ रा इ. स. ११५१
              - भूलोकमल्ल
              - जगदेकमल्ल ३ रा
              - सोमेश्वर ४ था
        - जयसिंह ४ था
        - विष्णुवर्धन-विजयादित्य

# कलचुरी घराणें

- कृष्ण
  - शंकरगण
    - बुद्ध
      - कन्नम
        - विज्जल १ ला
          - अम्मुगी
          - संकम १ ला
        - राज किंवा राजल
          - कन्नर
          - जोगम
            - पेर्मांडी
              - (१) विज्जल २ रा, इ. स. ११५०
                - (२) सोमेश्वर इ. स. ११६७
                - (४) संकम इ. स. ११७७
                - (५) आहवमल्ल इ. स. ११८०
                - सिंगण
              - (३) मल्लुगी, इ. स. ११७५

## यादव घराणें

सुबाहु

|

दृढप्रहार

|

सेऊणचंद्र १ ला

|

धाडीयप्पा १ ला

|

भिल्लम पहिला

|

श्रीराज

|

वद्दिग

|

धाडियप्पा २ रा

|

भिल्लम २ रा

|

वेसुगी

|

भिल्लम     रा

|

सेऊणचंद्र     रा

|

परम्मदेव

|

सिंदराज

|

मालुगी

मालुगी (पुढें चालू)
|
अमरगांगेय
|
गोविंदराज
|
अमरमालुगी
|
कालीयवल्लाळ
|
( १ ) भिल्लम ४ था,
| इ. स. ११७८
( २ ) जैत्रपाल १ ला
| इ. स. ११९१
( ३ ) सिंघण, इ. स. १२१०
|
( ४ ) जैत्रपाल २ रा, इ. स. १२४६
|
( ५ ) कृष्ण उर्फ कन्हर
| इ. स. १२४७
( ७ ) रामचंद्र इ. स. १२७१
|
( ८ ) शंकर इ. स. १३०९

( ६ ) महादेव
इ. स. १२६०

---

## शिलाहार ( दक्षिण कोंकण )

१ सणफुल्ल ( सुमारें इ. स. ७६५ ते ७९५ )
|
२ धम्मयिर ( सुमारें इ. स. ७९५ ते ८२० )
|
३ ऐयपराज ( ,, इ. स. ८२० ते ८४५ )
|
४ अवसर १ ला ( सुमारें इ. स. ८४५ ते ८७० )
|
५ आदित्यवर्मा ( सुमारें इ. स. ८७० ते ८९५ )
|
६ अवसर २ रा ( सुमारें इ. स. ८९५ ते ९२० )
|
७ इन्द्रराज ( सुमारें इ. स. ९२० ते ९४५ )
|
८ भीम ( सुमारें इ. स. ९४५ ते ९७० )
|
९ अवसर ३ रा ( सुमारें इ. स. ९७० ते ९९५ )
|
१० रट्टराज ( सुमारें इ. स. ९९५ ते १०२० )

---

# शिलाहार घराणें ( उत्तर कोंकण )

कपर्दी १ ला ( सुमारें इ. स. ८२५–८५० )

पुल्लशक्ति ( सुमारें इ. स ८५०–८७५ )

कपर्दी २ रा ( सुमारें इ. स. ८७५–९०० )

वप्पुवन्न ( सुमारें इ. स. ९००–९३० )

झंझ ( सु. ९३०-९५० ) गोग्गी ( सु. ९५०-९६० )

वज्जड १ ला ( सुमारें इ. स. ९६०–९७५ )

अपराजित ( सुमारें इ स. ९७५–१०१०. )

वज्जड २ रा ( सुमारें इ. स. १०१०–१०१५ ) — अरिकेसरिन् (सुमारें इ.स. १०१५–१०२५)

छित्तराज ( सु. इ. स. ) १०२५–१०४०, — नागार्जुन ( सु. इ. स. १०४०–१०७०, ) — मम्मुणी

अनंतदेव ( सु. इ. स. १०७०-१११० )

अपरादित्य ऊर्फ अपरार्क १ ला ( सु. इ. स. १११०-११४० )

हरपालदेव ( सु. इ.स. ११४०-११५५ )

मल्लिकार्जुन ( सु. इ.स. ११५५-११७० )

अपरादित्य ऊर्फ अपरार्क २ रा ( सु. इ. स. ११७०-११९५ )

केशिराज ( सु. इ. स. ११९५-१२४० )

सोमेश्वर ( सु. इ. स. १२४०-१२६५ )

# शिलाहार घराणें ( कोल्हापूर )

( १ ) जतिग १ ला

|

( २ ) नायिम्म किंवा न्यायवर्मा

|

( ३ ) चंद्र

|

( ४ ) जतिग २ रा ( सु. इ. स. १००० ते १०२० )

( ५ ) गोंकल ( सु. इ. स. १०२०-१०५५ ) — गूव्रल

|

( ६ ) मारसिंह (सु. इ.स. १०५५-१०७५)

|

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ७ गूव्रल २ रा | गंगदेव | ८ बल्लाळ | ९ भोज १ ला | १० गंडरादित्य |
| १०७५-८६ | | १०८६-९५ | १०९५-१११० | १११०-३५ |

११ विजयार्क किंवा विजयादित्य
सु. ११४०-११७५

|

१२ भोज २ रा
सु. ११७५-१२०५

## गोंव्याचें कदंब घराणें

१ षष्ठीदेव २ रा (सु. इ. स. १००७ ते १०५०)
|
२ जयकेशी १ ला (इ. स. १०५०-१०८२)
|
३ गुहल्लदेव (इ. स. १०८२)
|
४ विजयादित्य
|
५ जयकेशी २ रा (इ. स. ११०४-११४७)
|
६ ७ पेर्माडी व विजयादित्य
|
८ जयकेशी ३ रा (इ. स. ११८७-१२१२)
|
९ त्रिभुवनमल्ल (इ. स. १२१२-१२३७)
|
१० षष्ठीदेव ३ रा (इ. स. १२३७-१२७२)

## श्रीसयाजी-साहित्य-मालामां प्रगट थएलां
## इतिहास-संबंध पुस्तको.

| अंक | साहित्यमाला क्रम | |
|---|---|---|
| १ | ( ९ ) | जगतनो वार्तारूप इतिहास, ग्रंथ पहिलो. गोकुलदास मथुरादास शाह, बी. ए., एल्एल्. बी., एम. बी. कृत 'Story of the world.' नो अनुवाद ( १९१८, १९२५ ) लुहाणा, किं. ३–८–० |
| २ | ( २५ ) | जगतनो वार्तारूप इतिहास, ग्रंथ बीजो. गोकुलदास मथुरादास शाह, बी. ए., एल्एल्. बी., एम बी., कृत 'Story of the world.' नो अनुवाद ( १९१९, १९२५ ) लुहाणा, किं. १ |
| ३ | ( ३९ ) | हिंदुस्थानचा लष्करी इतिहास व दोस्त राष्ट्रांच्या फौजा, कर्नल नानासाहेब शिंदे, स्वतंत्र मराठी ( १९२१ ) कोठारी, किं. २-८–० |
| ४ | ( ६५ ) | हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास, मराठी रियासत (मध्य विभाग १७०७–१७४० ) गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., मराठी ( १९२० ), गणेश विठ्ठल कुलकर्णी, गिरगांव, मुंबई, किं. २–१२-० |
| ५ | ( ५५ ) | सदर ( मध्यविभाग, भाग २ ) ( १७४०–१७६१ ) गोविंद सखाराम सरदेसाई, मराठी ( १९२१ ), गणेश विठ्ठल कुलकर्णी, गिरगांव, मुंबई, किं. ३ रु. |
| ६ | ( ६८ ) | हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास– मराठी रिसायत ( मध्य-विभाग ) ( १७६१ ) पानिपत प्रकरण, गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए., मराठी ( १९२२ ), गणेश विठ्ठल कुलकर्णी, गिरगांव, मुंबई, किं. २–४–० |

७ ( ८२ ) रोमनो इतिहास, भरतराम भानुसुखराम मेहता, ओ. टी. सी. ई. 'Mendel Creighton' कृत 'History of Rome' नो गुजराती अनुवाद ( १९२३ ) कोठारी, किं. १–०–०

८ ( ९० ) मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया, कर्नल नानासाहेब गणपतराव शिंदे, मराठी (१९२२), जागृति, किं. ३–२–०

९ ( ९८ ) अप्रसिद्ध ऐतिहासिक चरित्रें, विनायक सदाशिव वाकसकर, मराठी, (१९२५), आत्माराम, किं. १–०–०

१० (१०१) अशोकना शिलालेखो, भरतराम भानुसुखराम मेहता, ओ. टी. सी. ई. (१९२६), कोठारी, किं. १–६–०

११ (१०९) वडोदरा राज्यनो इतिहास ( इतिहास ग्रंथ ), चुनीलाल मगनलाल देसाई, बी. ए., रा. ब गोविंदराम अने ( स्व. ) ए. बी. क्लार्क एमणे ग्रंथेला 'Baroda Gazettee' नां इतिहाससंबंध प्रकरणनो, गुजराती अनुवाद ( १९२७ ), कोठारी, किं. १–१०–०

१२ (११५) इंग्लंड अने हिंदुस्थान, ( स्व. ) सत्येंद्रराव भीमराव दिवेटिया, बी.ए., R. C. Dutt कृत "England and India" नो गुजराती अनुवाद ( १९२७ ), लुहाणा, किं. ०–१५–०

१३ (१२३) हिंदुस्थानच्या इतिहासांतील गोष्टी, महादेव मुकुंद जोशी, बी. ए., एलएल. बी., 'P. T. Shrinivas Iyengar' कृत "Tales from the story of India" चा मराठी अनुवाद, ( १९२८ ), जागृति, किं. ०–१३–०

१४ (१२६) मराठी रियासत, मध्य विभाग--भाग १, भरतराम भानुसुखराम मेहता, ओ. टी. सी. ई., सरदेसाईकृत मराठी ग्रंथनो गुजराती अनुवाद ( १९२८ ), कोठारी, किं. २–१–०

१५ (१३७) जर्मन साम्राज्याची पुनःस्थापना, विनायक गणेश आपटे Col. Mulleson कृत "Refounding of the German Empire" नो मराठी अनुवाद (१९२८), जागृति, किं. २–६–०

१६ (१५२) हिंदुस्थानना इतिहासनी वातो, भरतराम भानुसुखराम मेहता, ओ. टी. सी. ई., श्रीनिवास आयंगारकृत "Tales from the story of India" नो अनुवाद (१९२८), (आर्य) किं. ०–१२–०

१७ (१८४) मंगोपार्कनी मुसाफरिओ, सुमन्तनाथजी भट्ट, बी. ए., एल्‌एल्. बी., "Travels of Mango Park" उपरथी (१९३०), पुस्तकालय, १–१४–०

१८ (१८५) प्राचीन बाबिलोनिया, मनसुखलाल मोहनलाल घोटा, बी. ए., ( १९३० ), आर्य, किं. १–१–०

१९ (१९१) आलमगीरके पत्र, पं. शान्तिप्रिय, हिंदी ( १९३२ ), जयदेव, किं. ०–१०–०

२० (२०८) अमेरिकाना संयुक्तराज्यो, प्रो. चिमणलाल मगनलाल डॉक्टर, एम्. ए., एलएल्. बी., लाला लजपतरायना "United States of America" त्या बीजां पुस्तकोने आधारे (१९३२), आर्य किं. १–०

२१ (२२३) तंजावरचे मराठे राजे, विनायक सदाशिव वाकसकर, (१९३३), मराठी, दामोदर, किं. १–९–०

२२ (२२९) मेघास्थिनीसना समयनुं हिंद, चुनीलाल बेचरलाल भट्ट, बी. ए., बी. टी., ( १९३४ ) लुहाणा किं. ०–८–०

२३ (२३०) इटालीमां नवचेतन, नरेंद्र सिकंदरराय देसाई, बी. ए. ( १९३४ ), ( आर्य ) किं. १–१०–०

२४ (२३१) ईत्सिंगना समयनुं हिंद, भालचन्द्र मंच्छाराम देसाई, एम. ए., ( १९३४ ), लुहाणा किं. १–१२–०

२५ (२३६) प्राचीनपूर्व, दलपतराय इ. पाठक, बी.ए. H. Hogarth कृत 'Ancient East' उपरथी (१९३५), लुहाणा, किं. ०-१२-०

२६ (२३८) हिंदनी सफे निकलेला वहाण वटीओ, डॉ. देवेन्द्र र. मजमुदार, एल. सी. पी. एस., (१९३६), लुहाणा, किं. ०-१२-०

२७ (२५१) महाराष्ट्रीय इतिहासनां मुख्य वलण, म. मो. घोटा बी. ए., रा. ब. गो. स. सरदेसाईना अंग्रेजी ग्रंथ उपरथी (१९३१), (आर्य) किं. १-०-०

२८ (२९८) मुसलमानपूर्व महाराष्ट्र, राजकीय इतिहास, खंड १ ला, वा. कृ. भावे, बी. ए. (१९४६), वा. कृ. भावे, पुणें किं. ३-४-०

---